

# साधुसंतांचा देवयानपंथ.

## ( साक्षात्कारयोग )

( लेखक )

डॉ० श्रीपाद महादेव वैद्य

एल्. एम्. ॲन्ड एस्.

मु. इसलामपूर जिल्हा सातारा.

शके १८५४ ] प्रथमावृत्ति [ सन १९३२



किंमत २ रुपये.

ॐ

# अर्पण-पत्रिका.

मृत्युमुखांतून मुक्त करून सगुणसाक्षात्कार व
अमृतत्व प्राप्त करून देऊन त्याचें रहस्य
सांगण्यापर्यंत ज्यांची तयारी, नकळत
सतत कृपा-छत्र ठेवून प्रेम करण्याची
ज्यांची हातोटी, कडकडीत
वैराग्य-युक्त व स्वधर्मानुसार
असें ज्यांचें आचरण, सर्व
भरत-खंडांत हिंडून
कोट्यावधी जीवांनां
ज्ञानामृत
पाजून त्यांचे
उद्धाराचा मार्ग ज्यांनीं
दाखविला असे साधु
संतांतील थोर अवतारी
सत्पुरुष श्रीमत्परमहंस परि-
व्राजकाचार्य वासुदेवानंदसरस्वती
स्वामी महाराज यांचें चरणीं हा
ग्रंथ अत्यंत नम्र भावानें व
प्रणाम पूर्वक अर्पण करीत आहे.

—ग्रंथकर्ता



श्री. प. प. वासुदेवानंदसरस्वति स्वामीमहाराज
मु. गरुडेश्वर, संस्थान बडोदें.
[ समाधि शके १८३७.

# ग्रंथकर्त्याचे दोन शब्द.

शून्याचे भुवनीं स्वरूप अविनाश । प्रणवी पुरुष दिसतसे ॥
निळारंग देखो सर्वांचे देखणीं । चैतन्य भुवनीं समरस ॥
ज्ञानदेवा ध्यान सच्चिदानंदाचें । सर्व ब्रह्म साचे येणें येथें ॥

— ज्ञानदेव.

जेथें ॐ शब्द सामावला पाही । तयें ब्रह्मीं स्थिर राही ॥
परा उन्मेष गळवला नाहीं । बुडी देई तें रूपीं ॥ १ ॥

आतां फार काय बोलावें । तेंच तूं तूंच तें आघवें ॥
लयोत्थान हेलावे । हें स्वभावें नसेचि ॥ २ ॥

आमच्या **प्रणवोपासना** या ग्रंथाची प्रथमावृत्ति त्वरित संपल्यामुळें व तिचा प्रसार हिंदुस्थानांतील सर्व प्रांतात झाल्यामुळें, अध्यात्मविषयावर स्वतंत्र विचाराच्या, साधार व चिकित्सक बुद्धीस पटेल अशा ग्रंथाची आवश्यकता आहे असें आढळून आलें. तशा प्रकारचा सर्वांनां सुलभ तऱ्हेनें आकलन होईल असा साधार आत्म-ज्ञानपर ग्रंथ प्रसिद्ध करावा असें ठरल्यावरून प्रस्तुत **साधुसंताचा देवयानपंथ** उर्फ **साक्षात्कारयोग** हा ग्रंथ प्रसिद्ध करीत आहोंत. प्रस्तुत ग्रंथास हें नांव देण्याचें कारण पहिल्या प्रकरणांत व पुढेंही देणेंत आलें आहे त्यावरून कळून येईल. या ग्रंथांत **निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव, चांगदेव, नामदेव, गोरा कुंभार,**

चोखामेळा, नरहरी सोनार, विठोबा खेचर, जनार्दनस्वामी, एकनाथ, तुकाराम, रामदास, मेरुस्वामी, जनाबाई, मुक्ताबाई, वगैरे सारखे संतमालिकेंतील प्रमुख व थोर स्त्रीपुरुष यांचीं वचनें उध्दृत केलीं आहेत. हे सर्व थोर साधुसंत महाराष्ट्रांतील आहेत. त्यांचा परिचय मराठी वाचकांस आहेच. तो इतर प्रांतीयांनां व्हावा व त्यायोगें त्यांची थोरवी केवढी मोठी आहे हें परप्रांतीयांच्या लक्षांत यावें; तसेंच महाराष्ट्रीयजनतेचेंहि लक्ष आमच्या साधुसंतांनीं सांगितलेल्या खऱ्या व उच्च ज्ञान–रहस्याकडे लागावें ह्या प्रमुख उद्देशानें त्यांचींच साधार व लागूं वचनें दिलीं आहेत. यायोगें विषय सहज लक्षांत येईल व सर्वांची एकवाक्यता कशी आहे हेंहि ध्यानीं येईल. इतर थोर विभूतींचीं प्रत्यक्ष वचनें दिलीं नसलीं तरी कोण कोणाचे आधार घेतले आहेत हें आधारभूत ग्रंथाची यादी दिली आहे त्यावरून कळून येईल. ज्ञानमार्गांत गुह्य असें कांहीं नसून सर्व साधुसंत हा मार्ग उघड व पद्धतशीर कसा सांगतात हे ग्रंथ वाचल्यानें सहज ध्यांनीं येईल.

ह्या ग्रंथ स्वतंत्रपणें लिहून प्रसिद्ध करण्याचा थोडा आग्रह धरण्याबद्दल रा. रा. वल्लभ बाळकृष्ण ऊर्फ बाबुराव कुलकर्णी, मुक्काम शिरोळ सं. कोल्हापूर, तसेंच आमच्या पुष्कळ स्नेह्यांपैकीं प्रो. कृ. पां. कुलकर्णी एम्. ए. व. रा. रा. वा. दा. मुंडले संपादक ब्राम्हण पत्रिका यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे व इतरांप्रमाणें त्यांचे प्रामुख्यानें आभारहि मानले पाहिजेत. सध्यां अला–हाबाद युनिव्हर्सिटींत असलेले सुप्रसिद्ध वेदांती व आत्मसाक्षात्काराचे

मार्गातील अनुभवी असे प्रो. रा. द. रानडे एम्. ए. यांनीं या प्रयास आपला अमूल्य वेळ खर्च करून प्रस्तावना लिहून पाठविली याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे. ग्रंथाच्या छपाईचें काम चांगल्या प्रकारें केल्याबद्दल आनंद छापखाना, सातारा याचे मालक रा. बाबुराव वैद्य यांचे आभार मानीत आहों.

प्रसिद्ध अवतारी सत्पुरुष **श्री. प. प. वासुदेवानंद सरस्वती ( टेंभ्ये ) स्वामीमहाराज** यांना हा ग्रंथ समर्पण करण्याची प्रेरणा झाल्यामुळें त्यांचें चरणीं तो समर्पण करण्यांत आला आहे. त्यांचा गांभीर्य व शांत वृत्तिदर्शक फोटोहि छापला आहे. त्यांचा पाहिजे होता तसा चांगला फोटो प्रथम मिळेना पण ईश्वरी इच्छेनें अचानक एक सुंदर फोटो मुंबईचे प्रसिद्ध आर्टिस्ट रा. रा. एस्. जी. सोमण यांजकडें तो मिळाला. त्यानीं तो आनंदानें दिल्याबद्दल त्यांचेहि अभार मानीत आहों.

ग्रंथांत विस्तृत अनुक्रमणिका, आधारभूत ग्रंथाची यादी व विषय सहज व त्वरित काढतां यावा ह्मणून विषयांची सूची दिली आहे. शेवटीं **प्रकाशदीपिका** व **दासबोधाचा सोलीव अर्थ** हीं दोन लहान पण सुंदर प्रकरणें पारीशिष्ट रूपानें दिलीं आहेत. ' प्रकाशदीपिका ' हें **श्रीदत्तमहाराज** ( ज्यास प्रणवोपासना हा ग्रंथ अर्पण केला आहे ) यांजकडून मिळालें व दुसरे ' दासबोधाचा सोलीव अर्थ ' हें समर्थ सांप्रदायी **समर्थदास** मुक्काम बोरगांव जि. सातारा ( यांनीं श्रीसमर्थांची पंचरसी धातूची मूर्ति मु॥ बोरगांव येथें स्थापून मंदीर बांधलें आहे ) आणि **प्रो. रामभाऊ रानडे**

यांच्यामुळें छापता आली. हा ग्रंथ छापून बरेंच दिवस तयार आहे पण कित्येक अडचणीमुळें तो प्रसिद्ध करण्याचें नाइलाजामुळें लांबणी-वर पडलें.

ईश्वरी प्रेरणेमुळें जसजसें लिहिणें झालें तसतसें लिहिलें गेलें आहे. सहृदय वाचकांनीं हंसक्षीरन्यायानें ग्रंथांत दृष्टोत्पत्तीस येणारे दोष ग्रंथकर्त्याचे आहेत असे समजून त्याचा त्याग करून ज्ञानतत्व तेवढें ग्रहण करावे व आत्मकल्याण करून घ्यावें. ही कृति करवून घेतल्याबद्दल त्या जगच्चालकाचे आभार मानून व सर्वांना त्यानें आत्मसाक्षात्कार प्राप्त करून घेण्याची बुद्धि द्यावी अशी त्यास प्रार्थना करून लेखणी खालीं ठेवतों.

इसलामपूर
आश्विन शु॥ १
शके १८५४

श्रीपाद महादेव वैद्य
ग्रंथकर्ता

# प्रस्तावना.



डॉ. श्रीपाद महादेव ऊर्फ भाऊसाहेब वैद्य, एल्. एम्. ॲन्ड, एस्. यांनीं लिहिलेल्या 'साधुसंतांचा देवयानपंथ' अगर 'साक्षात्कारयोग' या ग्रंथास प्रस्तावना लिहिण्यास मला फार आनंद होत आहे. त्यांच्या 'प्रणवोपासना' या ग्रंथास मी एक लहानशी प्रस्तावना लिहिली आहे. त्यांतील विषय समजण्यास कठीण असल्यामुळें व त्यांत उपनिषदांतीलच उतारे उद्धृत केले असल्यामुळें तो ग्रंथ पुष्कळांना कठीण वाटणें साहजिक आहे. प्रस्तुत ग्रंथांतील विषय हा गहन व आकलण्यास कठीण असला तरी, ज्ञानेश्वरापासून तुकारामरामदासापर्यंतच्या सर्व महाराष्ट्रीय साधुसंतांच्या वचनांचाच यांत आधार घेतला असल्यामुळें व फक्त त्यांचींच वचनें उद्धृत केलीं असल्यामुळें हा ग्रंथ सर्व प्रकारच्या वाचकांस अत्यंत उपयोगी असा झाला आहे.

दिवसानुदिवस ज्ञान हें निरनिराळ्या शाखारूपानें प्रकटित होत असल्यामुळें कोणतीही गोष्ट बुद्धीचे कसोटीवर घासून पहाण्याकडे चिकित्सक बुद्धिवाद्यांची प्रवृत्ति असते. खरें ज्ञान ह्मणजे काय? तें कसें प्राप्त होतें, व करून घ्यावें? साक्षात्कार ह्मणजे काय? वगैरे कठीण वाटणाऱ्या विषयांचें विवेचन या ग्रंथांत अत्यंत सुलभपणें, साधार, व बुद्धीस पटेल अशा प्रकारें करण्यांत आलें असल्यामुळें वरील कसोटीस सदर ग्रंथ उतरतो असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. साक्षात्कार ह्मणजे कांहीं कल्पनागम्य गोष्ट नसून

हें अनुभवशास्त्र आहे. हें फार मार्मिकपणें व उघडपणें ग्रंथकर्त्यांनीं दाखविलें आहे. इतका साधार, बुद्धिग्राह्य, अनुभवयुक्त व वाचकांचे वृत्तीस पटणारा ग्रंथ लिहिल्याबद्दल ग्रंथकर्त्यांचें आभार मानले पाहिजेत. Rational Mysticism ह्मणजे काय व आमचे महाराष्ट्रीय साधुसंत त्याचें उघडपणें विस्तृत विवेचन कसें करतात हें कोणास पहावयाचें असल्यास त्यांनीं हा ग्रंथ समूळ वाचावा. ह्या ग्रंथास **साक्षात्कारयोग** हें नांव यथायोग्य दिलें आहे. कारण त्यांत साक्षात्कार व तो प्राप्त करून घेण्याचे मार्ग यांचें सप्रमाण व सूक्ष्म विवरण करण्यांत आलें आहे. ' प्रणवोपासना ' या ग्रंथाप्रमाणेंच, सूत्ररूपांत पण निःसंदिग्धपणें बोध प्राप्त करून देईल असा ग्रंथ लिहिण्याची हातोटी डॉ. भाऊसाहेब वैद्य यांचेप्रमाणें फारच थोडक्यांना साधलेली असते असें दिसून येईल.

या ग्रंथाचीं **सात प्रकरणें** आहेत. प्रत्येक प्रकरण अंतःकरणांत प्रकाश पाडणारें असल्यामुळें यास ' दीप ' अशी संज्ञा देण्यांत आली आहे. विवरणाचे दृष्टीनें यांचे दोन भाग पाडतां येतील. एक पूर्वार्ध व दुसरा उत्तरार्ध. प्रकरण १ ते ४ हीं पूर्वार्धांत मोडतील. कारण यांत देहाचा अभिमानी जो **आत्मा**, त्याचें आणि त्याचा साक्षात्कार करून घेण्याच्या मार्गाचें विवेचन करण्यांत आलें आहे. पहिल्या प्रकरणांत चालू परिस्थितीचें यथातथ्य वर्णन देण्यांत आलें असून साधुसंताचे ग्रंथ कोणत्या दृष्टीनें वाचावे हेंहि सांगितलें आहे. ' **सद्गुरू** ' वरील दुसरें प्रकरण फारच चांगलें आहे ! खरा गुरु कोण ? याचें स्पष्टीकरण अगदीं सूक्ष्मपणें व खोल विचारानें करण्यांत

आलें असून गुरूंच्या उपदेशाचें रहस्य फार मार्मिकपणें दिलें आहे!

तिसऱ्या प्रकरणांत **आठ प्रकारचे अभ्यास** व ते कसे आचरावे हें सविस्तर सांगितलें आहे. हे सर्व प्रत्येकास साध्य झाले नाहींत तरी ध्यानयोग, नामस्मरण व वृत्तिलय वगैरे अभ्यास सर्वांनीं करून पहाण्याजोगे आहेत. खरी **निर्गुणोपासना** कोठून सुरू होते व तीमध्यें येणारे अनुभव कोणते? याचें या ग्रंथांत काव्यमय वर्णनहि ग्रंथकर्त्यांनीं केलें आहे. इतकें कुशल विवेचन व तेंहि साधुसंतांचें वचनांचा समन्वय करून केलेलें दुसरीकडे पहावयास क्वचितच सांपडेल! या तिसऱ्या प्रकरणांत आपलें अविनाशित्व कसें ओळखावें हा गहन विषय सुंदर रीतीनें मांडण्यांत आला आहे.

**नामस्मरण** यावर स्वतंत्र प्रकरण घातलें आहे, हें फार चांगलें केलें आहे. यावर ठराविक पद्धतीचें भाष्य पुष्कळ प्रकारें पाहण्यांत येतें पण डॉ० भाऊसाहेब वैद्य यांनीं अगदीं निराळ्या, स्वतंत्र व शास्त्रीय पद्धतीनें यांचें विवरण केलें आहे. निरनिराळ्या शास्त्रानुरूप नामस्मरणाचें रहस्य काय ठरतें, विशिष्ट नामांचे विशिष्ट पद्धतीनें नामस्मरण कां करण्यास सांगितलें आहे, याचें वर्णन फार विवेचक बुद्धीनें करण्यांत आलें आहे, तें सर्वांनीं जरूर वाचावें. नामस्मरणाचें साध्य काय? खरें नामस्मरण कोणतें? व त्यायोगें ईश्वराचा साक्षात्कार कसा होतो? यांचें पद्धतशीर विवरण करण्यांत आलें आहे. प्रथम अवस्थेच्या साधकापासून उच्च दर्जाचे साधकास उपयोगी असा हा विषय असल्यामुळें सर्वांनीं तो पुनः पुनः वाचावा म्हणजे त्यांतील रहस्य कळून येईल.

यापुढें ग्रंथाचे उत्तरार्धास सुरवात होते. ५, ६ व ७ या प्रकरणांत सांगण्यांत आलेला विषय उच्चदर्जाचे साधकांकरितां आहे. हा अनुभवाचा विषय असल्यामुळें नुसता समजण्यास सुद्धां कठीण वाटेल यांत नवल नाहीं. ह्या कठीण पण अत्यंत महत्वाच्या विषयाचा प्रवेश बुद्धिरूप गुहेंमधील खोल भागांत हळूं हळूं कौशल्यानें करण्यांत आला आहे. वेदांत शास्त्रांतील गूढ प्रमेयांचा साक्षात्काराचे दृष्टीनें कसा मेळ बसतो, किंबहुना साक्षात्काराचे पायावरच त्यांची रचना कशी केली आहे ह्या तत्वाचा बोध ह्या उत्तरार्धाच्या वाचनानें होईल. हठयोगांतील चक्रभेदन व नादानुसंधानासारखे अत्यंत कठीण व काल्पनिक वाटणारे विषय, मनोलयाचे अनुभव येऊं लागल्यावर कसे सहज साध्य आहेत हें दाखविण्यांत आलें आहे.

प्रकरण ५ मध्यें परमात्म्याच्या स्वरूपाचें वर्णन करण्यांत येऊन पिंडब्रह्मांड ऐक्य कसें साधतां येतें ह्याचें उत्तम प्रकारें दिग्दर्शन करण्यांत आलें आहे. परमात्म्याचें **प्रकाशरूप हेंच निर्गुण निराकार अशा परब्रह्माचें सगुण–रूप आहे** हें रहस्य ग्रंथकर्त्यानें विशद करून दाखविलें आहे. प्रकाश व नाद यांचें ऐक्य हा अनुभवांतील अत्यंत महत्वाचा विषय असून अनुभवावांचून याचें रहस्य कळणार नाहीं.

सहावें प्रकरण ‘ सोऽहम् ’ नें भरून गेलें आहे ! अजपाजपाचें सांगोपांग व शास्त्रीय पद्धतीनें विवरण करण्यांत येऊन जपाच्या तात्विक अर्थाकडे वाचकांचें लक्ष लागल्यावाचून राहणार नाहीं. हें प्रकरण समग्रच वाचावें. यांतील साधित्व हा महन वाट–

णाऱ्या तत्वाचें विवेचन ग्रंथकर्त्यांनें फार सुलभ प्रकारें केलें आहे.

शेवटचें प्रकरण हा ग्रंथाचा शिरोभूत भाग आहे. ज्ञानप्राप्त करून देणारें जें महावाक्य त्याचें साधार वेदांतशास्त्रदृष्ट्या विवेचन करून त्याचा साक्षात्कार कसा होतो हें सांगितलें आहे. गगनस्वरूपाबद्दल कांहींच लिहितां येणार नाहीं ! हें खरें असलें तरी ग्रंथकर्त्यांनीं म्हटल्याप्रमाणें ' शब्दाचा अतिरेक करून जेथपर्यंत सांगतां येईल ' तेथपर्यंत उघड सांगण्याचा प्रयत्न केला आहे ही महत्वाची गोष्ट आहे. ' पुरुषोत्तम व त्याची भक्ति ' ह्याचें विवेचन खऱ्या ज्ञानावर स्वच्छ प्रकाश पाडणारें आहे ! साधकास भ्रम होऊन अहंकार उत्पन्न होऊं नये ह्मणून सप्तज्ञानभूमिकेचें क्रमवार वर्णन देण्यांत आलें आहे. शेवटीं उपसंहारही फार बहारीचा दिला आहे.

ह्या ग्रंथाच्या विशेष म्हणून कांहीं गोष्टी वाचकांचे निदर्शनास आणणें जरूर आहे. हा ग्रंथ अगदीं स्वतंत्र विचाराचा आहे. ह्यावर कोणत्याही विशिष्ट सांप्रदायाची छाप नाहीं. यांतील विवेचन शास्त्रीय पद्धतीचें, समतोल, व बुद्धितत्त्वास पटेल असें असून मांडणी सुगम व पद्धतशीर आहे. खऱ्या ज्ञानाकडे लोकांचें लक्ष वेधावें व त्यांनीं साक्षात्कार प्राप्त करून आत्मकल्याण करून घ्यावें ह्या तीव्र भावनेनें हा ग्रंथ लिहिलेला दिसतो. साधुसंतांची उत्कृष्ट व स्पष्टार्थबोधक वचनें उद्धृत केल्यामुळें ग्रंथाचा भारदस्तपणा व महत्व वाढलें आहे. सर्वांत विशेष म्हणजे अनुभवाचे पायावर या ग्रंथाची उभारणी आहे. आत्म्याचें अविनाशित्व, पिंडब्रह्मांडऐक्य, अंतःस्फूर्ति, उपदेशरहस्य, साक्षित्व, कूटस्थ, महा-

वाक्याचा साक्षात्कार, सोऽहंवृत्ति, नाद व प्रकाश यांचें ऐक्य व लय वगैरे कठीण तत्वांचें उद्घाटणं फार मार्मिकपणें व स्पष्टज्ञान प्राप्त करून देणारें झालें आहे.

ग्रंथाचे शेवटीं एकनाथ महाराजांची ' प्रकाशदीपिका " व रामदासस्वामींचा ' दासबोधाचा सोलीव अर्थ ' हीं दोन प्रकरणें परिशिष्ट रूपानें दिलीं आहेत. साक्षात्काराच्या मार्गाचें वर्णन क्रमशः व पद्धतशीर रीतीनें या ग्रंथांत केलेलें आढळून येईल. हीं दोन छोटीं दिसलीं तरी प्रकरणें भारी आहेत. ग्रंथाचें बाह्यांग अंतरंगाप्रमाणेंच सुंदर करण्यांत आलें आहे.

ग्रंथाचें महत्व त्याचे पानांचे संख्येवर नसून आंतील विषयावर अवलंबून असतें. या दृष्टीनें हा ग्रंथ सूत्ररूप व लहानसा वाटला तरी त्याचें महत्व फार आहे हे सर्वांस आढळून येईल.

अलाहाबाद विश्व-
विद्यालय
१७।९।१९३२

रा० द० रानडे

---

# विषयानुक्रमणिका.

# शुद्धिपत्रक.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | ८ | निघाला | निमाला |
| १२ | ३ | वैसोव | बैसावे |
| २६ | १३ | महद् | महत् |
| २६ | १६ | गुरुबोधानें | गुरु बोधानें |
| ३९ | ४ | वगैरे नियम | नियम वगैरे |
| ४१ | १ | च | व |
| ५१ | १२-१३-१४ | त्राहटक | त्राटक |
| ६० | १५ | केंव्हां कशी | केंव्हांहि कशींहि |
| ६८ | ४ | अवस्थाचे | अवस्थेचे |
| ७४ | १२ | अंगुष्टमात्र | अंगुष्ठमात्र |
| ७५ | ११ | हृदयें | हृदये |
| ७६ | २१ | अंगुष्ठमात्र | अंगुष्ठमात्रः |
| ९३ | १६ | परमात्म्याचे | परमात्मा याचे |
| ९३ | १६-२२ | ? | ! |
| ९६ | ६ | अमानुष | अमानव |
| ९६ | २५ | योंगतारावली | योगतारावली |
| १०३ | २७ | सत्यपाताळ | सप्तपाताळ |
| १०९ | १३ | लक्ष्मींथ | लक्षार्थ |
| ११९ | २ | — | , |
| १२४ | ७ | परिसमाप्तीं | परिसमाप्तिनीं |

| | | | |
|---|---|---|---|
| १४३ | २२ | ब्राह्मरंग | बाह्यरंग |
| १५९ | ८ | ब्रह्मग्रहण | ब्रह्म ग्रहण |
| १६० | २ | –ल्याने | –त्यानें |
| १९० | २१ | ने | ते |
| १९७ | ४ | विजय | विषय |

# आधारभूत ग्रंथांची यादी.

१ उपनिषदें:— १ ईशावास्य २ कठ ३ केन ४ प्रश्न ५ मुंडक ६ मांडुक्य ७ छांदोग्य ८ ऐतरेय ९ तैत्तरेय १० बृहदारण्यक ११ मैत्रायणीय १२ कौषीतकी १३ श्वेताश्वतर वगैरे
२ ब्रह्मसूत्रे
३ श्रीमद्भगवद्गीता
४ श्रीमद्भागवत
५ योगतारावली ( श्रीमत् शंकराचार्य )
६ हठयोगप्रदीपिका ( स्वात्मारामयोगीन्द्र )
७ ज्ञानेश्वरी
८ अमृतानुभव
९ ज्ञानेश्वर वचामृत ( प्रो. रा. द. रानडे ) एम्. ए.
१० संतवचनामृत ( ,, )
११ रामदास वचनामृत ( ,, )
१२ तुकाराम वचनामृत ( ,, )
१३ एकानाथी भागवत
१४ ,, भावार्थ रामायण
१५ ,, अभंगाची गाथा
१६ तुकाराम ,,
१७ गाथासंग्रह
१८ दासबोध

१९ रामदास समग्र ग्रंथ
२० दासबोधाचा सोलींव अर्थ
२१ प्रकाशदीपिका ( एकनाथ )
२२ दत्तमहात्म्य [श्री. प. प. वासुदेवानंद सरस्वति ( टेंब्येस्वामी )]
२३ रामसोहळा ( मेरुस्वामी )
२४ गीतारहस्य ( लो. टिळक )
२५ स्वामी रामतीर्थ समग्रग्रंथ
२६ स्वामी विवेकानंद समग्रग्रंथ
२७ शारीरशास्त्र Anatomy
२८ इंद्रियविज्ञानशास्त्र Phisiology
२९ प्रणवोपासना
३० गुरुगति वगैरे वगैरे........



# साधुसंतांचा देवयान पंथ.

## दीप १ ला.

### पथ—प्रवेश



चंद्र सूर्य रश्मी न देखो तारांगणें ।
अवघा हरी होणें हेंचि घेवो ॥

—निवृत्तिनाथ

सम तेज पाहे तव एकचि वो तेज ।
ॐकार सहज निघाला तेथें ॥
निवृत्ति उपदेश ज्ञानिया लाधला ।
तत्वीं तत्व बोलला ज्ञानदेव ॥

—ज्ञानदेव

हे निरालंब गगनस्वरूपा ! हे त्रिगुणातीता सच्चिदानंद प्रभो ! तुज एकात्म भावानें नमन असो. जो आमच्या बुद्धीला प्रेरणा करितो अशा सर्व श्रेष्ठ प्रकाशरूप परमात्म्यास नमस्कार असो ! अखिल विद्यांचा व सिद्धींचा दाता तूंच असून, चिन्मय स्वरूप व वाङ्मय स्वरूप तूंच आहेस ! अखिल ब्रम्हांडाची उत्पत्ति, स्थिती व लय कर्ता तूंच असल्या मुळें कोणत्याही कार्याचा प्रेरक तूंच आहेस. एवढेंच नव्हे तर तूंच कर्ता

आहेस. त्या अर्थी तदंशभूत जीवांनीं तुलाच नम्र होऊन तुझ्या ठिकाणीं लीन होण्याशिवाय, निराळा अहंकार कां धारण करावा ?

ज्या ज्या वेळीं धर्माला ग्लानी प्राप्त होते त्या त्या वेळीं ईश्वर अवतार घेतो अशी श्रीमद्भगवद्गीता व सर्व शास्त्रें ग्वाही देतात. सर्व कालांत थोड्या फार अंशानें असे मुख्य व उपअवतार होत असतात म्हणून धर्म स्थापना करणारे थोर पुरुषांनां ईश्वरी अवतारच म्हणतात. असे अवतार पूर्वीं होऊन गेले आहेत, हल्लींही आहेत व पुढेंही होतील. श्रीमद्भागवतांत सांगितलें आहे कीं, कृत, त्रेता, द्वापार व कली इत्यादि चार युगापैकीं कृतयुगांत चार चरणांनीं युक्त असा धर्म मनुष्यामध्यें वागत होता. हे चार पाय म्हणजे (१) तप (२) सत्व (३) दया व (४) शौच असें कित्येक म्हणतात. पुढें त्रेतायुगांत एक पायानें म्हणजे चतुर्थांशानें धर्म ऱ्हास पावत गेला व त्या जागीं एक पायानें अधर्म वाढत गेला. द्वापार युगांत दोन पायांनीं व कलीयुगांत ३ पायांनीं धर्माचा ऱ्हास झाला आहे व तितकाच अधर्म वाढला आहे. सध्यां धर्म एक पायावरच आहे !

धर्म म्हणजे काय ? त्याचें स्वरूप कोणतें ? त्याचीं अंगें व उपांगें कोणतीं ? वगैरे बद्दल विचार करण्याचें हें स्थान नसल्यामुळें इतकें खोल जाण्याचें प्रस्तुत स्थळीं आपणास कारण नाहीं. साधुसंतांनीं **' स्व स्वरूपीं राहणें हा स्वधर्म होय '** असें सांगितलें आहे. त्या दृष्टीनें प्रत्येकानें आपण स्वधर्माचें पालन करीत आहों अगर नाहीं हें पहावें. युगमानाप्रमाणें धर्माचे अंगोपांगांत, आचारामध्यें अगर पादामध्यें फरक पडतील पण शाश्वत धर्मतत्वांत कधींही फरक पडणार नाहीं. तो केव्हांहि अबाधित व सनातनच राहणार ! स्व-स्वरूपीं राहणें ह्या स्वधर्मापासून जीव जेव्हां पराङ्मुख होतात तेव्हां साधु-संतांचें रूपानें ईश्वर अवतार घेत असतो आणि जन्ममरणाचें सतत

दु:ख भोगणाऱ्या जीवांना मोठ्या कृपाळू अंत:करणानें सन्मार्गावर आणून स्वस्वरूप दर्शनाचा मार्ग दाखवून देतो. या कलियुगांत 'शुचीत्व' या पदानेंच धर्म राहिल्यामुळें बाह्य शुद्धता राखतां येऊन अंत:शुद्धता राखतां आली तर दुधांत साखर टाकल्या प्रमाणेंच झालें म्हणावयाचें. पण बाह्य शुद्धता प्रसंगानुसार राखतां आली नाहीं तरी अंत:करणाची शुद्धता ठेवल्यास त्यांत चैतन्याचा प्रकाश पडेल व वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें स्वधर्मरत तुम्ही व्हाल; असें सत्पुरुष सांगतात !

## अवतार रहस्य

परमेश्वराच्या मार्गाचें दर्शन श्रवणानें होत असतें. ज्या सत्पुरुषांचें अंत:करण भक्तियोगानें निर्मल झालें असतें त्यांच्या हृत्कमलांत ईश्वर वास्तव्य करितो ! ईश्वराच्या ज्या ज्या शरिराचें ध्यान भक्त आपल्या मनांत करित असतात तें तें शरीर आपल्या भक्तावर अनुग्रह करण्याकरितां ईश्वर धारण करीत असतो.

ईश्वरानें साधुसंतांचें रूपानें धर्मस्थापनेकरितां पुरुषरूपांत अवतार धारण केले आहेत तसेंच स्त्रीरूपांतहि अवतार धारण केले आहेत. कित्येक अवतारकार्यें बालरूपांतच संपविलीं आहेत तर प्रसंगानुरूप हीन यातींतहि अवतार कार्य झालें आहे. अशाप्रकारें हीन यातीपासून उच्च जातीपर्यंत व निरानिराळ्या प्रकृतीनुरूप अवतार झालेले दृष्टीस पडतात. त्याच्याहि पुढें जाऊन पुराण कालाकडे पाहिलें तर निरानिराळ्या मच्छ, कच्छादिसारख्या योनीमध्येंहि ईश्वरानें कारणपरत्वें अवतार धारण केलेले दृष्टोत्पत्तीस येतात. यावरून ईश्वर धर्मस्थापनेकरितां व आपल्या भक्तावर अनुग्रह करण्याकरितां नानाप्रकारें अवतार धारण करतो हें दिसून येईल. ह्याच दृष्टीनें आमचे साधुसंतास अगर सत्पुरुषास ईश्वरी अवतार समजण्यांत येते.

श्रीसमर्थ ह्मणतातः—
धर्म स्थापनेचे नर। ते ते ईश्वरी अवतार ॥
झाले आहेत पुढें होणार। देणें ईश्वराचें ॥

आमच्या साधुसंतांनीं व सत्पुरुषांनीं स्व—धर्माची ज्योत अखंड तेवत ठेविली हें तत्व लक्षांत घेतलें म्हणजे ईश्वरानें साधु—संताचे रूपानें निरानिराळे, स्त्री, पुरुष किंवा बाल या स्वरूपांत, किंवा निरानिराळ्या जातींमध्यें व भिन्न वयोमर्यादेनुरूप अवतार कां धारण केलें याचें रहस्य कळेल.

आमच्या परमश्रेष्ठ अशा भारतभूमींत अवतरलेल्या साधु संतांनीं जड जीवांच्या उद्धरणार्थ स्वस्वरूपाप्रत नेणारा मार्ग दाखवून दिला आहे. निरनिराळ्या सत्पुरुषांचे मुखांतुन निरनिराळ्या प्रकारानें त्याचें उद्धाटन झालें असलें तरी सर्वांना एकच श्रुतिप्रणीत मार्ग अभिप्रेत आहे. ही गोष्ट त्यांचे ग्रंथ सूक्ष्म तऱ्हेनें वाचणारास सहज दिसून येईल. त्यांनीं दर्शित केलेल्या मार्गावरून सर्वांनीं जाणें कसें जरूर आहे व सर्वांच्या वचनांचें रहस्य एकच कसें आहे हें दाखविण्याकरितां प्रस्तुत ग्रंथाचा प्रस्ताव आहे. तेव्हां या ग्रंथाचा विषय अध्यात्म वा आत्मप्रचीती हा असणारच. यांचें कारण असें कीं आत्मप्रचीती पासून मायेचें आवरण नष्ट होऊन निरतिशयानंद सुख—प्राप्ती होते. सद्वस्तुबद्दल विचार करणें, कोणच्याही भोगाबद्दल वैराग्य ऊत्पन्न होणें, बाह्य इंद्रियें व मन ताब्यांत ठेवून निष्काम कर्माचें अनुष्ठान ठेवणें व ईश्वरावर दृढ श्रद्धा ठेवून समाधानानें प्रारब्ध भोगीत राहणें, या क्रिया जो नित्य आचरणांत आणतो आणि ज्यास तापत्रयापासून मुक्त होण्याची तीव्र इच्छा झाली आहे व तळमळ लागून राहिली आहे अशा शिवाय याचा अधिकारी कोण असेल ?

त्यांपैकीं कमी अधीक गुण आंगीं बाणून घेण्याचा प्रयत्न प्रत्येकानें करून या मार्गावर पाय ठेवावा म्हणजे त्वरित अंतीम साध्य होईल.

## साधुसंतांची थोरवी

गेल्या पांच सहा शतकांमध्यें आपल्या महाराष्ट्रांत जे **साधु-संत** होऊन गेले त्यांमध्यें निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपान, मुक्ताबाई, चांगदेव, नामदेव, गोरा कुंभार, विठोबा खेचर, सावता माळी, नरहरी सोनार, चोखा मेळा, जनाबाई, सेना न्हावी, भानुदास, जनार्दन स्वामी, एकनाथ महाराज, रामदास, तुकाराम, मेरूस्वामी, वगैरे महान् विभूती प्रामुख्यानें लक्षांत येतील. त्यांपैकीं पुष्कळांचीं वचनें लक्षावधी भगवत् भक्त नित्य पठण करीत आहेत ! या संत शिरोरत्नांपैकीं **ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम व रामदास** यांचीं काव्यें अत्यंत प्रतिभासपंन्न व महान् आहेत. त्यांची प्रचंड कवित्व शक्ति, भाषेवरील प्रभुत्व व सिद्धांत छातीठोकपणें मांडण्याची हातोटी आणि या सर्वांपेक्षांही श्रेष्ठ म्हणजे त्यांची अध्यात्म ज्ञानाचीं शिकवण ही अवर्णनीय आहे. त्यांचे बद्दल पाश्चात्य तत्वज्ञानामध्यें पारंगत असे **प्रोफेसर आर. डी. रानडे** एम. ए. म्हणतात. " जें स्थान इंग्रजी भाषेमध्यें चॉसर, शेक्सपीअर, मिल्टन, वर्डसूवर्थ इत्यादिकांनीं पटकाविलें आहे, तेंच स्थान वाङ्मयदृष्टीनें ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम व रामदास यांनीं महाराष्ट्र भाषेंत पटकाविलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. चमत्कारांच्या दृष्टीनें या साधूंच्या चरित्राकडे न पाहातां त्यांच्या ग्रंथोक्तींच्या दृष्टीनें त्याजकडे पाहावयास आपण शिकलें पाहिजे व अशा रीतीनें त्याजकडे पाहिलें असतां बुद्धिवादास पटेल अशाच प्रकारचा अनुभव ( रॅशनल् मिसूटीसिझम ) Rational Mysticism त्यांच्या ग्रंथांत सांगितला आहे असें दिसून येईल. "

## ग्रंथाचा परिमल कसा घ्यावा

सत्पुरुषांनीं जे जे ग्रंथ लिहून ठेविलें आहेत अगर वचनें टिपून ठेविलीं आहेत त्यांचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास असें दिसून येईल कीं, तें त्यांचें लिखाण कोणच्याहि भूमिकेवर असणाऱ्या अशा सर्व जनाकरितां असतें. अगदीं तमोगुण वृत्तींचे लोकांपासून शुद्ध सत्वगुणी वृत्तींचे लोकांपर्यंत, एवढेंच नव्हे तर साक्षात्कारी पुरुषांनाहि उपयोगी पडेल असें ज्ञान त्यांत ग्रथित केलें असतें. ज्ञानाचा परिपाक ज्या अवस्थेंत होतो तीच सर्व श्रेष्ठ अवस्था होय. त्या अवस्थेप्रत पोंचलेल्याचे आत्मसाक्षात्कारपर उद्गार त्यांचे ग्रंथांत असणें ओघानेंच प्राप्त होतें. ही गोष्ट या दीपाचे शिरोभागीं उद्धृत केलेल्या दिव्य वचनावरून कळून येईल. वाच्यार्थ सर्व साधारण लोकांकरितां असतो; परंतु अध्यात्माचे व आत्मप्रचीतीचे मार्गावर असणाऱ्या साधकानें त्यांतील लक्ष्यार्थच घ्यावयास पाहिजे व तोच त्यांत अभिप्रेत असतो. लाक्षणिक अर्थ कसा घ्यावा हें ठिकठिकाणीं सर्व सत्पुरुषांनीं स्पष्टपणें सांगितलें आहे. ग्रंथ कशा तऱ्हेनें लावावा अगर कोणच्या दृष्टीनें वाचावा हें ज्ञानांतील मेरू अशा एका सत्पुरुषानें सांगितलें आहे.

> सकळ वृत्तिची निजवृत्ती । अखंडैक धारणा चित्तीं ॥
> तेणें अनुसंधानें ग्रंथीं । अवधान दे चतुरा ॥

ह्यावरून साधकानें किती उच्च दर्जाचा अर्थ—लक्ष्यार्थ घ्यावयास पाहिजे हें दिसून येईल. चढता अर्थच घेतला पाहिजे कारण तो उच्च दर्जाचे साधका करितां असतो. त्यांच्या वचनांचें विवेचन थोडें लक्षपूर्वक वाचिल्यास त्यांतील रहस्य कळून येईल. सर्व सत्पुरुषांचे वचनांत अभ्यास व आत्मप्रचीती एकच दृष्टोत्पत्तीस येणें साहजिक आहे. कारण निर्गुण, निराकार स्वरूपाचा साक्षात्कार हा

एकच असणार ! ज्ञानेश्वर, नामदेव व एकनाथादिकांनीं आत्मप्रचीति गुरु प्रचीतीस पडताळून घेतल्याचें सांगितलें आहे. आत्मप्रचीती ही गुरुप्रचीतीस व शास्त्रप्रचीतीस जुळावयास पाहिजे तरच तो खरा स्वरूप साक्षात्कार ! अशा तऱ्हेनें ज्यास साक्षात्काराचा ठेवा सांपडला त्यांनें सर्व जाणलें असें होतें ! कोणताही ग्रंथ पाहिला कीं; त्यांत तेंच दिसूं लागतें.

वेदशास्त्रांचे अक्षर । श्रवणें पहावें निजअभ्यंतर ॥
अर्थ होय तदनुसार । हे ब्रह्मनिष्ठ प्रसिद्धि ॥

आनंदाच्या ऊर्मि येतात ! कारण ज्या आनंदाचा त्यांनीं अनुभव घेतलेला असतो तोच सर्वत्र भरलेला दिसतो ! कोणताहि ग्रंथ कठीण अगर दुर्बोध असा वाटत नाहीं.

सत्पुरुषांचे वचनरूपी अमृताचे तुषार कित्येक मुमुक्षू जीवांनीं ग्रहण केलें असतील व लोकांना चाखावयास दिले असतील. सत्पुरुषांचे बोल ही ज्ञानगंगा आहे. तिचा प्रवाह उघड व सतत सुरूं आहे. आजपर्यंत पुष्कळांनीं तींतील जलपान केलें असेल, अद्यापहि करीत असणारे सात्विक लोक पुष्कळ आहेत व पुढेंहि हा क्रम राहील ! ज्याची जशी कुवत असेल, इच्छा असेल व अधिकार असेल तदनुरूप त्यास ज्ञानामृत घेतां येईल. पाश्चिमात्य लोकांचे वेदांतविषयक ज्ञानाचा अभ्यास केलेल्या कित्येक लोकांना, आमच्या साधू–संताचें वेदांतविषयक ज्ञान अवलोकन करण्याचीहि बुद्धि होत नाहीं. त्यास कित्येक कारणें आहेत. एक तर आमच्या साधु–संतांचा शब्दज्ञानावर फारसा भर नसून साक्षात्काराकडे–प्रत्यक्ष आत्मप्रचीतीकडे–फार ओढा आहे. त्यामुळें त्याचेंच विवेचन त्यांच्या ग्रन्थांत स्पष्ट वा अस्पष्ट पुष्कळ केलेलें असते व आत्मप्रचीति प्राप्त करून

घेण्याचें अभ्यासावर विशेष कटाक्ष असतो. त्यामुळें ज्यास ह्या विष-यांचा गंधहि नाहीं व जे शब्दजालांतच अडकलेले आहेत त्यांना, आमच्या साक्षात्कारी सत्पुरुषांचीं भाषा व त्यांतील मर्मच कळत नाहीं. कोणत्याहि विषयाचें मर्म कळेनासें झालें ह्मणजे त्या विषयाचा कंटाळा येतो व तो विषय क्लिष्ट वाटतो. त्यांत शब्दज्ञानाचा अहंकार उठला कीं आत्मज्ञानावर भलभलते आरोप आपलें अज्ञान झांकण्याकरितां—कर-ण्याकडे प्रवृत्ति होते. आरोप नाहीं केले तरी निदान हें कांहीं गुह्य गूढ आहे एवढें समजून ह्या विषयास रामराम ठोकण्याची पाळी येते. दुसरें असें कीं, आत्मसाक्षात्काराचें रहस्य कळण्यास कांहीं पद्धतशीर व शास्त्रोक्त नित्य अभ्यास करावा लागतो. कारण तें अनुभवजन्य ज्ञान आहे. शब्दज्ञान हें बुद्धिगम्य ज्ञान आहे. आत्मानुभव हा तिचे अतीत आहे! '**बुद्धेरात्मा महान् परः**' अशीं उपनिषदें ग्वाही देतात. बुद्धीची मर्यादा विशिष्ट ठिकाणापर्यंत जाऊं शकते. बुद्धिमान् मनुष्य तेथपर्यंत शब्द ज्ञानाचे जोरावर जाऊं शकतो पण त्याचे पुढचा विषय त्यास आकलन होत नाहीं. तेव्हां आपण मजल मारली हाच शेवट, हेंच सर्वस्व अशी त्याची कल्पना होणें अगदीं साहाजिक आहे. या प्रमाणें इंग्रजी तत्वज्ञानाचा अभ्यास करणारांची स्थिति आहे. ती बदलावी व वृत्ति अंतर्मुख करून साक्षात्काराचे मार्गाकडे तत्वज्ञान्यांची व सर्व साधारण बुद्धिमान् जनतेची प्रवृत्ति व्हावी ह्मणून साक्षात्कारासच प्राधान्य दिलें आहे. पाश्चात्य ज्ञानाचा 'फिलासफीचा' ( Philosophy ) ज्यांनीं अभ्यास केला नसेल अशा आंग्लविद्याविभूषित गृहस्थांना, तसेंच पाश्चात्य तत्वज्ञानाचा गंधही ज्यांना नाहीं अशा सर्वसाधारण सुशिक्षित विद्वांनानाहि या ग्रंथाचा बराच उपयोग होईल. या ग्रंथ वाचनानें आंग्ल विद्या विभू-षितास, नानाप्रकारचे मतभेदवाल्यास व सर्वसाधारण मनुष्यास

निदान कल्पना येईल कीं, महाराष्ट्रांतील साधुसंत हे नुसते 'टाळकुटे' अगर देवाचें नांवावर 'भिक्षा मागणारे' अगर नुसते शाब्दिक बड-बडे नव्हते; तर ते परम श्रेष्ट पदास पोचलेले साक्षात्कारी पुरुष होते. एवढेंच नव्हे तर आपलें तत्वज्ञान जगापुढें लोकांना पटेल अशा तऱ्हेनें उघड मांडण्याचें सामर्थ्य त्यांचें अंगीं होतें.

## आत्मनिरीक्षण

वारकरी सांप्रदायासारखे विस्तीर्ण सांप्रदाय व रामदासी पंथासारखे विस्तीर्ण पंथ, कीं ज्यामध्यें 'ईश्वराची भक्ति करावी, त्याचें ज्ञान प्राप्त करून घेतां येईल तर पहावें व त्यायोगें आपल्या जन्माचें कल्याण करून घ्यावें' या सद्बुद्धीनें व भावनेनें, हजारों लोक सामील होतात; तसेंच आणखी कित्येक सांप्रदाय व पंथ असें आहेत कीं ज्यामध्यें वरील भावनेनें हजारों लोक सामील झाले आहेत; त्या सर्वांकडे पाहिलें तर असें दिसून येतें कीं, तो तो सांप्रदाय अगर पंथ स्थापन करणाऱ्या थोर विभूतींच्या शिकवणीकडे आणि आपल्या सर्व अनुयायांनीं ईश्वरावर श्रद्धा ठेवून व त्याची भक्ति करून आत्मज्ञान प्राप्त करून घ्यावें' ह्या कळकळीनें त्यांनीं लिहिलेले ग्रंथ व उद्धृत केलेलीं वचनें यांतील रहस्याकडे अगदीं दुर्लक्ष होत आहे! सांप्रदायांचे बाह्यांगाकडेच नुसतें लक्ष पुरविलें जातें. सांप्रदायाप्रमाणें पंढरीची वारी करावी अगर ज्यांचें जें जें उपास्य दैवत असेल त्या त्या दैवतांचे दर्शनास जावें, सांप्रदायाचें चिन्ह धारण करावें, नित्य अगर इच्छेनुरूप एकाद्या ग्रंथाचें वाचन ठेवावें, सवडीप्रमाणें भजन करावें व नामस्मरण करावें, किंवा आणखी कांहीं करावें वगैरे वगैरे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्या त्या सांप्रदायांत आम्ही आहों असें भासविण्यास जरूर लागणारे थोडे अगर फार उपचार करणें व

आचार पाळणें एवढेंच काय तें शिलक राहिलेलें दृष्टोत्पत्तीस येतें. त्या त्या सांप्रदायापैकीं बहुतेक निरुपणकार अगर प्रवचनकार यांचे शिकवणीकडे पाहिले ह्मणजे सत्पुरुषांची मुख्य जी आत्मज्ञानाची शिकवण तिचें फारच थोडें उद्घाटण त्यांचे वक्तृत्वांत आढळून येतें. त्यास दोन कारणें आहेत. एकतर त्यांना स्वत:च आत्मप्रचीति नसते. कित्येकास तर या विषयाचा गंधहि असत नाहीं. दुसरें असें कीं, सध्याचे परिस्थितींत जनप्रवृत्तिप्रमाणें आत्मप्रचीतिचे विषयावर भर दिला तर, लोकांत त्याची अभिरुची नसल्यामुळें आपल्या निरूपणास, कीर्तनास, अगर प्रवचनास कोणी येणार नाहीं व मग आपली मानमान्यता होणार नाहीं असें त्यांस वाटतें. या आणि इतर पुष्कळ नानातऱ्हेच्या अन्यकारणामुळें नामस्मरण ह्मणजे काय ? तें कसें करावें ? नाम ह्मणजे काय ? ईश्वराचें अस्तित्व कोठें कोठें आहे ? खरें आत्मकल्याण कशांत आहे ? साक्षात्कार ह्मणजे काय ? तो होतो ह्मणजे काय होतें ? वगैरे वगैरे अत्यंत महत्वाचे विषयाकडे दुर्लक्ष झालें आहे व होत आहे. सत्पुरुषांचे वचनोक्तींचें रहस्यहि जाणून घेण्याचा कोणी प्रयत्न करीत नाहीं ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे ! याचा परिणाम असा झालेला दिसतो कीं, प्रत्येक सांप्रदायांत व पंथांत भांडण तंटे उत्पन्न होऊन त्यांचे पोटभेद व पोटशाखा पुष्कळ झाल्या आहेत. अशा पोटभेदांचे निरनिराळे पुढारी झाले. कित्येकांनीं स्वतंत्र पंथच स्थापन केले ! कित्येक बाह्यस्वरूप भपकेबाज करून दांभिकपणाचा अवलंब करून अज्ञजनानां भुलवीत्त असतांना दृग्गोचर होतात. ते आपणास ‘ संत ’ म्हणवून घेतात !

नसतां हे ब्रह्मप्रचीति । शब्दज्ञानें रुढली मती ॥
असंतची ते ह्मणविती । संत आपणाते ॥

एका पंथानें दुसऱ्यापंथास नांवें ठेवावी, त्याकडे दोषैक दृष्टीनें पहावें वगैरे प्रकार सुरू असतात. एका आत्मज्ञानाचे शिकवणीकडे दुर्लक्ष केल्याचा परिणाम, अज्ञान उत्पन्न होऊन विपरीत ज्ञानामुळें कसा उत्पन्न होतो पहा ! आत्मस्वरूप जाणून घेण्याकडे अंतःकरणाची वृत्ति वळलेली आढळून येत नाहीं त्यामुळें साधुसंताचे वचनाचें रहस्य कळत नाहीं व उच्च वातावरणांत विहार करतां येत नाहीं. ज्या वचनांत त्यांनीं शेवटची उच्च अवस्था ह्मणून सांगितली आहे त्या वचनोक्तिकडे नुसतें पाहणेंहि होत नाहीं !

आत्मनिरीक्षणाचें पर्यालोचन करतां करतां उपरिनिर्दिष्ट वस्तुपरिस्थितीस अपवादादाखल दुसरी चांगली बाजूहि आढळून येते. हल्लीं सुद्धां निरनिराळया सांप्रदायामध्यें, पंथामध्यें व उपासनामार्गामध्यें कित्येक साधुपुरुष आढळून येतात. कित्येक ठिकाणीं ज्ञानसंपन्न स्त्रियाहि पहावयास सापडतात ! अशा विभूति मात्र लोकांचे पुढें पुढें नेहमीं दिसणार नाहींत. त्या सहजासहजीं केव्हां प्रगट होतील किंवा त्यांचें—पाशीं गेल्यावर त्यांचे सहवासानें त्यांचे विभूतिमत्व कळून येईल. रत्नाचें तेज त्याचें सान्निध्यांत येणाऱ्या सर्व जनास आपोआप प्रगट होत असतें. तें झाकून राहात नाहीं. तद्वत् दैवयोगानें सत्पुरुषांशीं सान्निध्य प्राप्त झालें कीं त्यांचें तेज साहजीकपणें दृगोचर होतें. त्यांची ती शांत मुद्रा प्रेमळ नेत्रकटाक्ष, हास्ययुक्त, गोड, तेजस्वी पण मृदु भाषण, त्यांतील साक्षात्काराची छटा, सर्वांशीं त्यांची प्रेमाची वागणूक व अगत्य, हीं पाहिलीं म्हणजे त्यांच्या सान्निध्यांत वावरणाऱ्या मनुष्यास आपण कांहीं विशेष आनंदाचा उपभोग घेत आहों असें वाटल्याशिवाय राहणार नाहीं. कारण सत्पुरुषांचे भोवतालचें वातावरणच आनंदमय असते ! अशांचा समागम मुद्दाम त्यांचा शोध करून करावा, त्यांच्या हिताच्या गोष्टीं

ऐकाव्या, त्यांचे अनुग्रहास आपणास पात्र करून घ्यावें व आपलें आत्मकल्याण साधावें !

सदा संतापाशीं जावें । त्यांचे जवळीं बैसावें ॥
उपदेश ते न देती । तरी ऐकाव्या त्या गोष्टी ॥
तेचि उपदेश होती । त्यांही कष्ट नष्ट जाती ॥

साधुसंत खरें ज्ञान कशास ह्मणतात, साक्षात्कार करून घेण्या-बद्दल उच्च रवानें घोषणा कशी करतात व त्यांतील अनुभव स्पष्टपणें कसें सांगतात तिकडे सर्वांचें लक्ष जाणें अत्यंत जरूर आहे. मग अभ्यास करून साक्षात्कार केव्हां होईल तो होवो?

कांहीं अंशीं सध्याच्या सामाजिक व शैक्षणिक परिस्थितीमुळें म्हणा, कांहीं अंशीं हल्लीच्या राजकीय व आर्थिक परिस्थितीमुळें ह्मणा किंवा कांहीं अंशीं सध्याचे युगमहात्म्यामुळें ह्मणा, कोणत्याहि वर्गाचे व जातीचे हातून स्वधर्मानुष्ठान बरोबर होत नाहीं. त्याबरोबरच मनाचा कमकुवतपणा वाढत गेल्यामुळें इंद्रियें विषयोन्मुख व बाह्य-वर्ती झालीं. त्याचा परिणाम असा झाला कीं धर्माचें, नीतिचें अगर समाजाचें कोणतेंहि बंधन आपणावर असूं नये मनास मानेल तसें वागावें अशी प्रवृत्ति आपोआप उत्पन्न होत गेली. त्यामुळें खरा ज्ञान संग्रह बाजूस राहून दंभ वाढत गेला. निरनिराळीं नाना मतें प्रस्थापित होऊं लागलीं. सत्पुरुषांचें सांगणें काय आहे ? त्यांच्या वचनांचा मतितार्थ काय आहे हें कळेनासे होऊन लोक भलभलते मार्गास लागू लागले. सर्व धर्मामध्यें हीच परिस्थिती उत्पन्न झाल्याचें दिसून येईल! हें कालपुरुषाचें महात्म्य आहे ! तशी त्याची इच्छा दिसते ! अस्तु.

## मुमुक्षुत्व

अशा विपरीत परिस्थितींतहि सर्व जतनेच्या चित्ताचें बारका-ईनें निरीक्षण केल्यास असें स्पष्ट आढळून येतें कीं एकंदर खळबळ-

लेल्या वातावरणांत सुद्धां स्वधर्म जाणून घेण्याची सर्वांस आतुरता आहे. सर्व साधारण मनुष्यासहि असें वाटतें कीं स्व–धर्माचें खरें रहस्य काय हें आपणास समजावें, त्याप्रमाणें थोडें तरी आचरण व अनुष्ठान आपणाकडून घडावें ह्मणजे आपणास खरें सुख प्राप्त होईल व अंतःकरणास समाधान प्राप्त होईल. सर्व साधारण मनुष्याची ही स्थिती मग बुद्धिमान् मनुष्यास व खऱ्या मुमुक्षूस या विषयांत खोल शिरावेसें वाटल्यास आणि साधुसंतांच्या शिकवणीचें मर्म समजावून घ्यावें व स्वधर्माची ओळख करून घ्यावी अशी तळमळ लागल्यास नवल तें काय ? अशी इच्छा बहुतेक सर्वत्र दिसून येते हें सुचिन्ह होय ! साधुसंतांचें वचनांचें अखंड पाठांतर जेथें सुरू असेल, क्वचित् काळीं स्वस्थ चित्तानें त्यांच्या ग्रंथाचें परिशीलन जे करीत असतील किंवा परमेश्वरी कृपेमुळें ज्यांना बौद्धिक सामर्थ्य मिळालें असेल व जे उच्च वातावरणांत विहार करीत असतील त्या सर्वांनीं सत्पुरुषांच्या वचनांच्या शाब्दिक अर्थाकडे केवळ न पाहतां, त्यांच्याकडे पाहण्याची कोणती अध्यात्मिक दृष्टी ठेविली पाहिजे हें जाणलें पाहिजे. साधूसंतांनीं कृपाळू अंतःकरणानें आपल्या उद्धाराकरितां निरनिराळ्या तऱ्हेनें व नाना प्रकारांनीं बोधामृत पाजिलें आहे. कधीं फलाचें आमीष दाखवून तर कधीं बुद्धिवाद करून, तसेंच केव्हां गोड शब्दानें तर केव्हां रागाचा आविर्भाव आणून, ज्याच्या त्याच्या अधिकारपरत्वें घेता येण्याजोगें अमृतपान त्यांनीं करविलें आहे !

## देवयानपंथ

साधुसंतांनीं आत्मप्रचीतीचा मार्ग सर्व तऱ्हेच्या भूमिकेवर असणाऱ्या लोकांना कळण्याकरितां अगदीं उघडा करून सांगितला आहे. त्यांत गुह्य असें कांहीं ठेविलें नाहीं. साधकानें त्यावर जाऊन डोळे उघ–

हून मात्र पाहिलें पाहिजे. तत्वज्ञानाची पूर्ण अवस्था साक्षात्कार ही होय ! त्या अवस्थेप्रत जाण्यास जो मार्ग आहे तो **प्रकाशमय मार्ग** आहे. ह्याच मार्गानें ते गेले व ह्याच प्रकाशमय मार्ग ते सांगून टाकतात. हा **देव**—म्हणजे प्रकाशमान् व **यान**—ह्मणजे पंथ आहे ह्मणून आह्मी ह्यास **देवयानपंथ** असें नामाभिधान दिलें आहे. हाच **तजोपथ** होय ! यांस श्रुति प्रामाण्य आहे असें ह्मट-ल्यास कित्येकास जरा चमत्कारिक वाटेल पण त्यांनीं हा ग्रंथ समूळ वाचल्यानंतर मग आपलें मत बनवावें असें त्यास सांगणें आहे. श्रुतीमध्यें देवयान पंथाचें वर्णन आहे. **मुण्डक, छांदोग्य, कौषी-तकी, मैत्रायणीय** वगैरे उपनिषदांत याचें बरेंच वर्णन आढळून येतें. छांदोग्य उपनिषदांतील लहान उतारा खालीं देत आहों.

**आदित्याश्चन्द्रमसं चन्द्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एनान्ब्रह्मगमत्येष देवयानः पन्था इति ।**

**[ —छांदोग्य ५-१०-२ ]**

भावार्थः— ते ( उपासक-साधक ) सूर्य लोकापासून चंद्र-लोकास, चंद्रलोकाहून विद्युत्— अग्निलोकाप्रत, नंतर तेथून अमानव-वायुरूप पुरुषाप्रत जातात. शेवटीं तो अमानव पुरूष त्यांना ब्रह्माप्रत नेतो. हा देवयान पंथ होय !

**सत्येनपन्था विततो देवयानः । [ —मुण्डक ३--५ ]**

असेंहि मुण्डकोपनिषदांत सांगितलें आहे.

साधुसंतांनीं वर्णिलेल्या देवयान पंथाचें वर्णन या दीपाचे शिरोभागीं उद्धृत केलेल्या संतश्रेष्ठ **निवृत्तिनाथ** व **ज्ञानेश्वर** महाराजांचें वचनावरून थोडक्यांत कळून येईल. श्रुतीमध्यें वर्णन केलेल्या देवयान—प्रकाशमय—मार्गाचें, साक्षात्काराचें दृष्टीनें साधुसंतांनीं

वर्णन केलेल्या ' देवयानपंथा ' शीं ऐक्य आहे असें दिसून येईल. ह्याच तत्वाकडे लक्ष देऊन आम्ही या ग्रंथास उचित असें नामाभिधान दिलें आहे.

पूर्व सुकृतामुळें सात्विकवृत्तीचा उद्भव होऊन अंत:करण शुद्ध झाल्यावर व तीव्र मुमुक्षुत्व प्राप्त झाल्यावर या पथावर नेऊन सोडणारा मार्गदर्शक कोण बरें भेटेल ?

---



# दीप २ रा.

## मार्ग दर्शक

(सहस्रदलपंकजे सकलशीतरश्मीप्रभम् ।
वराभयकरांबुजं विमलगन्धपुष्पाम्बुजम् ॥
प्रसन्नवदनेक्षणं सकलदेवतारूपिणम् ।
स्मरेत् शिरसि हंसगं तदभिधानपूर्वं गुरुम्) ॥

स्वराज्यापासून भ्रष्ट झालेल्या व भवदारिद्र्यांत पडून दुःख भोगित असलेल्या जीवानां सद्गुरु पुनः स्वराज्यावर स्थापन करीत असतात ! आपलें कृपारूप वस्त्राचें प्रावरण घालून अक्षय्यसुखाचें अनुभवरूपीं ताटांत बोधपक्वानें वाढून नित्यतृप्ति देतात. एवढेंच नव्हे तर त्यांस आत्मसाक्षात्काराचे घास भरवतात ! विज्ञानरूपी अलंकार प्रचीतीच्या स्वकरानें त्यांच्या अंगावर घालतात व निर-तिशयानन्द सुखसिंहासनावर त्यांस बसवून त्यावर अद्वैताचें एक-छत्र धरतात ! इतकें करून असें स्वराज्य दिल्याची आठवण त्यांचें ठायीं नसतें. अशा प्रकारें आपलें स्वस्वरूपदान देणारा, अखिल सृष्टींत परम उदार, कृपाळू व सनातन असा **श्रीसद्गुरुराजा** शिवाय दुसरा कोण बरें सापडेल ! !

परीस हा आपल्या स्पर्शानें लोखण्डास सुवर्णपणा आणतो. त्यास लोहाचें ठिकाणीं परिसत्व—आपलेपणा—आणतां येत नाहीं. पण सद्गुरूची मात्र गोष्ट तशी नाहीं. सद्गुरूनीं स्पर्श करतांच सत्शिष्यास सद्गुरुत्वच प्राप्त होतें !

आपुल्या सारिखे करिती तात्काळ ।
नाहीं काळ वेळ तयालागीं ॥

अशा ह्या स्वत्व देणाऱ्या सद्गुरूचा महिमा कोणास वर्णन करतां येईल ? सत्शिष्यास बोधामृत पाजण्याकरितांच सद्गुरु प्रगटतात !

चंपक तरुवरा पोटीं । नसेचि ते पुष्पाची पेटी ।
वृक्षाचि पासून शेवटीं । पुष्पें येती अभिनवें ॥
तैसा बोधामाजीं अभिनव । गुरुसत्ता स्वानुभव ॥
प्रगटला सद्गुरुराव । शिष्यासी परमार्थे ॥

## गुरूची आवश्यकता

एकदां देवदत्त या नांवाचा एक मनुष्य एका गावीं जाण्याच्या उद्देशानें घरांतून निघाला. वाटेंत चोरांची व त्याची गांठ पडली. त्यांनीं त्यास लुटून त्याचें सर्व धन हरण केलें. नंतर त्याचे डोळे बांधून घोर अशा अरण्यामध्यें त्यास सोडून दिलें. त्यावेळीं देवदत्ताची स्थिति केवीलवाणी झाली. त्यास दृष्टी नसल्यामुळें पायांत काटे मोडूं लागलें, ठेंचा लागूं लागल्या व आडरानांत फिरूं लागल्यामुळें अरण्यांतील झाडांशीं टकरा बसून कपाळ फुटूं लागले. त्यांतून त्याला मार्ग न सांपडल्यामुळें तो कावरा बावरा व कासावीस झाला. त्यावेळीं देवदत्तानें अत्यंत लीन होऊन भक्तियुक्त अंतःकरणानें ईश्वराची करुणा भाकली. त्याचा परिणामच कीं काय कोण जाणें, इतक्यांत एक मनुष्य येऊन त्यानें त्याच्या दृष्टींचें पटल दूर केलें, त्याला आडरानांतील अंधःकाराच्या मार्गांतून जवळचे वाटेनें उजेडाचे मार्गावर आणलें व सांगितलें कीं " हे देवदत्ता, तूं ह्या मार्गानें गेलास ह्मणजे इच्छित स्थळीं जाशील ! " ह्या गोष्टींतील दृष्टांताप्रमाणें काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, वगैरे षड्रिपु जीवास गाठतात व त्याचे ज्ञानाचा ठेवा लुटतात. नंतर त्याच्या दृष्टीवर अज्ञानाचें आवरण घालून घोर अशा भवाटवींत त्यास

सोडून देतात. अज्ञानाचें आवरण असल्यामुळें त्यास दु:खें भोगावीं लागतात. त्रिविधतापहि सोसावे लागतात. या त्रिविधतापांनीं पोळून कासावीस झाल्यावर त्याचें अंत:करण अत्यंत मृदु होतें. ह्या भवाटवीमधून मला कोण केंव्हां सोडवील काय ? अशी सारखी तळमळ त्यास लागते. असें तीव्र मुमुक्षुत्व प्राप्त होतांच सद्गुरु त्यास आपोआप भेटतो. तो दयार्द्र अंत:करणानें त्याजवर कृपा करण्याकरितां त्याचें अज्ञानावरण दूर करून त्यास दिव्य दृष्टी प्राप्त करून देतो ! अज्ञानांधःकारांतून जवळचे मार्गानें त्यास प्रकाशमय मार्गावर आणतो. अर्थात् स्वस्वरूप साक्षात्कार करून देतो. नंतर ह्या प्रकाशमय मार्गानें जाण्यास सांगून अढळपद गाठण्यास सांगतो ! गुरूचे आज्ञेप्रमाणें अभ्यास करीत या पंथाचें आक्रमण करीत गेल्यास तो परब्रम्हस्वरूपीं लीन होतो ! तेव्हां ह्या प्रकाशमय मार्गावर आणणाऱ्या मार्गदर्शकाची किती जरूरी आहे हें लक्षांत आलें असेलच.

## विभूतींचें नानाविधत्व

सत्पथावर जाण्याकरितां मार्गदर्शकाची आवश्यकता पटल्यावर योग्य मार्गदर्शक कसा सापडेल ह्याचा शोध करण्याकडे अंत:करणाची प्रवृत्ति होत असते. बौद्धिक शिक्षणाचा प्रसार व वाढ होत चालल्यामुळें कोणतीहि गोष्ट बुद्धीच्या कसोटीस लावून पाहण्याकडे प्रत्येकाची प्रवृत्ति होणें अगदीं साहजीक आहे. अलीकडे सर्वांस नुसत्या शाब्दिक ज्ञानाचा व तदनुषंगानें येणाऱ्या दंभाचा अगदीं वीट आलेला आहे. खरें तत्वज्ञान समजावून घेण्याची मुमुक्षुची तीव्र इच्छा असते. आत्मप्रचीतीशिवाय ती इच्छा परिपूर्ण होणें शक्य नसते. शब्दज्ञानापेक्षां आत्मप्रचीतीकडे—आत्मसाक्षात्काराकडे पुष्क-

ळांचीं मनें सध्यां ओढलीं जात आहेत असें पहावयास सांपडतें. पाश्चात्यांनासुद्धां Mysticism ( मिस्टिसिझम ) हें काय गुह्य आहे याचें गूढ पडलें आहे ! आणि हें कोणी उकलून दाखवितो कीं काय इकडे त्यांचें लक्ष लागून राहिलें आहे. हें कार्य आमचें साधु-संतांनीं केलें आहे. सत्पुरुषामध्येंहि पुष्कळ प्रकार आढळून येतात. त्यांचेमध्यें वंद्य अशा सर्वच विभूति असतात. पण ज्ञानलालसा तृप्त करणारे सत्पुरुष फारच थोडे दृष्टीस पडतात. साधकाचे दृष्टीनें ज्ञानलालसा तृप्त झाल्याशिवाय त्याचें समाधान होत नाहीं. आत्मकल्याणाचे मार्गावर त्यास जातां येणार नाहीं. त्यास **शाब्दे परे च निष्णातम्** । असाच गुरु भेटावयास पाहिजे व तोच सद्गुरु होय ! तत्वज्ञानाचे भूमिकेंत खोल शिरून ज्ञानधनाचा ठेवा सांपडतांच कित्येक हर्षातिरेकानें तेथेंच आनंद उपभोगित, **जडमूढ** होऊन पडून राहतात. त्यानां जगाची फिकीरहि असत नाहीं. दुसरे हा ठेवा सापडतांच आनंदानें **उन्मत्त** होऊन देहाचा एकदम त्यागच करतात व अशाप्रकारें स्वस्वरूपीं लीन होऊन अखंड आनंदाचा उपभोग घेत राहतात. कित्येक लहान मुलांप्रमाणें निर्विकार अशी **बाल** वृत्ति धारण करून देह असेपर्यंत संचार करीत असतात. आणखी कित्येक हा ठेवा सापडतांच आनंदानें बेहोष होऊन तसेंच वागतात. त्यांची वर्तणूक जगांत **पिशाच्चवत्** आढळून येते ! कित्येक मात्र असें असतात कीं, हा ज्ञानाचा ठेवा सांपडला तरी निरतिशयानंदामुळें बेहोष न होता अगर त्या आनंदांतच गढून न राहता, तो ठेवा संपूर्ण प्राप्त करून घेऊन त्याचा नित्य उपभोग घेतात. एवढेंच नव्हें तर जगाच्या कल्याणाकरितां दुसऱ्यासहि तो देत असतात ! वर वर्णन केलेल्या सर्व प्रकारच्या सत्पुरुषामध्यें ज्ञानाच्या दृष्टीनें कोणताहि कमी अधिकपणा असत नाहीं. पण

साधकाचे दृष्टीनें पाहतां शेवटची जी अवस्था वर्णन केली त्या अवस्थेंत असणारे सत्पुरुषच त्यास उपयोगी पडतात. कारण असे सत्पुरुषच सत्‌शिष्यास योग्य मार्ग दाखविण्यास व त्यावर कृपा करून त्यास आत्मसाक्षात्कार करून देण्यास समर्थ असतात. असे शब्द-ज्ञानांत पारंगत व अपरोक्ष साक्षात्कारी सद्‌गुरू भेटणें फार विरळा !

## उपदेश रहस्य

मोक्षदात्या सद्‌गुरूंनीं सत् शिष्यावर कृपाछाया करण्याचें एकवार मनांत आणल्यास ते ती कोणत्या प्रकारें करतील हें सांगतां येणार नाहीं. वेळ प्रसंग व त्यावेळची त्यांची मनोधारणा यावर सर्व अवलंबून राहील. गुरूपदेश लाखो लोकांना झालेला व होत असलेला आपण पाहतों व ऐकितों. गुरु मंत्रोपदेश करतात, ' नाम ' देतात, ' कान फुंकतात, ' ' माळ घालून नाम सांगतात ' अगर ज्या त्या सांप्रदायाप्रमाणें आणखी कांहीं करतात अगर सांगतात असें नेहमीं ऐकूं येतें. पण प्रसन्न अंतःकरणानें गुरूनें शिष्यावर कृपा करणें अनुग्रह करणें ही गोष्ट अगदीं निराळी आहे. तें भाग्य फारच थोडयांना लाभतें ! अधिकारपरत्वें योग्य शिष्यास मात्र सद्‌गुरु तात्काळ स्व-स्वरूप साक्षात्कार प्राप्त करून देतात. सद्‌गुरु जेव्हां आपल्या शिष्यावर कृपा करतात त्यावेळीं त्याचें अंतःकरणांत शिरून त्याचें बुद्धितत्वास चालना देतात व सर्व वृत्ति एकदम स्वरूपीं लीन करतात ! **उपदेशाचें रहस्य** हें असें आहे. हें कार्य तें नुसत्या दृष्टी विक्षेपानें करतात, नुसत्या शब्दानें करतात किंवा शिष्याचे देहास स्पर्श करून साधतात.

**ईक्षण भाषण स्पर्शन । गुरु अनुग्रह प्रमाण ॥**
**त्रिविध दीक्षा पावन । करिती सकळ ॥**

प्रभू रामचंद्रानीं, हनुमंताची प्रथम गांठ पडतांच त्याचें अंतःकरण काबीज केलें व त्यास समाधी अवस्थेंतच कांहीं काल ठेविलें! योगिमान्या अशी जी मदालसा सती तिचा कनिष्ठपुत्र अलर्क या नांवाचा होता. तो राज्यभ्रष्ट झाल्यावर मातेच्या लिखिताप्रमाणें भगवान् दत्तात्रेयाकडे गेला व म्हणाला कीं " महाराज, मला अत्यंत दुःख झालें आहे. त्याचा निरास करा." त्यावेळीं श्रीदत्तप्रभूनीं त्यास एकच प्रश्न विचारला कीं " हे अलर्का, तुझें दुःखाचें स्थान दाखव ह्मणजे तें नाहींसें करूं." एवढ्या संभाषणानेंच-एका प्रश्नानेंच त्यास ज्ञान झालें! त्याची वृत्ति अंतर्मुख झाली. पंचीकरण महावाक्यांचें विवरण तो लगेंच करूं लागला व तत्क्षणीं स्वस्वरूप साक्षात्कारी झाला! अगदीं अलीकडील सर्वांचें परिचयाचें उदाहरण ह्मणजे स्वामी विवेकानंदांचें होय! सद्गुरु रामकृष्ण परमहंस ह्यांनीं स्वामीजींवर कृपा करावयाचें मनांत आणतांच ' तुला प्रत्यक्ष देव दाखवितो ' असें म्हणून त्यांचें हृदयास स्पर्श केला. झालें. विवेकानंदांचें कार्य झालें! तत्क्षणींच त्यांची समाधी लागून त्यास स्वस्वरूप साक्षात्कार प्राप्त झाला! अशाप्रकारें कितीतरी उदाहरणें दाखवून देतां येतील. एक वेळ सद्गुरूनीं आनंदाचा उपभोग दिल्यावर स्वानंद साम्राज्याचा अखंड उपभोग घेणें हें सर्वस्वी शिष्याचें दृढतर अभ्यासावर अवलंबून आहे.

## सद्गुरु काय करतात ?

पूर्व सुकृताचे जोडीमुळें आपोआप सद्गुरु भेटून त्यांनीं ह्या देवयान पंथावर आणून सोडिलें तरी हा मार्ग आक्रमण्यास फार दुर्गम आहे. त्यास सतत गुरुकृपारूपी छत्राची आवश्यकता आहे. सद्गुरूनीं आपल्या शिष्यास या देवयान पंथावर आणून सोडल्यावर सुद्धां त्यांचें

त्याजवर लक्ष असतें. या दुर्गम मार्गावर आले तरी त्याचा शेवट गांठणें फार कठीण असतें. पूर्व प्रारब्धाचे प्रतिबंधामुळें अभ्यासांत व्यत्यय येतात, चित्तास विक्षेप उत्पन्न होतो व मन अस्थिर होतें. गुरुवरील दृढ विश्वासामुळें अशा कठीण प्रसंगीहि जो वरचेवर लीन अंतःकरणानें गुरूची करुणा भाकितो त्यास सद्‌गुरु कल्पवृक्षाप्रमाणें फलद्रुप होतात. याचें कारण असें कीं मातेचें बालकावर जसें निष्काम प्रेम असतें तसें सद्‌गुरूचें सत्‌शिष्यावर असतें! मुलाची भूक आईस लागते म्हणतात! ती वेळेवर त्यानें न मागतांहि त्यास दुग्ध–पान करते. कूर्मीचें मातृप्रेम अलौकिक आहे. असें सांगतात कीं, कूर्मीस स्तन नसल्यामुळें दुग्धपान करवितां येत नाहीं. ती आपल्या अर्भकाकडे नुसतें पाहते तेव्हां त्या कृपामृतानेंच त्या अर्भकाची भूक भागते. तद्वत् सद्‌गुरुनीं फक्त सत्‌शिष्याचें स्मरण केलें कीं त्याचीं सर्व संकटें दूर होतात, मन शांत होते व तें आनंदानें भरून जातें. तो आपोआप पुढील टप्पे गाठीत जातो. शिष्यानें करुणा भाकण्याची आवश्यकताहि सद्‌गुरू ठेवीत नाहीं. सद्‌गुरुमायेची केवढी ही थोरवी! जीव हा जरी चैतन्यांश असला तरी त्यास तसें ज्ञान होण्यास सद्‌गुरूची आवश्यकता आहे.

निजमुख दिसे दर्पणीं । तेवी स्वरूप तें अंतःकरणीं ॥
स्वयेंचि परब्रह्म असोनी । सद्‌गुरुवीण नुमजे ॥

गुरूनें कृपा केल्याशिवाय व मस्तकीं हात ठेविल्याशिवाय ब्रह्मज्ञानाची किल्ली हातीं येणार नाहीं. गुरुकृपेशिवाय साक्षात्कार होणें अशक्य आहे असें **ज्ञानेश्वर** महाराजहि सांगतात. त्यायोगें हृदयींचें रहस्य हृदयांतच सांपडते व निरंजन स्वरूपाचा साक्षात्कार होतो असें **भेरूस्वामी** म्हणतात.

श्रुतीचें सार गुरुकृपे आतुडे। हृदयींचें रहस्य हृदयीं सांपडे ॥
निरंजन डोळा घालूनीं निवाडे। पहावें आस्तीकपण ॥

## गुरू ह्मणजे कोण ?

तत्वमसि महावाक्याचा साक्षात्कार सद्गुरूकरून देतात! सद्गुरूस देवापेक्षांहि थोर मानलें आहे याचें प्रत्यंतर ह्मणजे सर्वांना परिचित असलेली भगवद्भक्त नामदेव महाराजांची गोष्ट होय. प्रत्यक्ष पांडुरंगानें आपला प्रेमळ भक्त जो नामदेव त्यास खरें ज्ञान होऊन स्वस्वरूप साक्षात्कार होण्याकरतां सद्गुरूकडे जाण्यास सांगितलें. ह्यावरून सद्गुरूची थोरवी केवढी आहे हें कळून आलें असेलच. सद्गुरू ह्मणजे देहधारी जडमूर्ती या भावनेनें व अर्थानें त्याजकडे पहावयाचें नाहीं, तर त्याहि पलिकडे जाऊन सूक्ष्म विचारांतीं, सद्गुरू म्हणजे उच्चतत्व आहे असें जाणलें पाहिजे. ही गोष्ट ह्या दीपाचे आरंभीं सद्गुरू स्तवनाचा जो श्लोक घेतला आहे त्यावरून दृष्टोत्पत्तीस येईल. त्या श्लोकाचे अर्थाकडे पाहिल्यास ह्या श्लोकांत सद्गुरूचें ध्यान सांगितलें आहे हें ध्यानीं येईल. हें ध्यान प्रथम सगुण रूपाचें सांगून नंतर निर्गुण रूपाचे सांगितलें आहे. ह्यावरून असें लक्षांत घेतलें पाहिजे कीं गुरू हा जडदेहात्मक नसून आपल्या ठिकाणीं असलेल्या सर्वव्यापी तत्वासच गुरू समजण्यांत आलें आहे.

**श्लोकार्थ** असा कीं:— ज्यास दोन हात आहेत व त्यापैकीं एका हातांत परिमलानें घवघवींत असें सुंदर कमल ज्यानें धारण केलें आहे, दुसरा हात अभयमुद्रा दर्शित असल्यामुळें भक्तजनांना जणू काय अभय वरदानच देत आहे असें भासते, अत्यंत शांत व प्रसन्न मुद्रा असून ज्याचा दृष्टिक्षेप भक्तांचीं अंतःकरणें भरून सोडणारा आहे, ज्याचें रूप म्हणजे सकल देवतांचें चैतन्यच, अशा सद्गुरूच्या सगुण रूपाचें मी

ध्यान करतों ! ह्या सद्गुरूचें वास्तव्य सहस्रदलकमलांत आहे. चंद्र-मंडलांतील सर्व शांत तेजोरश्मी एकवटून जणूं तेजोराशीच बनली आहे असें ज्याचें रूप आहे व जेथें जाण्यास सोऽहं वृत्तिरूप विहंगम मार्ग आहे अशा मूर्ध्नि स्थानांत वसत असलेल्या प्रकाशरूप सद्गुरूस अभि-वादन करून त्याचें मी ध्यान करतों !!

गुरु म्हणजे बुद्धीनें अतीत असलेला आत्मा होय ! दुसरें कांहीं नाहीं हेंच सत्य आहे. म्हणून त्याची प्राप्ती होण्याकरितां बुद्धिवानानें प्रयत्न केला पाहिजे. मूढ अशी जी जगन्माया—जीस अविद्या असें म्हणतात व जिच्या आवरणानें मी देह आहें अशी भावना होते, ती ज्या आत्म्याचे साक्षात्कारानें निरास पावते, त्यासच गुरु हा शब्द लावतात ! इतक्या उच्च अर्थानें विचार केल्यास गुणातीत, रूपातीत व मायादि गुण भासकाचा नाश करणारें परब्रह्म हेंच गुरु होय !!

## शिष्य ज्ञानापासून कसा च्युत होतो ?

सद्गुरु कृपेनें ज्ञानसंपन्न झाल्यावर सुद्धां त्यांनीं उपदेशिलेल्या मार्गावरून जातां जातां शिष्यानें त्यांनीं आज्ञापिल्याप्रमाणें, नित्य अभ्यास करण्याचें सोडलें; अगर विहित आचार सोडला आणि जे थोडें ज्ञान प्राप्त झालें आहे तेंच सर्वस्व आहे, असें अहंकारानें समजून, तशी आपली भलतीच कल्पना करून घेऊं लागला, तर तो शिष्य हळू हळू ज्ञानापासून च्युत होऊं लागतो. प्रपंचांत वासना-रूपीं वनामध्यें हें ज्ञान षड्रिपूंचें वाऱ्यानें उडून जाऊन नष्ट होऊं नये म्हणून, वैराग्ययुक्त अंतःकरणानें सतत अभ्यास करण्याचा सद्गुरु उपदेश करतात. नाहीं तर गुरुचे उपदेशानें हा जरी श्रीमान् झाला तरी मनामध्यें प्रपंचाचा ओढा ठेविल्यास प्रवृत्ति मार्गावर येऊन

त्तो वेडा बनतो. देहरूप विषवल्लीचें रानामध्यें ज्ञानरूपी अमृतवल्ली लाविली व दोहोंचीहि सारखी जोपासना केली, तर दोघांनांहि अपरंपार फळें येतात. तीं दोन्हीं प्रकारचीं फळें भक्षण केलीं ह्मणजे सुखदुःख परंपरा सुरूं होते, चित्तास स्वस्थता येत नाहीं व द्वैत व अद्वैताचे उमासे आलटून पालटून येतात. मग ज्ञानाचा उपयोग आसुरी संपत्ती मिळविण्याकडे होतो. तो कोकशास्त्री निपुण होतो; मंत्रशास्त्रांत तज्ञ होऊन शक्ति मार्गाच्या सर्व क्रिया जाणतो आणि जारणमारण, औषधीप्रयोग वगैरे सर्व हस्तगत करतो. ज्योतिष अचूक वर्तवितो, मुहूर्त सांगतो व मनांतील गोष्टी ओळखतो. अंगारे धुपारे देतो, लोकांचे अंगांतील पिशाच्च काढतो! आणि सर्व साधारण मनुष्यास अशक्य असें नाना चमत्कार दाखवितो! अशाप्रकारें प्रवृत्तिमार्गावर पडल्यावर त्यास उन्मनीरूप विश्रांति कशी प्राप्त होणार! पूर्वपुण्याईरूपीं धन अशा तऱ्हेच्या क्षुद्र सिद्धींचे मागें लागून नाहींसें करून टाकतो. गुरुकृपा झाली तरी विरक्ती नसल्यामुळें भक्ति उत्पन्न होत नाहीं. उलट विषयाकार वृत्ति होते. मी कोण? कोठला? मला ज्ञान होऊनसुद्धां माझी वर्तणूक कशी आहे? याचा अंतःकरणांत जो विचार करीत नाहीं त्यास काय म्हणावें?

स्वयें सुखात्मा गहन। देहबुद्धिनें होय खिन्न॥
जाणतपणीं शोकार्णवीं। बळेंची उडी घाली।

अशा प्राण्यास रामदासी सांप्रदायांतील मन्यारगुडी मठाचे प्रसिद्ध साक्षात्कारी सत्पुरुष **मेरुस्वामी** यांनीं **पढतमूर्ख** अशी संज्ञा दिली आहे. समर्थ रामदास स्वामीनीं पढतमूर्खाचीं लक्षणें दासबोध ग्रंथांत पुष्कळ सांगितलीं आहेत. तीं सर्वांचे वाचनांत असतीलच. मेरुस्वामीनीं जरा निराळ्या प्रकारें याचीं लक्षणें फार बहारीनें

वर्णन केलीं आहेत. हा पढतमूर्ख गुरुकृपारूप गंगा सेवन करावयाची सोडून रस्त्यांतील गटाराचें पाणी पितो. लोकांचें ज्योतिष सांगतो पण त्याचें घरीं द्रव्यनिधीचा कोळसा होतो! स्वसुखनंदनवनांत विहार करावयाचा सोडून भ्रमाचें अरण्यांत भटकत राहतो. अजरामर असून मरणदुःखास भितो. यापद्धतीचें वागणुकीनें जन्ममरणाचे फेऱ्यांत पुन्हां सापडतो. त्याचें सत्याचें पीक बुडून असत्याचें पीक उदंड पिकतें. अपार दुष्कृत्यामुळें सुकृत्याचें वाटोळें होतें. गुरुकृपारूप उद्यान कामानळानें दग्ध होऊन जातें ! फार काय सांगावें, पशुदेहाचा अधिकारी चुकून नरदेहांत आला व त्यातल्यात्यांत विशेष आश्चर्याची गोष्ट ह्मणजे गुरुकृपारूप सिंहासनावर तो आरूढ झाला, अशी स्थिती होते ! आत्मक्षोभ हें त्याचें दैवत, देहलोभाचें नैवेद्यानें त्यास फळलें व त्यानें स्वस्वरूपापासून त्यास च्यूत केलें कीं काय असें भासतें !

ह्मणून महद् प्रयासानें प्राप्त झालेलें गुरुकृपारूप सिंहासनपद रक्षण करावें. निदान तशी भावना तरी धरावी. अज्ञानी नुसत्या भावनेनें तरतील तर सज्ञानी तिचे अभावी बुडतील. शिष्य जरी साधनचतुष्टय संपन्न होऊन ज्ञानी झाला तरी गुरुबोधानें त्यांस निग्रहून साधनीं ठेवतात त्याचें कारण हेंच आहे. शिष्यहि त्याचें आज्ञेनुसार वागून साधनीं रत झाला म्हणजे तो केव्हांहि ज्ञानापासून च्युत होणार नाहीं हें त्यानें लक्षांत ठेवावें.

## सद्गुरु पूजन

सर्व साधुसंतांनीं सद्गुरूंचें वर्णन व स्तवन फार प्रेमळपणें निरहंकारवृत्तिनें, मोठ्या रसाळ वाणीनें अत्यंत बहारीचें केलें आहे ! तें त्यांचे ग्रंथामधून पहावयास सर्वांस सापडतेंच. सद्गुरूंचें वर्णन जितकें करावें तितकें थोडें आहे. तें संपूर्ण करणें अशक्य आहे.

तेव्हां शेवटीं श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं सद्गुरुची पूजा कशी करावी व आपण ती कशी केली हें ज्ञानेश्वरीचें १५ व्या अध्यायाचें प्रारंभीं सांगितलें आहे. त्यांचेच शब्दांत ती करून हा दीप संपवितों.

आतां हृदय हें आपुलें । चौफाळुनियां भलें ।
वरी बैसऊं पाऊलें । श्रीगुरूंची ॥ १ ॥
ऐक्यभावाची अंजुळी । सर्वेंद्रिय कुडमळी ।
भरूनिया पुष्पांजुळी । अर्घ्य देवों ॥ २ ॥
अनन्योदकें धुवट । वासना जे तन्निष्ठ ।
ते लाविलेंसे बोट । चंदनाचें ॥ ३ ॥
प्रेमाचेनि भांगारें । निवाळूनि नूपुरें ।
लेववूं सुकुमारें ॥ पदें तियें ॥ ४ ॥
घणावली आवडी । अव्यभिचारें चोखडी ॥
तियें घालूं जोडी । आंगोळिया ॥ ५ ॥
आनंदा-मोद बहुळ । सात्विकाचें मुकुळ ।
तें उमललें अष्टदळ । ठेऊं वरी ॥ ६ ॥
तेथें अहं हा धूप जाळूं । नाहं तेजें ओंवाळूं ।
सामरस्यें पोटाळूं । निरंतर ॥ ७ ॥
माझी तनू आणि प्राण । इया पाउवा लेववूं श्रीचरण ।
करूं भोगमोक्ष निंबलोण । पायां तया ॥ ८ ॥
इयां श्रीगुरुचरणसेवा । हों पात्र तया दैवा ।
जे सकळार्थ मेळावा । वाट बांधे ॥ ९ ॥
ब्रह्मींचे विसवणें वरी । उन्मेष लाहे उजरी ।
जें वाचेतें इये करी । सुधासिंधु ॥ १० ॥

---

# दीप ३ रा.

## स्वस्वरूप

हृदयस्थ पाहिला जनार्दन ॥
काळेकामय दीप देहीं दिसे ॥
माझें मज दावियेलें माझें मज दावियेलें ।
उघडे अनुभविलें परब्रह्म ॥
रविबिंबापरी प्रकाश तो केला ।
तोचि ठसावला हृदयामाजीं ॥

एकनाथ

मुक्तिचीं तीन कारणें आहेत. १ तत्वज्ञान २ मनोभंग म्हणजे मनाचें शमन व ३ वासनाक्षय. फलाभिमानरहित—निष्कामकर्में सतत करीत राहण्यानें चित्ताची शुद्धि होते. कर्में करून काय करावयाचे आहे असा मनाचा भलता कुतर्क करून घेऊं नये. विपरीत प्रारब्ध कर्मानुसार कित्येकास ज्ञानयज्ञ रुचत नाहीं! एवढेंच नव्हे तर त्यांचें मन त्या ज्ञानयज्ञाचा द्वेष करतें. ईश्वरार्पण कर्में करीत गेल्यानें चित्त शुद्ध होत जातें व श्रवणाची रुची वाढत जाते; शमदमादि साधन संपत्ति प्राप्त होते. ह्या साधनसंपत्तीच्या योगें ज्ञान प्राप्त होतें. ज्ञानानें अविद्येचा नाश होतो व अविद्येचा नाश झाला ह्मणजे मुक्ति सुखमाळ घाळते. कर्में ज्ञानास कारणीभूत होतात. अज्ञानाशीं त्यांचा विरोध असत नाहीं त्यामुळें तीं साक्षात् मुक्ति देऊं शकत नाहींत. तीं ज्ञानास उपयुक्त होतात. कर्मानें चित्त शुद्ध होऊं लागले ह्मणजे सद्गुरूस

शरण जावें व त्यापासून वेदांत श्रवण करावा. श्रवणाचें मनन करावें व अभ्यास करीत जावा ह्मणजे मनोलय प्राप्त होऊन मनाचें शमन होईल आणि शेवटीं वासनांचा नाश होईल. प्रकृतिगुणाशीं वियोग होणें व परब्रह्माशीं योग होणें याचें नांव मोक्ष. सद्सद्विचारानें विवेक उत्पन्न होतो. विवेकानें ज्ञान प्राप्त होतें. ज्ञानामुळें वैराग्य येतें व वैराग्यानें मायेचा संग तुटतो.

मी देह आहे असा अहंकार जीवानें स्वस्वरूपाचें अज्ञानामुळें घेतला ह्मणजे मग तो त्रिविध कर्में करण्यास प्रवृत्त होतो. कर्मानें बंध उत्पन्न होतो व वारंवार जन्ममरणाचे फेऱ्यांत जीव सापडतो. अज्ञान हें अपरोक्ष साक्षात्कार झाला ह्मणजे नाहींसें होतें. अज्ञानाचा नाश झाला ह्मणजे अहंकाराचा नाश होतो. देह अहंकार नष्ट झाला ह्मणजे तज्जन्य कर्मांचा नाश होतो. कर्मांचा नाश झाला ह्मणजे मग पुनः शरीर धारण करावें लागणार नाहीं व शरीरापासून उद्भवलेलीं सुख दुःखेंही प्राप्त होणार नाहींत. अशा रीतीनें शेवटीं मोक्षसुख प्राप्त होईल.

उपरिनिर्दिष्ट विचाराचे दुवे नीट लक्षांत घेऊन विचार केला ह्मणजे ज्ञानाशिवाय समाधान नाहीं असें दिसून येईल. तें ज्ञान मनोलय—मनोनाश—भंग—झाला ह्मणजे प्राप्त होतें. मनोभंगास मनोलयाचा अभ्यास करावयास पाहिजे. तो तसा केला ह्मणजे वासनाभंग होईल व शेवटीं विदेहकैवल्यदशा अनुभवण्यास मिळेल !

मन हें दर्पण । करोनि निर्मळ ॥
पाहे पा केवळ । आत्मा स्वये ॥

नामदेव

चित्तशुद्धि होण्याकरितां सद्गुरु शिष्याचे अधिकाराप्रमाणें त्यास प्रथम सत्कर्माचरण करावयास सांगतात. कारण सत्कर्मानें अनुताप

उत्पन्न होतो. निष्कामपणा अंगीं बाणून पावित्र्य अंगीं उत्पन्न होतें. कर्म कोणतें व अकर्म कोणतें हें आपोआप कळूं लागतें. सत्वगुणाचा उत्कर्ष होत जाऊन सत्वगुणप्रधान प्रकृति बनते. मन शुद्ध होत जाऊन सत्कर्माकडेच वरचेवर प्रवृत्ति उत्पन्न व्हावयास लागते. त्या योगें पुण्य जोडलें जातें व पुण्य संचयानें भगवंताचे ठिकाणीं प्रेम जडतें. भगवद्भक्तीनें विरक्ति उत्पन्न होते. त्यायोगें सद्गुरुभक्तीचा प्रादुर्भाव झाल्यावर व तशी सद्गुरुभक्ति केल्यावर मुमुक्षूस मुक्ति माळ घालते. गुरुकृपेनेंच क्रमवार ज्ञान प्राप्त होते. अखंड अनुसंधान राहून अपरोक्ष साक्षात्कार होतो. ह्मणून अपरोक्ष साक्षात्कार करून घ्यावयाचा असेल तर सत्कर्माचेंच प्रथम आचरण करावयास पाहिजे असें साधुसंत सांगतात.

कर्मे करतां करतां एका गोष्टीकडे मात्र सारखें लक्ष पाहिजे. ती म्हणजे आचरलेल्या कर्मापासून आपली अंतःकरण शुद्धि होत आहे अगर नाहीं हें पहावयास पाहिजे. अंतःकरण शुद्ध होत नसेल तर त्या कर्माचा कांहींहि उपयोग नाहीं असें समजावें. दंभ या सदरांत तें कर्म येईल. तशा कर्मानें मनोभंग होणार नाहीं व सत्पथ दृष्टीहि पडणार नाहीं.

तुका ह्मणे मन उन्मन जो होय ।
तोवरी हे सोय विधि पाळी ॥ —तुकाराम

## शब्दज्ञान विफलता

तद्वतच शब्दज्ञानाचें समजावें. ईश्वरविषयक ज्ञान व्हावें, वेदांतशास्त्राचा विषय कळावा किंवा अंतःकरणांत ईश्वराविषयीं सतत जागृति रहावी या करितां ग्रंथ वाचन श्रवण वगैरे शाब्दिक ज्ञानाची जरूरी आहे. विषय कळून तो मनास पटेपर्यंत शब्दज्ञान आवश्यक

आहे. पण एकवार विषयाचें रहस्य कळून तें मनास पटलें म्हणजे शब्दज्ञानाचा उपयोग होत नाहीं. मग अभ्यास करून अनुभवच घ्यावयास पाहिजे.

नव्हे ब्रह्मज्ञान बोलता हें शुद्ध ।
जव आत्मबोध नोहे चित्तीं ॥ —ज्ञानेश्वर

शब्दज्ञान हें बुद्धिगम्य ज्ञान आहे. आत्मा हा बुद्धीचे अतीत आहे असें प्रथम दीपांत सांगितलें आहे. तेव्हां आत्मसाक्षात्कार करून घेण्यास बुद्धीचें अतीत जाण्याचा अभ्यासच करावयास पाहिजे. दुसरें असें कीं जगांतील सर्व ज्ञान प्राप्त होणें ही ह्या युगांतील आयुष्य मर्यादेच्या पलिकडची गोष्ट आहे. चौदा विद्या व चौसष्ट कला यांचें सम्पूर्ण व सांगोपांग ज्ञान होणें ह्या आयुष्यमर्यादेंत जीवास शक्य नाहीं. तरी जें जाणलें म्हणजे सर्व जाणल्या सारखे होईल तें जाणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ती वस्तु म्हणजे आत्मज्ञान होय ! आत्मसाक्षात्काराशिवाय सर्व व्यर्थ आहे.

राखोंडी फुंकता दीप न लगे जयापरी ।
तैसा ब्रह्मज्ञान कुसरीं ज्ञान न पवे ॥
परतोनीं न पाहे धावतो सैरा ।
करितो येरझारा संसारीच्या ॥
—ज्ञानेश्वर

त्रिपुंड्र टिळे अंगीं चंदनाची उटी ।
घालोनिया कंठी तुळसी माळ ॥
शुद्ध करी मन समता धरोनि ध्यान ।
तरीच भवबंध तुटेल रे ॥
—नामदेव

कित्येक लोकांना ग्रंथ वाचनांत आपण तल्लीन होतो व त्यांतच आपणांस आनंद प्राप्त होतो हाच ब्रह्मानंद होय असें वाटत असते पण हा केवळ भ्रम आहे. ही बाह्य वृत्ति आहे हें लक्षांत घ्यावयास नको कां ? साक्षात्कार हा अंतर्मुख वृत्ति केल्याशिवाय होणार नाहीं. तो ह्या देहांतच होणारा आहे. बाहेर होणारा नाहीं. तें वर्म वेगळेंच आहे. त्यास मनोलयाचा अभ्यास करावयास पाहिजे. असो. एकवार चित्ताची ठाम समजूत झाली तरी पुढें पुढें निरनिराळे ग्रंथ नुसते वाचित बसण्याचें वेडच कित्येकास लागलेलें दिसतें. शब्दज्ञानाची शोभा हवी तेवढी पाहतां येईल. तीच पहात पहात हिंडत बसलों तर त्या वनांतील देवालयांत जाऊन आत्मलिंगाचें दर्शन घ्यावयाचें तसेंच राहील ! तरी ही वृत्ति आवरून ज्यामार्गानें आपणास जावयाचें आहे त्या पथावरच यावयास पाहिजे व इष्ट वस्तु साध्य करून घेतली पाहिजे.

अनुभव येथें पाहिजे साचार ।
न चलति चार आह्मांपुढें ॥
ज्ञानेश्वर

ह्या तत्वाकडे दुर्लक्ष केल्यामुळें कित्येक ज्ञानी ह्मणवणारेही आत्मसाक्षात्कारास मुकतात व नुसते शब्दपंडित बनतात असें आपण पाहातो. ह्मणून साधुसंत नेहमीं अभ्यासांत रत होण्यास सांगतात.

## अतींद्रिय ज्ञान.

साक्षात्काराचें मार्गांतील अनुभव निरनिराळ्या साधुसंतांनीं क्रमवार, अगर ज्या ज्या वेळीं त्यांना वृत्तितादात्म्यामुळें स्फुरण झालें त्या त्या प्रमाणें मागें पुढें, त्यांनीं सांगून टाकले आहेत. चित्ताची एकाग्रता होऊन मनोलय होऊं लागला ह्मणजे अतींद्रियज्ञान प्राप्त

होतें. त्यास ज्ञानचक्षु म्हणण्यास हरकत नाहीं.

जे दिठीही न पविजे । ते दिठीवीण देखिजे ॥
जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥
— ज्ञानदेव.

रवी दीप हिरा दाविती देखणें ।
अदृश्य देखणें संताचेनी ॥
—तुकाराम

## चर्मचक्षू व ज्ञानचक्षु

चर्मचक्षु ज्यास आपण डोळे ह्मगतो ते असले ह्मणजे आपण त्या योगें पाहतों हें म्हणणें सर्वथैव खरें नव्हें. नेत्र हें करण आहे, साधन आहे. नेत्राप्रत येणारा ज्ञानतंतू बिघडला असेल तर त्या ठिकाणीं प्रतिबिंब बरोबर उमटणार नाहीं व बाह्य विषयाचें ज्ञान होणार नाहीं. हें इंद्रिय शाबूत असून जर त्याची देवता, ह्मणजे मेंदूतील गोलक, ( Centre ) रुष्ट असेल तरीहि दिसणार नाहीं. साधन असें इंद्रिय व इंद्रियांची देवता ( Centre ) इतके सुस्थितीत असले ह्मणजे बाह्य वस्तूंचें ज्ञान आत्मा ग्रहण करीत असतो. ज्ञानचक्षूनें आत्म्याचें स्पष्ट दर्शन होतें.

चर्मचक्षूची दृष्टी सर्व गगन साठवितें. पर्वत, अरण्यें वगैरे सर्व साठवून ठेविते व पुनः उठते. हें सर्व दृश्य साठविण्यास त्वचारूप ठिकाण कोठेंच दिसत नाहीं. तसें, ज्ञानदृष्टींचें अवलोकन सर्वत्र आहे पण स्थान दाखवितां येत नाहीं. चर्मदृष्टींत इतकी साठवण आहे पण रेतीचा कण डोळ्यांत गेला तर खुपतो अशी स्थिती आहे ! चर्मचक्षूची दृष्टी प्रत्यक्ष प्रमाण गोचर आहे. ज्ञानदृष्टी नेहमीं स्वस्वरूपानें भरली आहे. जसे जन्मांधाची दृष्टी मागें पुढें चोहोकडे आपल्याप्रमाणें

अंधःकार पाहते, त्याप्रमाणें ज्ञानचक्षू आपल्या अभिन्नपणामुळें सर्वत्र प्रकाशमय निजस्वरूप पाहतो !

कित्येकांची अशी समजूत आहे कीं, हा हटयोगाचा विषय आहे व हटयोगांत प्रकाश दिसणें, नाद ऐकूं येणें वगैरे प्रकार होतात. पण हा समज अगदीं चुकीचा आहे. हटयोगांत प्राणलय अगोदर करावयाचा असतो. तर ध्यानधारणा जपादि **मनो**लयाचें अभ्यासांत– राजयोगांत–मनाचा लय करावयाचा असतो. मन व प्राण हे दोन्ही एका वायूच्या द्विधावृत्ति आहेत. एकाचा लय झाला कीं दुसऱ्याचा लय आपोआप होतो. म्हणून प्राण अगर मन यापैकीं एकास जिंकून घ्यावे ह्मणजे समाधी साध्य होते. तेव्हां ब्रह्माचीं प्रकाशरूपें व अनुहतध्वनि हा हटयोगाचा विषय आहे व तीं रूपें हटयोग्यासच दिसतात अगर नाद अनुभवण्यास येतात ही कल्पना नष्ट करावी. निर्गुण रूपाची उपासना करणारास हे अनुभव स्पष्टपणें येतात. त्याचा अनुभव घ्यावा असे साधुसंत कळकळीनें सांगतात. त्यांत गुह्य असें कांहीं ठेवीत नाहींत. आत्म्यासंबंधीं **चोखामेळा** ह्मणतो ' आत्मा अविनाश विठ्ठल दिसें ' तर एकनाथ **महाराज** जास्त बरोबर वर्णन करतात कीं:—

निजहृदयस्थ पाहिला जनार्दन ।

कळिकामय दीप दिसे ॥

त्याचप्रमाणें परमात्मा हा प्रकाशरूप आहे. सूर्य, चंद्र व तारामन्डळे त्याचे प्रकाशानें प्रकाशीत होतात व तो सर्वव्यापी आहे. उन्मनी अवस्थेंत त्याचा साक्षात्कार होतो. सर्व संतांनीं त्याचें निरनिराळ्या स्वरूपांत अत्यंत काव्यमय व बहारीचें वर्णन केलेलें आढळेल ! **जनाबाई** ' नवद्वारें भेदून दशमद्वारीं गेलें तों विठ्ठल तेथें

दिसला ' असें ह्मणतात तर **एकनाथ** ह्मणतात कीं, ' जिकडे पहावे तिकडे उदयच दिसतो व सतत प्रकाश दिसतो. '

देवयान पंथावरील अनुभवाच्या खुणा साधुसंतांनीं लिहून ठेविल्या आहेत. त्या मार्गावरून जो गमन करील त्यास वाटेंत काय काय गोष्टीं पहावयास सापडतात व हा पंथ कोठें संपतो हें स्पष्टपणें त्यांनीं सांगून टाकिलें आहे. त्याचा उपयोग या पथावरून जाणाऱ्या शेंकडो लोकांस दीपस्तंभाप्रमाणें अचुक ज्ञान होण्याकडे होतो. या योगें आपण योग्य मार्गावर आहों कां भलत्या मार्गावर जात आहोंत याचें बरोबर ज्ञान होतें. त्यामुळें भ्रम रहात नाहीं. साधुसंतांनीं सांगितल्याप्रमाणें या पथावरून मुक्काम दर मुक्काम करीत जाणाऱ्या पाथिकास अनुभव येत गेले ह्मणजे आनंद होतो, आपण योग्य मार्गावरून जात आहोत असा विश्वास वाटतो व खात्री पटते पूर्वी आपल्या ऋषींनीं ब्रह्मसाक्षात्काराचे अनुभव लिहून ठेविलेले आहेत. त्याप्रमाणें आपणास अनुभव आले असल्याबद्दल आपल्या साधुसंतांनीं सांगून ठेविले आहे. त्या शास्त्रप्रचीतिप्रमाणें व गुरुप्रचीतिप्रमाणें साधकास अनुभव यावयास पाहिजेत. ते तसे येत गेले तरच तो या देवयान पंथावर आहे असें समजावें. कारण **शास्त्रप्रचीति व गुरु-प्रचीति बरोबर आत्मप्रचीति जमावयास पाहिजे.** ती तशी न जमेल तर निःसंशय आपण भलत्या मार्गानें जात आहों असें समजावें. उगीच एखाद्यानें आपणास अमूक अनुभव येतात, असें सांगावें हें आम्ही खपून घेणार नाहीं असें **तुकाराम** महाराज ह्मणतात. ज्याला आपलें आत्मकल्याण करून घ्यावयाचें आहे अशा साधकानें, वरील प्रकारचा आग्रह धरणारे लोक भलत्या मार्गानें जात आहेत असें खास ओळखावे व त्यांचे नादीं लागूं नये. दृष्टांता दाखल आपण प्रवासाचें उदाहरण घेऊं. पुण्याहून मुंबईकडे आपणास जावयाचें आहे.

मुंबईकडे जाणाऱ्या **जी. आय. पी.** आगगाडीनें गेलोंतर आपणास खडकी, तळेगांव, लोणावळे, कर्जत, कल्याण, ठाणे वगैरे स्टेशनें लागतील असें आगगाडी संबंधीं माहितीचे पुस्तकांत—गाईड—मध्यें लिहून ठेवलें आहे. त्या प्रमाणेंच स्टेशनें लागतात असा पुण्याहून मुंबईस जाऊन आलेले लोक आपला अनुभव सांगतात. आपणहि आतां त्या मार्गानें जाऊं लागलों तर आपणासहि तींच स्टेशनें लागलीं पाहिजेत. तशी तीं न लागतां जर घोरपडी, सासवड, निरा, वाठार, सातारा, कऱ्हाड वगैरे स्टेशनें लागूं लागलीं, तर आपण निःसंशय **मुंबईस** पोहोंचण्याचें ऐवजीं **मिरजेस** मात्र जाऊं! आपण भलत्या मार्गानें जात आहोंत, आपणास मार्गदर्शकानें जी. आय. पी. गाडींत बसविण्याचे ऐवजीं त्याचें अज्ञानामुळें **सदर्न मराठा गाडींत** बसविलें व आपण उत्तरेकडे जावयाचे ऐवजी दक्षिणेकडे जात आहोंत हें सहज ध्यानीं येईल. "पुण्याहून मुंबईकडे आगगाडीनें आह्मी जात नसून दुसऱ्या पाय वाटेनें आह्मी जात आहों तेव्हां आमचा मार्ग निराळा आहे, आम्हास जे अनुभव आले असें आम्ही म्हणूं तेंच खरें, या मार्गाने आगगाड्याचीं स्टेशनें नाहींत; डोंगर नद्या वगैरे आहेत. आणि शेवटीं मुंबई शहर व समुद्र वगैरेप्रत आह्मीं जातों." असें कित्येक ह्मणतील. हें म्हणणें किती भ्रामक आहे हें साधकानें विचारांतीं लक्षांत घ्यावें. त्यानें मुंबई इलाख्याचा भूगोल पाहिला ह्मणजे त्यांत मुंबईस जाण्यास कोण कोणतें डोंगर लागतात नद्या लागतात व गांवें लागतात हें आढळून येईल. या पाय वाटेनें जे गेलेले आहेत ते भूगोलांत लिहिलें प्रमाणेंच आपणास स्थळें आढळून आल्याचे सांगतील. जो या मार्गानें जाईल त्यास तोच अनुभव येईल. लोणावळ्याचें घाटापर्यंत आगगाडी व पायवाट जवळ-जवळ आहेत. लोणावळ्याचे घाटा पासून लोह मार्ग-रुळाचा मार्ग-

निराळा फुटतो व घाटांतून बोगद्यांतून वळणें घेत घेत मुंबई जवळचे जें मोठें स्टेशन ठाणें, त्या ठिकाणीं तो येतो. येथें पुन्हा पायवाट व लोहमार्ग एकत्र येतात. पुढें दोन्ही मार्ग जवळ जवळ सारखे आहेत व ते शेवटीं सागरापर्यंत पोहोंचतात. साधक भलत्या मार्गावर म्हणजे दक्षिणेच्या मार्गास जर लागला तर लोणावळ्याची गर्द झाडी आणि शांत व थंड वातावरण याचा अनुभव येण्याचे ऐवजीं कात्रज व खंडाळ्या सारखे रुक्ष डोंगर व रखरखीत वातावरण याचा अनुभव येईल! आणि मनास समाधान होण्या ऐवजीं तृषेनें जीव व्याकूळ होऊन जाईल! लोह मार्ग व पायवाट यांत अंतर असल्याचे अनुभवास येईल. शेवटीं प्रशांत अशा क्षीर सागरास पोहोंचण्याचें ऐवजीं खडकाळ माळरानांत पोहोंचण्याचा प्रसंग येईल! इतकें विवेचन करण्याचें कारण असें कीं साधकास भ्रम होऊं नये. वरील दृष्टांतांत पुष्कळ गर्भितार्थ भरला आहे हें सूक्ष्मपणें विचार केला असतां सम-जण्या सारखें आहे. आपण योग्य मार्गावरून जात आहों अगर भलत्या मार्गावरून जात आहों याचा पडताळा साधकानें सतत पाहात असावें.

साधुसंतांनीं देवयान पंथावरील मोठमोठ्या टप्यांचें यथासांग वर्णन केलें आहे. तसेंच त्यांनीं या पंथावरील बारिकसारिक अनु-भवहि सांगून टाकले आहेत त्यामुळें आपण कोठवर आलों आहों याचें ज्ञान साधकास चांगलें होतें व पुढील मार्ग आक्रमण्यास त्यास सोपें जातें.

## अभ्यास

ज्ञान प्राप्त होण्यास व त्याचें अखंड अनुसंधान राहण्याकरितां सत्पुरुष नेहमीं अभ्यासांत रत होण्यास सांगतात. दृढ अभ्यासानें

कोणतीहि वस्तू लवकर प्राप्त होते. सर्व सत्पुरुषांनीं ईश्वरी नियमा-प्रमाणें थोडा फार अभ्यास केला आहे. **ज्ञानेश्वर** महाराजांनीं आपले गुरु जे निवृत्तीनाथ त्यांचेपाशीं योगाभ्यास केला. **नामदेवास** भगवान् पांडुरंगानी गुरुकडे पाठविल्यावर त्यांनीं त्याजकडून अभ्यास करवून घेतला. **तुकाराम** महाराजांनीं कित्येक वर्षे अभ्यास केला आहे. **एकनाथ** महाराजाकडून जनार्दन स्वामींनीं एकांतामध्यें वरचेवर अभ्यास करवून घेतला आहे. समर्थ **रामदास** स्वामींनी कांहीं वर्षे एकातांत अभ्यास करून तीर्थाटणें केलीं ! सर्व सत्पुरुषांचें चरित्राचें निरीक्षण केल्यास कळून येईल कीं ते प्रकट होण्यापूर्वीं व जगास उपदेश करण्यापूर्वीं त्यांनीं गुरुपदिष्ट मार्गाचा पद्धतशीर अभ्यास कांहीं दिवस केला होता. अभ्यासाचे योगें संपूर्ण मनोलय प्राप्त करून त्यांनीं आत्मसाक्षात्कार करून घेतला. अशाप्रकारें स्वस्व-रूपीं राहणें या स्वधर्माचें पालन स्वतः केल्यावर मग त्यांनीं प्रगटा-वस्था धारण केली व स्वधर्माचा उपदेश जगास करण्यास सुरवात केली !

अनुभवें अनुभव अवघाचि साधिलां ।
तरी स्थिरावला मनु ठाईं ॥

—तुकाराम

देवयानपंथावरून साधुसंत गेले व शेवटीं त्यांनीं सहजावस्था प्राप्त करून घेतली म्हणून मुमुक्षु जीवांनींहि याच मार्गानें जावें व आत्मकल्याण करून घ्यावें, या सद्बुद्धीनें या पंथावरील अनुभव त्यांनीं लिहून ठेवले आहेत. मनोलयाचा पद्धतशीर थोडाहि अभ्यास न करतां नुसत्या श्रवणानें, वाचनानें अगर शब्दज्ञानानें स्वस्वरूपाचें ज्ञान प्राप्त व्हावें अशी आपण इच्छा करितों. पण तशी इच्छा करणें व्यर्थ आहे ! अस्तु.

आतां अभ्यास अभ्यास ह्मणजे तरी काय ? हें पाहूं. मनाचा संपूर्ण लय होऊन स्व-स्वरूप साक्षात्कार ज्या साधनानें अगर पद्धतीनें होतो त्यास अभ्यास असें म्हणतां येईल. यास कित्येक साधन, वगैरे नियम म्हणतात. मन या शब्दानें मन, बुद्धि, चित्त, अहंकारादि अंतःकरण पंचक घ्यावें. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरींत **अभ्यासयोग** कशास म्हणतात हें सांगितलें आहे.

> **अगा मानस हें एक । माझ्या स्वरूपीं सवृत्तिक ॥**
> **करूनी घाली निष्टंक । बुद्धि निश्चयेसी ॥**
> **येतुलेनी सर्वव्यापी । मीची होसी ॥**
> **अगा अभ्यास-योग ह्मणिजे । तो हाच जाणिजे ॥**
> **येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥**
> **यालागीं माझ्या ठायीं । अभ्यासें मिळे ।**
>
> —ज्ञानेश्वर

अभ्यासाचे भिन्न भिन्न मार्ग व प्रकारहि पुष्कळ आहेत. **श्रीमद्भगवद्गीतेंमध्यें** निरनिराळे प्रकारचे अभ्यास सांगितलें आहेत. ज्ञानेश्वर महाराजांनीं ज्ञानेश्वरींत ह्यांचें पुष्कळ स्पष्टीकरण केलेंलें आढळून येईल. सर्व साधुसंतांस अभिप्रेत अशा अभ्यासाच्या कांहीं पद्धति आम्ही खालीं देत आहों त्यांचे शांत चित्तानें व मननपूर्वक वाचन करावें. त्याप्रमाणें आपल्या मनास पटेल अशा कोण-त्याहि पद्धतीचा अभ्यास करून पहावा ह्मणजे त्यांतील रहस्य कळेल. विषय कदाचित् कित्येकांना कठीण वाटेल पण तो शक्य तितका सोपा केला आहे व सहज कळेल अशाप्रकारें त्याचें वर्णन केलें आहे.

## अभ्यासाची पूर्व तयारी

सूर्योदयापूर्वीं सुमारें २-२॥ तास-ज्यास पहाट म्हणतात.-तो काल अभ्यासास फार उत्तम मानला आहे. त्यास पंच पंच उषः

काळ म्हणतात! आनंदाचा उपभोग घेऊन सर्व वृत्ति पुनः उत्थान दशेस येतात. अशा वेळीं उठून शरीराची बाह्य शुद्धी प्राप्त करून, एकांत व शुद्ध अशा स्थलीं—बाहेर किंवा स्वगृहामध्यें कोणच्याही स्थलीं—कृष्णाजिनावर ( हरणाचें कातड्यावर ) अगर लोकरीचें आसनावर वसावें. कोणतेंहि आसन घालून बसावें. बराच वेळ ज्या तऱ्हेनें मांडी घालून वसतां येईल त्यास **सहजासन** असें म्हणतात. आसनावर ताठ बसावें, सद्गुरुचें स्मरण करावें व गुरुपदिष्ट जो अभ्यासाचा मार्ग असेल तो आक्रमण करण्यास सुरवात करावी. ज्यांना सद्गुरु नसेल अशा भाविकांनीं प्रथम आपल्या उपास्य देवतेचें चिंतन करावें आणि मग आपल्या मनास जो पटला असेल व आपल्या परिस्थितीनुरूप जो शक्य असेल असा अभ्यास करण्यास सुरवात करावी. मन शांत करण्याचा प्रयत्न करावा. तमोगुण वृत्तीचा त्याग करून अंतःकरणांत सत्वगुणप्रधान वृत्ति उत्पन्न करावी व ती अंतर्मुख करावी.

ध्यानाची ही पूर्व तयारी झाल्यावर प्रत्यक्ष अभ्यासास सुरवात करावी. ज्या त्या साप्रदायाप्रमाणें व पंथाप्रमाणें गुरुपदिष्ट मार्गाचा अगर आपल्या उपासनेचा अभ्यास करावा. अभ्यासाचे पुष्कळ प्रकार आहेत. संकल्प विकल्पात्मक असें हें चंचल मन नानाप्रकारचे विषयांपासून काढून स्थिर करणें फार कठीण आहे. त्यावर प्रकृति मानाप्रमाणें निरनिराळे पुष्कळ उपाय आहेत व जसजसे नवे पंथ उत्पन्न होत आहेत तसतसे नवे नवे उपायहि सुचाविण्यांत येत आहेत. आपल्या साधुसंतांनीं सर्वांस आचरण्यास अत्यंत सोपे व जवळचे असे कांहीं मार्ग सांगितले आहेत. ते म्हणजे ईश्वराचें नामस्मरण, त्याच्या सगुणरूपाचें ध्यान करणें, असंख्य अशा वृत्तींच्या लयउद्भवाचा अभ्यास करणें, नासिकाग्रदृष्टी ठेवून जप अगर ध्यान करणें, श्वासोच्छ्वासावर अनुसंधान राखणें वगैरे वगैरे. या सर्वांत नामस्मरण

च ध्यानयोग हा अत्यंत सोपा, सहज आचरण करतां येणारा, ईश्वरावर दृढ श्रद्धा व भक्ति उत्पन्न करणारा असल्यामुळें सर्वांनीं त्यावरच भर दिला आहे. नामस्मरणाचें महत्व सर्व साधुसंतांनीं अत्यंत गाईलें आहे व त्यावर फार भर दिला आहे. एक वेळ नुसतें नाम घेतलें तर चारी मुक्ति मिळतात असेंहि सांगितलेलें आढळून येतें. तेव्हां या विषयाचें व यांतील रहस्याचें सांगोपांग विवरण आम्ही पुढें स्वतंत्र दीपांत केलें आहे.

निरानिराळ्या साधनांचा अभ्यास कसा करावयाचा हा प्रस्तुतचा विषय नसल्यामुळें त्यांचें सांगोपांग विवेचन या स्थलीं करण्यास अवकाश नाहीं. कारण त्यावर स्वतंत्र ग्रंथच बनेल येवढा तो विषय आहे. तरी पण सर्वांस समजण्याकरितां व आचरून पाहतां यावा ह्मणून प्रत्येकाचें थोडक्यांत दिग्दर्शन पुढें करीत आहों.

## १ नामस्मरण—जप

नामस्मरण हें जप या सदरांत येतें. विशिष्ठ पद्धतीनें जपाचें अनुष्ठान करणारें पुष्कळ आहेत. ईश्वराचें नामस्मण अगर जप आपण मुखानें **मोठ्यानें** करतों, तेव्हां तो नामउच्चार **वैखरी** वाणी कडून होतो असें समजावें. वाणी चार आहेत. १ परा २ पश्यंती ३ मध्यमा व ४ वैखरी. वैखरीचे पुढची मध्यमा वाचा आहे. तिचें स्थान कंठांत मानलें आहे. **तोंडातले तोंडांत** जेव्हां शब्दोचार होतो त्यावेळीं नामस्मरण अगर जप **मध्यमा** वाणीनें होतो असें समजावें. नुसत्या वैखरीनें अगर मध्यमा वाचेनें नामस्मरण करून उपयोग होत नाहीं. या दोन्ही वाणींचा लय त्यांचे पुढच्या पश्यंती वाणींत होणें जरूर आहे. **मनांतलें मनांत** जो आपण शब्दोच्चार करतो ती **पश्यंती** वाचा. हिचें स्थान हृदय हें मानिलें आहे. मनांतलें मनांत जप करणें प्रथम

कित्येकास अवघड वाटतें. पण थोड्याशा अभ्यासानें तें साध्य होतें. अशा प्रकारेंच नामजप झाला पाहिजे.

ज्ञानदेव मौन जपमाळ अंतरी । धरोनी श्रीहरी जपे सदा ॥
—ज्ञानेश्वर

मनोलय करण्यास मनाचें वास्तव्य स्थान हस्तगत करावयास पाहिजे. हृत्कमल हें मनाचें वास्तव्य स्थान आहे. तेंच पश्यंती वाचेचें ठिकाण आहे ह्मणून तेथेंच नामजप करावा असें संत सांगतात.

धन्य माझा जन्म । हृदयीं विठोबाचें नाम ॥ —जनाबाई

ह्मणे जनार्दन एकनाथा हृदयीं ।
विठ्ठल मंत्र ध्यानीं सर्वकाळ ॥ —जनार्दन

पश्यंती वाणींत जप भासमान होतो या वाचेनें नामस्मरण करण्याचा अभ्यास केला ह्मणजे सर्व वृत्ति शांत होत जात असल्याचा अनुभव येईल. कालांतरानें शेवटची अगर मूळस्वरूप जी परा वाचा तिचा अनुभव येईल. जेथें भास सुद्धां असत नाहीं व जी नुसती **स्फुरणरूप** आहे, ती **परा वाचा** होय ! ही कळण्यास कठीण आहे. अनुभवण्यास तर फार कठीण आहे. नाभिकमल हें हिचें स्थान मानलें आहे. दृढ अभ्यासानें या वाचेंत नामस्मरण अगर जप व्हावयास पाहिजे. या चारी वाचांचें अतीत आत्मा आहे ! या चारी वाचांचा क्रमवार लय केला म्हणजे परेच्या पलीकडे असलेल्या आत्म्याचें दर्शन आपोआप होईल असें साधुसंत सांगतात.

परा पश्यंती मध्यमा । वैखरीची झाली सीमा ॥
चार वाचा कुंठीत जाहली । सोहं ज्योती उभारली ॥
—जनाबाई

आठवी बिठ्ठल गाईजे एकांती । अलभ्य ते येती लाभ घरा ॥
आणिका अंतरी न घ्यावी वसती। करावी हे शांती वासनेची ॥
तुका ह्मणे बाण हाचि निर्वाणीचा । वाऊगी वाचा वेचूं नये ॥
—तुकाराम

नामस्मरणानें या हृदयस्थ आत्म्यास जागलें पाहिजे.

जो माळ करविता वाचेसी वदविता ।
तया हृद्यस्था नेणें कोणी ॥
—जनाबाई

## २ ध्यानयोग

ध्यानाचे अभ्यासाचीहि अशीच गोष्ट आहे. बहुतेक सर्व वृत्ति नेत्रद्वारा बाह्यवर्ती होतात. डोळे मिटून ईश्वराचें ध्यान करावें ह्मणजे बाह्यवृत्तीचें स्फुरण बंद पडतें. मनाचें वास्तव्य स्थान हृत्कमलाचें शेजारींच असलेल्या अष्ट दलांकित मनश्चक्रांत आहे असें मानिलें आहे. मन ईश्वराचें सगुण मूर्तीचें ठिकाणीं गुंतवून त्यांचे आकलन करण्याकरिता त्यांचे स्थानांतच त्यास लीन केलें पाहिजे ह्मणून हृदयाचें ठिकाणींच ध्यान करावें असें साधुसंत सांगतात.

सावळी मूर्ती हृदयीं बिंबली ।
तरी पालटली देह बुद्धि ॥
——नामदेव

अवघा तो शकुन । हृदयीं देवाचें चिंतन
——तुकाराम

ध्यानांत सगुण व निर्गुण असें दोन प्रकार आहेत. चित्ताची एकाग्रता करण्यास प्रथम ईश्वराच्या सगुण मूर्तीचेंच ध्यान करावें.

ध्यानयोग हा सर्वांस सोपा व इष्ट असा अभ्यास आहे. हा भावना उद्दीपित करणारा, ईश्वरावर दृढ श्रद्धा वाढविणारा, व त्यांचे ठिकाणीं भक्ति उत्पन्न करून चित्त रममाण करणारा आहे. ध्यानास आपल्या उपास्य देवतीची सुंदर व हास्यमुख अशी मूर्ती अगर फोटो घ्यावा. त्याचे प्रेमळ स्वरूपाचें ध्यान करावयास लागलें ह्मणजे ईश्वर हा सकल सुखाचा दाता असल्यामुळें त्याची करुणा भाकतां येतें, त्याचें मानासिक भजन व अर्चन करतां येतें, यास शरण गेल्यानें व त्याची करुणा भाकल्यानें हा आपलें कल्याण करील आपणास ऐहिक व पार लौकिक सुखें प्राप्त करून देईल अशी भावना उत्पन्न होते ! मनुष्य हा उत्सवप्रीय प्राणी आहे. प्रपंचांत जे जे आहारविहारादि व्यवहार मनुष्य करतो ते ते सर्व तो ईश्वराचे ठिकाणीं करण्यास प्रवृत्त होतो व तसें करण्यांत त्याचें मन रममाण होतें असें नित्य आपल्या दृष्टोत्पत्तीस येतें. ह्मणून उपासनेमध्यें उपास्य दैवत हें प्रथम ईश्वराचें सगुण रूपांत असावें. हृत्कमलांमध्यें ईश्वराचें **चरणकमलाचेंच प्रथम ध्यान करावें.** चरणकमल अंतःकरणांत पूर्णपणं ठसवून घ्यावें. अशाप्रकारें धारणा वाढत गेली ह्मणजे डोळे उघडे असतांना-सुद्धां मनांत आणलें तर आपल्या चक्षूपुढें ईश्वराचे चरणकमल उभे राहूं शकतील! एकाग्र चित्तानें ध्यान करीत करीत चरण चैतन्ययुक्त दिसेंपर्यंत त्यांचें ठिकाणीं धारणा धरावी. नंतर मग एक एक अवयवांचें वरवर ध्यान करीत जावें. हा पुढील अभ्यास सोपा आहे. एकदम सर्व मूर्तीचें ध्यान न करतां चरणकमलांचेंच प्रथम तन्मयवृत्ति होई-पर्यंत ध्यान करावें असें सर्व साधुसत्पुरुष सांगतात. एकनाथ महा-राजांनीं भागवतांत याचें पुष्कळ विवरण केलेलें आढळेल.

कित्येकांची अशी समजूत असते कीं, देव आपल्यापुढें उभा आहे असें कल्पून ध्यान करावें, किंवा आपण मनानें देवालयांत

जावें अगर गेलों आहों व त्यास्थळीं ध्यान करीत आहोंत अशी कल्पना करावी. पण तें योग्य व बरोबर नाहीं. थोडा विचार केला तर असें कळून येईल कीं, ह्या बाह्य वृत्ति आहेत. साक्षात्कार हा या देहांतच होणार आहे.

ज्ञानोबाची वाणी पूर्णरूपीं घ्यावी ।
देहींच पहावी आत्मज्योती ॥
—— ज्ञानेश्वर.

तेव्हां हृदयाचें ठिकाणीं हृत्कमलामध्यें ईश्वराची मूर्ति उभी आहे व आपण त्या ठिकाणींच तिचें ध्यान करीत आहोंत अशी आपण भावना ठेवावी. हा अभ्यास प्रथम कठीण वाटेल व साध्य होण्यास प्रयास पडतील, पण वरील प्रमाणें भावना दृढ धरून आपण हृदयांत प्रवेश करण्यास व मनरूपानें तेथेंच ध्यान करावयास शिकले पाहिजे म्हणजे इष्ट त्वरित साध्य होतें.

धारणाशक्ति एकवार वाढली म्हणजे वरील अवयवांचे ध्यान लवकर होतें. शेवटीं **हास्यमुखावर दृष्टी स्थिर करावी.** परमेश्वर कृपायुक्त नेत्रकटाक्षानें आपणाकडे पहात आहे अशी भावना ठेवावी. अशा प्रकारें संपूर्ण मूर्ति चित्तांत भरून ठेवावी. याचवेळीं नामस्मरणाचा अभ्यास केल्यास दुधांत साखर टाकल्याप्रमाणें होईल ! ह्या वेळीं अर्थात् पश्यंति वाचेंतच नामस्मरण-जप होणार. तेव्हां मनोलय फार जलद होऊं शकणें कसें शक्य आहे हें ध्यानीं येईल. या अवस्थेंत ईश्वराशीं भक्तियुक्त अंतःकरणानें बोलतां येईल, त्याला आपलें दुःख निवेदन करतां येईल, त्याची अत्यंत हळुवार अंतःकरणानें करुणा भाकतां येईल, त्याचें भजन

पूजन करतां येईल व त्याचें चरण कमलावर मस्तक ठेवून आशीर्वचन मागतां येईल!! थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे आपल्या भावनेप्रमाणें हवें तें करतां येईल. या सुद्धां उपांग वृत्ति आहेत. त्या कालक्रमें करून घालवून एक हास्यावरच दृढ धारणा धरणें जरूर आहे. याहि पुढें जाऊन हास्याचें ठिकाणीं जो आनंद उत्पन्न होतो. त्या ठिकाणीं धारणा धरावी ह्मणजे वृत्ति लीन होतांच मनाचा संपूर्ण लय होऊन तन्मय तदाकार वृत्ति होते! ही गोष्ट अभ्यासी पुरुषांचे परिचयाची असेलच. तदाकार वृत्ति झाल्यावर मी ध्यान करीत आहे ही वृत्ति नष्ट होऊन ध्येयाकार वृत्ति बनते!

पाहूं गेले तव मी माझें हरपलें। ठकाचि ठेलें काय सांगों ॥

—चांगदेव

नामा ह्मणे जरी केशवासी ध्याई। तरी केशव होसी अरे मना॥

—नामदेव

तेव्हां ध्येय, ध्याता व ध्यान ही त्रिपुटी नष्ट होते. ह्या अवस्थेप्रत गेल्यावर सगुण ध्यानाचें रूपांतर निर्गुण ध्यानांत होतें व देही जो **आत्मा** त्याचें दर्शन होतें!

सगुण पाहतां मुळास गेला। सहजची निर्गुण पावला।
संगत्यागें मोकळा झाला। वस्तुरूप ॥

—रामदास

मन हें दर्पण करोनि निर्मळ। पाहे पा केवळ आत्मा स्वयें॥
वृत्तिसहित मन बुडे प्रेमडोहीं। नाठविती देहीं देहभाव ॥
सगुणीं निर्गुणी एकचि आवडी। मनें दिली बुडी चिदाकाशीं॥

—नामदेव

ध्यानीं पाहतां पंढरीराया । मनासहित पालटली काया ॥

—तुकाराम

हा ध्यानयोगाचा विषय फार मोठा आहे. पण भक्तियुक्त अंत:करण आनंदानें भरून काढणारा व प्रेमाच्या ऊर्मी उत्पन्न करणारा आहे त्यामुळें किती लिहावें असें होतें. पण स्थलमर्यादा ही शेवटीं हात आखडण्यास भाग पाडते. ध्यानानें व जमल्यास त्याच ठिकाणीं व त्याकाळीं नामस्मरणानें, चित्ताची एकाग्रता होत जाऊन संपूर्ण मनोलय कसा होतो हें लक्षांत आलें असेलच. हा अभ्यासाचा विषय असल्यामुळें प्रत्येकानें याचा अभ्यास करून पहावा ह्मणजे याचें रहस्य कळेल आणि यापासून किती समाधान प्राप्त होतें याचा प्रत्यक्ष अनुभव येईल व आत्मदर्शन होईल ! त्याचाच अभ्यास सर्वांनीं करणें जरूर आहे.

मन मुरे मग जे उरे । तें तूं कां रे सेविसिना ॥

—- ज्ञानदेव.

## ३ अवस्थालय

अवस्थांचा लय कसा होत जातो हें आपण आतां पाहूं. अवस्था चार आहेत. १ जागृति २ स्वप्न ३ सुषुप्ति व ४ तुर्या ह्या त्या होत. जागेंपणीं आपण जें व्यवहार करतो ती जागृतावस्था. हिचा अनुभव सर्वांस येतो. स्वप्न व सुषुप्ति यांचा अनुभव प्रत्यक्ष निजल्याशिवाय येणें शक्य नाहीं असें वाटणें साहजिक आहे. या अवस्था आपणास कळल्याशिवाय व जागेंपणीं यांचा अनुभव आल्याशिवाय लय कसा होतो हें कसें कळेल ? व तिही अवस्थेच्या पलिकडील जी तुर्या अवस्था तिची कल्पना तरी कशी येईल ? या अवस्थांची कल्पना येण्यास या अवस्थांचें तत्व काय आहे तें लक्षांत घेणें जरूर आहे.

सूक्ष्म विचारांतीं कळून येईल कीं, ह्या देहाच्या अवस्था नसून बुद्धिचे व्यापार आहेत. हें तत्व लक्षांत घेतलें म्हणजे अवस्थांचे अनुभव आपणांस सहज घेतां येतील. कसें तें पाहूं. जागेपणीं उगीच स्वस्थ बसून जेव्हां आपण कोणत्याहि गोष्टींचा विचार करतो, अगर चिंतन करतो त्यावेळीं **इंद्रियाचे व्यापार बंद असून फक्त मनाचे व्यापार सुरूं असतात** तो जागृतींतील **स्वप्नावस्था** होय. आपण एकादे कार्यांत गर्क होऊन कार्यरूप होऊन जातो; किंवा गणित अगर रसायनशास्त्रांतील गहन प्रमेयें सोडवितांना जेव्हां तत्ववेत्ते त्या विषयाशीं तद्रूप पावतात त्यावेळीं **देहभान व मनोवृत्तिहि नष्ट होतात** ती जागृतींतील **सुषुप्तावस्था** समजावी. साधुवर्य **एकनाथ महाराजांचें** उदाहरण घेऊं. हिशेबांतील पैची चूक ह्या चाळून काढतां काढतां व पुढें ती विचारांतीं शोधून काढतांनां ते त्या विषयांत इतके तल्लीन होऊन तदाकार झाले कीं, त्यांचे गुरु **जनार्दनस्वामी** त्यांचेजवळ येऊन बराच वेळ उभे राहिलेले त्यांना दिसलें नाहींत व त्यांची जाणीवहि त्यांना झाली नाहीं ! शेवटीं चूक सांपडतांच—म्हणजे वस्तूचें ज्ञान होतांच—त्यांना आनंद झाला व ते आनंदरूप बनले ! या ठिकाणीं अवस्थालय कसा होत गेला हें लक्षांत घ्यावें. ह्यावरून असें दिसून येईल कीं जागृतिमध्यें देहाचे व मनाचे व्यापार सुरूं असतात. त्यापैकीं मनाचेच व्यापार स्वप्नावस्थेंत सुरुं राहतात. तर सुषुप्तिमध्यें बुद्धीचेहि व्यापार बंद पडून ती लीन होते व विश्रांति हेंच पूर्ण सुख असतें. त्याच्या पलिकडे चवथी तूर्या नांवाची अवस्था आहे. ही ज्ञानस्वरूप आहे. ही संधीकालांतील अवस्था आहे. दोन दालनामधील अगर माजघर व ओटी यांचेमधील दाराचे उंबरठ्यावर दिवा ठेविल्यास तो जसा बाहेर व आंत दोन्हीकडे प्रकाश पाडतो तद्वत् ब्रम्हकार्य व मायाकार्य अशी

दोन्हीं कार्यें ज्या अवस्थेंत कळतात व त्यांचा अनुभव घेतां येतो तीस **तूर्या** अवस्था असें म्हणतात. ही अवस्था श्रेष्ठ आहे. हिचें किती महत्त्व आहे तें खाली दिलेल्या ज्ञानेश्वरमहाराजांचें वचनावरून कळून येईल:

आत्मज्ञान जया न देखें दृष्टी । तया नरा गोंठी करुं नये ॥
तूर्यारूपें जाण प्रभा हे निस्सीम । तया परता राम असे ॥

—ज्ञानेश्वर

नामस्मरणाचा, ध्यानाचा किंवा दुसरा कोणचाहि अभ्यास करूं लागलों म्हणजे या अवस्थांच्या लयाचा अनुभव कसा येतो हें अनुभावास येतें. तसा अनुभव प्रत्येकानें घ्यावा. म्हणजे तूर्येच्या पलिकडे असलेल्या आत्म्याचें दर्शन घेतां येईल! तसेंच साक्षात्कारानंतर तूर्येमध्यें नेहमीं कसें राहातात व तेथें राहणेंच कां जरूर आहे हें कळून येईल.

## ४ चत्वार देह निरसन

**श्रीमद्‍भगवद्गीतेमध्यें** छत्तीस तत्वांच्या समुहास क्षेत्र असें नांव ज्यास देण्यांत आलें आहे व ज्यास आपण हा जड देह मानतों त्याचें चार देह वेदांत शास्त्रांत कल्पिले आहेत. ते असें:— १ स्थूल २ सूक्ष्म ३ कारण व ४ महाकारण. त्यांपैकीं मज्जा, अस्थि, रक्त, चर्म वगैरेनीं युक्त असा जो जड देह त्यास **स्थूलदेह** किंवा पिंड असें मानलें आहे. त्याचें आंत पंचप्राण, मनबुद्धयादि इंद्रियें यांनीं बनलेला वासनामय जो देह कल्पिला आहे त्यास **लिंग-देह** अगर **सूक्ष्म-देह** असें म्हणतात. या दोन्ही देहांचीं कल्पना व जाणीव मनुष्यास सहज होते. याच्या पुढील दोन्ही देहांचीं कल्पना येणें कठीण वाटेल पण

जरा सूक्ष्म विचार केला म्हणजे विषय सहज ध्यानीं येईल. स्वस्वरूपाचें अज्ञान यासच कारण देह मानिला आहे. अज्ञानामुळें जगदाभास खरा वाटतो, मी देह आहे अशी वृत्ति बनते व अशा प्रकारें जीव त्या पाशांत गुरफटतो. हा **अज्ञान स्वरूप कारण देहच** पहिल्या स्थूल व सूक्ष्म या दोन्ही देहास कारण आहे हें दिसून येईल ! अज्ञान नष्ट होऊन मी क्षेत्र नसून क्षेत्रज्ञ आहे, मी देह नसून देहस्थ अगर कूटस्थ आहे असें अनुसंधान जेथें रहातें असा **ज्ञानस्वरूप महाकारण देह** होय. श्रवणानें, मननानें व निदिध्यासानें या चत्वार देहांचा लय कसा होत जातो हें जेव्हां कळेल, बुद्धीस जेव्हां मी देह नाहीं असें पटेल व अज्ञानावरण दूर होईल तेव्हां बुद्धीच्या अतीत असलेला, चारी देहाचे पलीकडचा व त्यांचा साक्षी असा जो **आत्मा,** त्याचें दर्शन होईल.

तेथें मन पांगुळलें । आपणास विसरलें ॥
आपणास भुलोन गेलें । स्वरूप बोधें ॥
मी कोण हें नकळें । अवघा आत्मा प्रबळे ॥
तेणें बळें मन मावळे । कर्पुर न्यायें ॥

—रामदास

## ५ नासिका दृष्टीयोग

नासिका दृष्टीयोगाचा अभ्यास कित्येक करतात. **श्रीमद्भगवद्गीतेच्या** सहाव्या अध्यायांत हा अभ्यास खालील श्लोकांत सांगितला आहे.

समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥

यांत नासिकाग्रावर दृष्टी स्थिर करून नामस्मरण करतात. नवीन

अभ्यास करणारानें नासिकाग्र म्हणजे प्रथम नाकाचा शेंडा असाच अर्थ घेतला पाहिजे व सुरवातीस त्यावरच दोन्ही डोळ्याची दृष्टी स्थिर करावयास पाहिजे. नासिकाग्र आम्हांस दिसत नाहीं अशी कांहींची तक्रार असते. नाकाचे शेंड्याकडे पाहून जो भाग दिसेल त्यावरच दोन्ही डोळ्यांची दृष्टी स्थिर करण्यास लागावें ह्मणजे नासिकाग्र ह्मणजे काय व त्यावर दृष्टी कशी स्थिर रहाते हें कळूं लागेल. भ्रूमध्य—दोन भुवयांमधील भाग हेंहि नासिकाग्र उलट दृष्टीनें होतें. पण तेथें नवीन साधकानें एकदम दृष्टी स्थिर करण्यास सुरवात करूं नये. कारण तसें करूं लागल्यास डोळ्यावर भयंकर ताण पडून दृष्टी विघडण्याचा संभव असतो. चुकीचा अभ्यास केल्यामुळें दृष्टी बिघडलेले लोक आमचें पहा-ण्यांत आहेत. क्रमवार व सशास्त्रच अभ्यास करावयास पाहिजे. हट-योगांत प्रथम त्राहटकाचा अभ्यास सांगितला आहे. कोणत्याहि वस्तूकडे डोळ्याचे पाते न लवतां टक लावून एकसारखें पहाणें यास **त्राहटक** ह्मणतात. नासिकाग्र दृष्टीयोगांत प्रथम त्राहटकाचा अभ्यास होतो. नासिकाग्र दृष्टी ठेवून पश्यंति वाचेंत मनांतलेमनांत नामस्मरणाचा अभ्यास करणारांस प्रथम थोड्यावेळानंतर डोळे दुखूं लागल्याचा अनुभव आला तर लगेच डोळे मिटून पश्यंति वाणींत नामस्मरण करावें व पुन्हां नासिकाग्र दृष्टी ठेवावी. अशा तऱ्हेनें अभ्यास वाढवीत गेल्यावर कांहीं दिवसांनीं कित्येक तास सुद्धां अचल दृष्टी ठेऊन राहतां येतें ! दृष्टी हळूं हळूं भ्रूमध्याकडे वर चढत गेली ह्मणजे ती भ्रूमध्यावर स्थिर करावी.

नयनगर्भाप्रति । भ्रूमध्यें लक्षी ॥
ऐसें लक्ष्य लक्षिता । निज प्रगटेल तत्वता ॥
एकनाथ.

भ्रूमध्य हें अग्निचक्र ऊर्फ आज्ञाचक्र मानिलें आहे. ह्या ठिकाणीं ध्यान धरल्यानें अंगुष्ठमात्र आत्म्याचा साक्षात्कार होतो.

चक्षूंचें देखणें सरे । ज्ञानदृष्टी पाहोनी विरे ॥
देखणेपणें वीण उरे । सर्वांग देखणा ॥

—रामदास

भ्रूमध्याच्या ठिकाणीं अनुसंधान ठेवीत गेल्यास पुढें पुढें असा अनुभव येईल कीं, आपले श्वासोच्छ्वासहि अगदीं हळू हळू चालत आहेत. असें होणें सहाजिक व क्रमप्राप्त आहे. कारण मनाचा जसजसा लय होत जाईल तसतसा प्राणाचाही लय होत जाईल. मन व प्राण ह्या एकाच वायूच्या द्विधा वृत्ति आहेत. अशा अभ्यासानें चित्ताची एकाग्रता होत जाते. अंतःकरणास समाधान प्राप्त होत जाते. जसजसा अभ्यास होईल व लय होत जाईल तस तसें अतींद्रिय ज्ञान प्राप्त होत जातें. कर्णामध्यें नाद ऐकूं येण्यास प्रारंभ होतो किंवा दृष्टीपुढें निरनिराळे प्रकाश दिसूं लागतात. चत्वार देहाचे निरसना नंतर अणुब्रम्हापासून प्राप्त होणारे देवयान पंथावरील अनुभव प्राप्त होतात. अशाप्रकारें स्वस्वरूप दर्शन होतें !

## ६ पवनजय

श्वासोच्छ्वासावर लक्ष ठेवून त्यावेळीं नामस्मरण—जप करावयाचा अशी एक अभ्यासाची पद्धती आहे. नाकानें आपण आंत वायु घेतो तो श्वास व बाहेर सोडतो तो उच्छ्वास होय. श्वास आंत घेत असतांना सः असा जप करावयाचा व तो बाहेर सोडतांना अहं असा जप करावयाचा, या रीतीनें श्वास आंत घेतांना व तो बाहेर सोडतांना **सोहं** चा जप करावयाचा अगर तो तसा होत आहे अशी भावना करावयाची. श्वासोच्छ्वासावर अशा प्रकारें सतत

अनुसंधान ठेवण्याचा अभ्यास केल्यावर श्वासाचा निरोध व्हावयास लागतो. तो हळू हळू वाढूं लागल्याचा अनुभव येत जाईल. मनुष्याच्या नाका वाटे साधारणतः १२ अंगुलेपर्यंत वायु वाहतो असें नाकापुढें हात धरल्यास व श्वास सोडून पाहिल्यास कळेल. जस जसा उपरिनिर्दिष्ट प्रकारें अभ्यास होत जाईल तस तशी वायूची बाहेर वाहण्याची गती कमी होत आहे असा अनुभव येईल. अशा प्रकारें प्राणाचा लय होत जातो त्यास **पवनजय** असें ह्मणतात. प्राणाचा लय होऊं लागला कीं मनाचाहि लय आपोआप होत जातो. चित्ताची एकाग्रता वाढत जाते. फक्त स्फुरण रूप जप परा वाचेनें होत असल्याचा अनुभव प्राप्त होतो व कालांतरें करून आत्मसाक्षात्कार होतो.

एकांती मौन्य धरोनी बैसे । सावध पाहतां कैसें भासे ॥
सोहं सोहं ऐसें । शब्द होती ॥
उच्चारे वीण जे शब्द । ते जाणावे सहज शब्द ।
प्रत्यया येती परंतु नाद । कांहीं नाहीं ॥

—रामदास

पवनजय झाला ह्मणजे केवलकुंभक साध्य होतो. श्वास घेणें व सोडणें ह्या क्रिया ज्या आवस्थेंत बंद असतात त्यांस केवल कुंभक ह्मणतात. केवलकुंभक वाढत गेला ह्मणजे कुंडलिनी उत्थापन होते ! सुषुम्णा मार्ग खुला होतो. व त्यांतून प्राण वर चक्रभेदन करीत जातो. भ्रूमध्यावर आज्ञाचक्रीं तो येतांच अगुंष्टमात्र आत्म्याचें दर्शन होतें !

## ७ षाण्मुखी मुद्राभ्यास

षाण्मुखीमुद्राभ्यास हाहि अभ्यासाचा एक प्रकार आहे.

षाण्मुखी मुद्रा ही हटयोगामध्यें सांगितली आहे. त्यांतील प्राणनिरो-धन तेवढे वगळून बाकीची मुद्रा करतात. दोन्ही खांदे व बाहू वर उचलावे. ते पाठींचे रेषेंत आणून कोपरापाशीं हात वाकवून मग कानामध्यें दोन्ही आंगठे घट्ट घालावे. डोळे मिटल्यावर तर्जनी ह्मणजे आंगठ्याजवळचे बोट व मधलें बोट यांनीं, जोराचा दाब न पडेल अशा बेतानें, डोळे दाबून धरावें. अशा प्रकारें ही मुद्रा धारण केल्या-वर कानामध्यें उत्पन्न होणाऱ्या आवाजाकडे लक्ष ठेवावें व त्याच वेळीं भ्रूमध्यावरही लक्ष ठेवावें.

उद्धवा याचें कारण । सहज स्थितीचें आसन॥
ध्वनीं अंतरगत करून । ध्यान लक्षी ॥
ध्वनी ठेविजे वृत्ती । नाद लावूनि श्रोत्रीं ॥
नयनगर्भाप्रतीं । भ्रूमध्यें लक्षी ॥
ऐसें लक्ष लक्षिता । निज प्रगटेल तत्वता ॥
अणुरेणु पूर्ण भरितां । दिसतील सहजी ॥

—एकनाथ

अशा तऱ्हेच्या अनुसंधानानें देवयान पंथावरील अनुभव, ज्यांचें अंतःकरण सदाचारानें शुद्ध झालें आहे व ज्याचें ठिकाणी सत्वगुण प्रधान वृत्तीचा बराचसा उद्भव झालेला आहे अशा साध-कास लवकर येऊं लागतात. या अभ्यासांत बोटांनीं डोळे जास्त दाब-ल्यामुळें बुबुळावर कमीजास्त दाब बसण्याचा संभव आहे व त्यामुळें डोळे दुखूं लागण्याचा संभव असतो. तरी अगदीं थोडा दाब पापण्यावर द्यावा. डोळे दुखूं लागताच हात सोडावे व पुन्हां धरावे. इतकेंहि करून न जमल्यास अभ्यासी पुरुषाकडून याची माहिती घ्यावी. कानामध्यें प्रथम मोठे आवाज उत्पन्न होतील. डोंगराच्या खिंडींतून बैलगाडी

अगर रथ जातांना त्याचे चाकांचा जसा आवाज ऐकूं येतो त्याच-प्रमाणें कर्णामध्यें आवाज प्रथम ऐकूं येतात. हे मोठे आवाज सोडून पुढें उत्पन्न होणाऱ्या सूक्ष्म नादावरच अनुसंधान ठेवावें. ह्मणजे अभ्यासानें पुढें पुढें दशविध नादाचे-प्रकार ज्यांस अनुहत ध्वनी असें म्हणतात ते ऐकूं येऊं लागतील. ह्या अभ्यासांतील अनुभव येऊं लागेपर्यंत तो रुक्ष, कंटाळवाणा व त्रासदायक वाटेल. ह्मणून नवीन साधकानें या प्रयत्नांत फारसें पडूं नये. मनोलयाचें सोपे अभ्यास प्रथम करावेंत. चित्त एकाग्र होत असल्याचा अनुभव येऊं लागला ह्मणजे मग हा अभ्यास करून पहावा. उच्च तऱ्हेच्या साधकास हा अत्यंत फलदायी व शीघ्रगामी अभ्यास आहे. देवयान पंथावरील दृश्य रूपाचीं दर्शनें घेत घेत शेवटीं आत्मरूपाचे दर्शन फार थोड्या वेळांत या अभ्यासानें घेतां येतें. हा जवळचा मार्ग आहे. जितकी जास्त तयारी होईल त्या मानानें, डोळे मिटून अंगठा एका डोळ्यावर व तर्जनी एका डोळ्यावर ठेवतांच लगेच प्रकाश दिसूं लागतात व स्वस्वरूपाप्रत चट्कन जातां येतें. हे प्रकाश कशा प्रकारचे दिसतात व कोणच्या क्रमानें ते दृग्गोचर होतात याचें वर्णन यथावकाश पुढें देण्यांत येईल.

ह्या अभ्यासाचें वर्णन व यानें होणारी प्राप्ती थोडक्यांत **जनार्दनस्वामींनीं** सांगितली आहे.

> कर्णीं घालूनिया बोटें । अंगुळ्या नेत्रांत निकटें ॥
> तेणें विकाशुनि भेटे । शुभ्रवर्ण ॥
> तयाचें हें नांव बिंब जीवदशा । तेणें स्वरूपदशा भरूनि येते ॥
>
> — जनार्दन स्वामी

## ८ वृत्तिलय.

वृत्तींचा उद्भव व लय याचें ज्ञान करून घेऊन वृत्तींचा

लय करण्याचाहि एक अभ्यास आहे. याचा थोडा विचार करूं. सर्व मनुष्यांच्या वृत्ति बाह्योन्मुख स्वभावतः असतात. त्या वृत्ति अंतर्मुख करावयास पाहिजेत. कोणत्याहि गोष्टींचा आपण जेव्हां विचार करीत असतो तेव्हां वृत्ति अंतर्मुख होत असते. ह्याबरोबरच अनुसंधान सुरूं असते. वृत्ति उद्‌भवतात कशा, त्यांच्या क्रिया कशा सुरूं असतात व शेवटीं त्या लीन कशा होतात हें पाहिलें पाहिजे. आपण मन एकाग्र करण्याचा प्रयत्न करून नामस्मरण अगर जप करूं लागलों, किंवा ईश्वराच्या सगुणरूपाचें ध्यान करूं लागलों, किंवा नासिकाग्र दृष्टी ठेऊन नामस्मरण करूं लागलों अगर श्वासो-च्छ्वासावर लक्ष ठेऊन अजपाजप करूं लागलों, किंवा दुसरा कोणताहि अभ्यास करूं लागलों तर असा अनुभव येतो कीं, प्रथम एका वृत्तीचें चिंतन सुरूं होतें न होतें तों तावडतोब दुसरीच वृत्ति उत्पन्न होते. तिच्या नंतर निराळीच वृत्ति उद्‌भवते. अशा प्रकारें एकांतून एक व एकामागून एक अशा असंख्य वृत्ति उत्पन्न होतात. अभ्यासास अगर साधनास बसलें कीं, मनामध्यें हजारों विचार उत्पन्न होऊन मन चंचल होतें अशी साधक तक्रार करतात ती ह्यामुळेंच. असें मन चंचल झालें, असंख्य वृत्ति उद्‌भवूं लागल्या तरी सुद्धां, अभ्यास न सोडतां तो सुरूं ठेवावा असें सद्‌गुरू नेहमीं सांगतात. वृत्तीचा असा एक चांगला गुण आहे कीं, ती विषयाकार होऊन पुष्कळ हिंडली तरी कालांतरानें पुनः पूर्वस्थळीं येते. एक क्षणच कीं पुन्हां विषयाकार बनते. अशी वृत्ति पूर्वस्थळावर आल्यावर त्या ठिकाणींच चिंतन करून तिला परमेश्वरचरणीं अगर नामस्मरणांत गुंतवावी, म्हणजे कांहीं काल टिकेल. अशा तऱ्हेच्या अभ्यासानें जी वृत्ति नाना विषयांतून भ्रमण करून

परत येईल ती पहिल्यापेक्षां निम्या फेऱ्यांतून परत येईल. पुढील खेपेस त्याहींपेक्षां कमी फेऱ्यांतून परत येईल. त्या पुढील खेपेस त्याहींपेक्षां कमी फेऱ्यांतून परत येईल. असें होतां होतां वृत्ति उठली कीं लगेंच तिचें ज्ञान होऊं लागेल ! तत्क्षणीं असा बोध होऊं लागेल कीं, ' वृत्ति उठली तरी आपण तद्रूप होतां कामा नये, तर ती वृत्ति परत फिरवून आपल्या अभ्यासाचें जें ध्येय असेल, त्या ध्येयाकार ती बनविली पाहिजे ' वृत्तीचा उद्भव कळूं लागला कीं, तिचा लयही कसा होतो हें पाहिलें पाहिजे व तो कळतोहि. या दोन्ही स्थिती कळल्या ह्मणजे ' आपण वृत्तीपासून निराळे आहों व वृत्तीचा खेळ पहाणारे तिऱ्हाईत आहों ' हेंहि सहज कळून येतें. हें निराळें लिहीण्याचें कारण नाहीं. यास साक्षित्व म्हणतात ! हें आपलें स्वरूप होय ! हें लिहिण्यास व विचारांतीं कळण्यास जितकें सोपें आहे त्याचे कितीतरी पटीनें अनुभवणें कठीण आहे. अशा प्रकारें वृत्तीचा लय होत गेल्यावर वृत्ति एकाग्र बनते.

लाभाचिया सोसें पुढें चालें मन । धनाचा कृपण लोभी जैसा ॥
तुका ह्मणे गंगा सागर– संगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मी एकमय ॥

तुकाराम

ध्येय धाता ध्यान व ज्ञेय ज्ञाता ज्ञान, वगैरे त्रिपुटींचा नाश होऊन ती तन्मय तदाकार बनते. तशी ती बनली कीं अंगुष्ठमात्र **आत्म्याचा** साक्षात्कार लगेंच होतो.

आतां काय उरलें वाचे । पुढें शब्द बोलावयाचे ॥
देखती जें डोळे । रूप आपुलें ते खेळे ॥
षड्ऊर्मी हृदयांत । यांचा अंत पुरवुनी ॥
तुका ह्मणें खुंटे आस । तेथें वास करीं तो ॥

—तुकाराम

वर जे क्रमवार लयाभ्यासाचे प्रकार सांगितलें त्या देवयान पंथावरील सुरवातीच्या पायऱ्या होत. कोणत्याहि अभ्यासाची जसजसी एक एक पायरी ओलांडली जाईल तसतसे त्यास अनुभव येत जातात. पिंडाचें अगर व्यष्टीचे ह्मणजे या शरीराचे जे चार देह व अवस्था कल्पिल्या आहेत त्यांच्या प्रकाशाचे रंग ठरलेले आहेत. नासिकाग्र-दृष्टी योगाचा अभ्यास असो, पवनजयाचे अभ्यास असो, ध्यानयोग व नामस्मरणाचा अभ्यास असो, कोणत्याहि अभ्यासाचे वेळीं प्रथम मन जेव्हां अत्यंत चंचल असते तेव्हां अष्टधा प्रकृतीचा अंधःकार दिसतो.

तयाचें ऐकिजे कारण । प्रथम अंधःकार निबिडपण ॥
ते अष्टधाप्रकृति जाण । निश्चयेसी ॥

—एकनाथ

स्थूळ देहाचा आरक्तवर्ण धरिला आहे. मन थोडें स्थीर होत गेले ह्मणजे आरक्तवर्ण दिसूं लागतो. पुढें सूक्ष्म देहाचा श्वेतवर्ण दिसूं लागतो. त्याचाहि लय पुढचे पायरींत झाला ह्मणजे श्वेतवर्ण जाऊन पीतवर्ण दिसूं लागतो. हा कारणदेहाचा वर्ण समजतात. सतत अभ्यासानें चित्ताची जसजसी एकाग्रता होत जाईल तसतसे हे प्रकाश लवकर दिसूं लागतील, व शेवटीं पीतप्रकाशाचा लय नीलबिंदु-दर्शनांत होईल! ह्मणजे महाकारणदेहांत होईल. या देहांचे रंग आरक्त, श्वेत पीत असें न मानतां कांहीं सत्पुरुषांनीं श्वेत, पीत, आरक्त असें मानले आहेत. हे वर्ण स्पष्टपणें दिसत नाहींत. अर्धवट मळकट–मजीट दिसतात. कारण पिंडाचे चारी देह हे अशुद्ध मायो-त्पत्तीपासून झाले आहेत. तेव्हां या वर्णांचे अनुक्रमांत जरा थोडा फरक पडला तरी नीलबिंदुदर्शन मात्र या तीनही वर्णांचे शेवटीं होतें.

यांत मतभेद मुळींच नाहीं हे लक्षांत ठेवण्याजोगें आहे. हा चौथा देह आहे. हे चौथ्या अवस्थेचें दृश्य आहे ! चौथ्या वाणीचे प्रकाशन आहे. त्याचें अतीत आत्मा आहे. नीलबिंदु ही ज्ञानस्वरूप अवस्था असल्यामुळें त्यास **अणुब्रह्म** असें ह्मणतात. त्याचें दर्शनानंतर आपलें स्वस्वरूप जों आत्मा त्याचा साक्षात्कार होतो ! त्याचें स्पष्ट दर्शन होतें असें आपलें साधुसंत सांगतात.

**रक्त, शुभ्र वर्ण, पीत निळा भासे । दृष्टि, शुद्ध असें तयामध्ये ॥**

—ज्ञानेश्वर

**रक्त, श्वेत, पीत कृष्ण प्रभाभिन्न । चिन्मय अंजन सूदले डोळा**
**तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टी झाली । कल्पना निमाली द्वैताद्वैत ॥**

—तुकाराम

चत्वार देहाला चत्वार शून्यें कल्पिलें आहे. त्यांचें वर्णन करतांना जनाबाई या प्रकाशाचें वर्णन करतात.

**प्रथम शून्य रक्तवर्ण । त्याँचें नांव अधः शून्य ॥**
**ऊर्ध्व शून्य श्वेतवर्ण । मध्यें शून्य श्यामवर्ण ॥**
**महाशून्य नीलवर्ण । त्यांत स्वरूप केवळ ॥**

—जनाबाई

अभ्यासाचे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत त्यामध्यें चार स्थिती आहेत असें दिसून येईल. यास अभ्यासातील पायऱ्या अगर अवस्था ह्मटलें तरी चालेल. यासच प्रणवाच्या चार मात्रा मानण्यास हरकत नाहीं. अकार, उकार, मकार व अर्धमात्रा असा तो क्रम आहे. यापुढील विवेचनांत प्रत्येक अभ्यासांतलि स्थितींचा पुनरुच्चार न करतां

त्यास मात्रा अगर अवस्था अगर देह या नावांनें संबोधण्यांत येईल. मनाचा लय क्रमवार कसा होत जातो एवढेंच लक्षात घ्यावे. जसजसा मनोलय होत जाईल तसतसे नानावर्ण थोडें थोडें दृग्गोचर होतील. कांहीं काल तरी मन जेव्हां चौथ्या अवस्थेप्रत जाईल त्यावेळीं अणु-ब्रम्हाचा साक्षात्कार होईल. कित्येक साधकांना क्रमवार मनोलय कसा होत जातो हें समजत नाहीं. त्यांना दृढ अभ्यासानें एकदम अणुप्रमाण प्रकाशरूप दृग्गोचर होतें. असें रूप दिसूं लागले ह्मणजे चित्ताची एकाग्रता क्षणभर तरी साधुं लागली असें साधकानें ओळखावें. चारी अवस्थांचें श्वेतपीतरक्तादि वर्ण दिसणें हें अर्धवट ज्ञान आहे. ते साधारण दिसूं लागतांच त्यास ब्रह्मसाक्षात्कार झाला असें कित्येक समजून घेतात. पण हें खरें नव्हे. हा भ्रम आहे. यास साधकानें फसूं नये. अणुब्रम्हाचा साक्षात्कार होणें ही देवयानपंथावरील **पहिली पायरी** आहे. हा सूक्ष्म प्रकाश ब्रम्हस्वरूपाचा आहे. हा दिसूं लाग-तांच अतींद्रिय-ज्ञान उत्पन्न झालें आहे असें समजावें. अतींद्रियज्ञान उत्पन्न झाल्याची ही खूण आहे. ही अवस्था साधकास केव्हां, कशी उत्पन्न होईल. अभ्यास करतां करतां ती अभ्यासांतच उत्पन्न होईल किंवा इतर वेळींहि एकदम ती प्राप्त होईल. प्रकाशरूप परमात्म्याची रूपें येथून पुढें अनुभवण्यास मिळतात. दृष्टीचा विषय पाहणें हा आहे. नेत्र उघडल्यानंतर आपणास कोणतीहि वस्तु दिसते. पण ज्ञाननेत्र उघडल्यावर डोळे उघडे असतांनासुद्धां पंचभूताच्या पृष्ट पडद्यावर [ back ground ] प्रकाशरूप अणुब्रह्म दिसत असते. डोळे मिटल्या-नंतरसुद्धां ही अवस्था नाहींशी होत नाहीं. त्या ज्ञाननेत्रास special sense अतींद्रियज्ञान असें ह्मणतात हें मागें सांगितलें आहे. ह्या अणुब्रम्हाचें स्वरूप कसें असतें हें एकनाथ महाराजांनीं सांगितलें आहे.

ऐसें लक्ष लक्षितां । निज प्रगटेल तत्वता ॥
अणूरेणु पूर्ण भरिता । दिसतील सहजी ॥
—एकनाथ

नाथांचा ' प्रकाश दीपिका ' या नांवांचा एक छोटासा अप्रतीम ग्रंथ आहे. त्याचप्रमाणें समर्थ रामदासस्वामींचा 'दासबोधाचा सोलीव अर्थ ' या नांवाचा असाच लहान पण सुंदर ग्रंथ आहे. हे दोन्ही ग्रंथ इस्लामपूर येथील ' ब्राह्मण ' मासिक पत्रिकेमध्यें प्रसिद्ध झाले आहेत. ती प्रकरणें सर्वांस कळावीं ह्मणून या पुस्तकाचें शेवटीं परिशिष्टरूपानें छापीत आहों. वाचकानें ती शांत चित्तानें लक्ष पूर्वक वाचावी. त्यामध्यें क्रमवार, असंदिग्धपणें व स्पष्टपणें देवयानपंथावरील अनुभव सांगितले आहेत. असो. मधून मधून येणारीं कांहीं अपरि-चित अवतरणें त्यांतील आहेत; इकडे वाचकांनीं लक्ष द्यावे. तुकाराम महाराजही तेंच सांगतात.

अणूंचिया ऐसें । असें भरले प्रकाशें ॥
—तुकाराम

हे अणुरेणु प्राण्यांचें मूळस्वरूप जी जीवनकला ( animal cell ) त्याप्रमाणें दिसतात. सूक्ष्मदर्शक यंत्रा-( mycroscope ) खालीं शास्त्रज्ञ नुसत्या डोळ्यांनीं न दिसणाऱ्या प्राण्यांच्या कला पहात असतात. अशा अदृश्य दर्शनाचे वेळीं सुद्धां त्या समवेत तसेंच प्रकाशाचे अणु त्या ठिकाणीं आपण पहात असल्याचें दृश्य या मार्गां-तील अभ्यासी शास्त्रज्ञ पुरुषास पहाण्यास मिळाले असेल ! थोड-क्यांत सांगावयाचें ह्मणजे ही तूर्या ज्ञानस्वरूप अवस्था असल्यामुळें यांत सतत राहतां येतें. इच्छा नसतांही हें दृश्य दिसतें हें केवढें आश्चर्य आहे !

अहो पाहतां कीर प्रतिभासे । येथ नवलावो काय असे ॥
परी न पाहताही दिसे । चोज आइका ॥

—ज्ञानेश्वर

## अकार—ब्रह्मदेव.

येथून पुढें देवयानपंथावरील अनुभव कसकसे प्राप्त होतात हें आमचे साधुसंत उघड सांगतात. असंख्य अणुरेणूंचे नाना प्रकार दिसूं लागतात. याचा शेवट अंगुष्ठमात्र आत्म्याचें स्पष्ट दर्शनांत होतो. यांतही चार अवस्था अगर याच्या चार मात्रा सांगितल्या आहेत. या मात्रांच्या देवताही ठरलेल्या आहेत. त्या मात्रा म्हणजे अकार, उकार, मकार ह्या होत व यांच्या अनुक्रमें ब्रह्मा, विष्णु महेश अशा देवता आहेत. प्रकाशदीपिकेमध्यें साक्षात्कारांतील कोणत्या अवस्थांना कोणते देव समजले आहेत हें स्पष्टपणें सांगितले आहे. आह्मांला अमुक देवाचें दर्शन झाले आहे व त्या देवाचें स्वरूप अमुकप्रकारचें आहे असें जेव्हां साक्षात्कारी पुरूष ह्मणतात तेव्हां ते कोणत्या अवस्थेशीं लीन झाल्यावर ह्मणतात हें आतां ध्यानांत घ्यावें.

अणु किंवा बिंदुदर्शनानंतर ह्मणा प्रथमः—

मुक्त मोती कृश मोठी । तुज पाहतां दिसता दृष्टी ॥

— एकनाथ.

असें जें दृश्य दिसेल तो ब्रम्हदेव आहे असें समजावें असे नाथ ह्मणतात.

जें कां दिसे मुक्ताकार । तोचि ब्रह्मा हा निर्धार ॥
अनेक रूपासी परपार । भरूनीं असे ॥

—एकनाथ

ज्ञानेश्वर महाराजही असेंच रूप प्राप्त होतें असें सांगतात.

सुढाळ ढाळाची मोती । अष्ठे आंगे नवे ज्योती ॥
जया होय प्राप्ती । तोची लाभे ॥

—ज्ञानेश्वर

## उकार—विष्णु.

देवयान पंथावरून चालू लागले म्हणजे त्यानंतर शेषशाई भगवान् श्रीविष्णूचें रम्य व चमत्कृतिजन्य मंदीर लागतें. या रम्य ठिकाणीं तिळाच्या झाडाची बारीक, मृदु अशी फुलें मधुर अशा वायुलहरीमुळें डोलत असतांना दिसतात. तरूवरील राघूंच्या नेत्रांचें तेज भासमान होते. निरनिराळ्या तेजांचीं गुंडाळीं दृग्गोचर होतात व सर्व सृष्टी तारकांनीं भरून गेली कीं काय असें वाटतें!

रौप्य ताराशी सृष्टी । भरली दिसे ॥
अनेक घुंगुरू तळपती । कीं नक्षत्रें डळमळती ॥
असती पुष्पें डोलती । मधुर वातें ॥
इंद्रनीळाची निजज्योती । राघवा नेत्रांची दिसे पंक्ति ॥
तेज गुंडाळले झळकती । अनेकत्वें ॥

—एकनाथ

उकार मात्रेचें हें वर्णन आहे. हाच विष्णु होय. सर्व जगाचा पालनकर्ता हा आहे. त्याचें स्वरूप अवर्णनीय आहे. हा अत्यंत तेजस्वी असून यास बहुरूपी व नाना रुपधर ह्मटलें आहे. हें किती सार्थ आहे हें साधुसंतांनीं आपल्या अनुभवानुरूप केलेल्या खालील वर्णनावरून कळून येईल.

तारा दंडाकार दिसती । तोचि विष्णु निश्चिती ॥
सर्व पालनाची स्थिती । निजगतीकर ॥
नाना तेजाचें गुंडाळे । लक्षिता तरंगिसी फळे ॥
तोचि शेषशाई विमळे । भ्रांति नाहीं ॥

—एकनाथ

या अवस्थेंत भगवान विष्णूचें दर्शन आणखी कसकशा प्रकारें होतें याचेंहि वर्णन आणखी पहा.

गगन भरूनी परवडी । तेंज वरुषे ॥
प्रकाश जीवनाच्या गारा । विघरत द्रवती सरारा ॥
असंभावित तारा । गगनोदरीं ॥

—मेरुस्वामी

या शिवाय आणखी निरनिराळया स्वरूपामध्यें भगवान विष्णूचें दर्शन कित्येकास होत असेल. त्याचीं स्वरूपें ज्याच्यात्यांच्या अनुभवाप्रमाणें अशाच स्वरूपांत पण निरनिराळया प्रकारें असू शकतात.

प्रथम समाधी निविड सर्पाकार । त्यामध्यें आकार चक्राचे ते ॥
झळकती माणीक दिव्य रत्नखाणी । अविनाश देखणी चिन्मयाची
उदयाची ज्योति द्वितियेचा मणि । ही दोन्ही देखणी झाली बापा ॥

—जनार्दन

## मकार—शंकर

देवयान पंथावर प्रथम ब्रह्मदेव नंतर शेषशाई जनार्दन श्रीविष्णु यांचीं मंदिरें लागल्यावर व त्यांचें दर्शन घेतल्यावर पुढें सदा—शिव—अखंड कल्याणकारक जो ईश्वर त्याचें देवालय लागतें. त्या शंकराचें स्वरूप पुढीलप्रमाणें आहे.

क्षणक्षणा रूप पालटे । झळकता विजू हारपे ॥
ज्वाळा भासती आपेआपे । प्रकाश तेजे ॥
तेज दिसे वर्तुळाकारासेसी । चक्रचक्रांत प्रवेशी ॥
तोचि सदाशिव निश्चयेसी । ओळखी तूं ॥
आणिक एक अर्धचंद्राकार । तोचि जाणिजे ईश्वर ॥
जया स्वरूपाचा परपार । न कळे कोणा ॥

— एकनाथ

समर्थ, आपला सत्‌शिष्य जो कल्याण त्यास सांगतात.

तेथें विजू ऐशा कामिनी । चमकताती सुवर्ण रंग ॥
ज्वाळा निघती परोपरी । दंडळुं नको कल्पांती ॥
— रामदास

तेथूनी तिडक्या फुटत । भास्करा ऐशा ॥
त्या परतोनी तेथें मिळती ॥
अभिनव चंद्र संभव । प्रकाश तोय आळलें सजीव ॥
तें मंडलाकारें सदैव । प्रवृत्तिसी आले ॥
— मेरुस्वामी

मेरुस्वामींनीं प्रत्येक अनुभव किती स्पष्टपणें लिहून ठेवला आहे ! हीं सत्‌पुरुषांची वर्णनें वाचतांना आत्मप्रचीति घेतलेल्या साधकांस आनंदाच्या ऊर्मी कां येणार नाहींत ?

## अर्धमात्रा—भगवान् दत्तात्रेय

रजोगुणात्मक, तमोगुणात्मक व सत्वगुणात्मक अशा ब्रह्मा, विष्णु व महेश या त्रयमूर्तीपैकीं प्रत्येकाचें निरनिराळें दर्शन घेतल्यानंतर, त्रिगुणात्मक व एकवटलेल्या अशा त्रयमूर्त्यात्मक भगवान् दत्तात्रेयांचें रम्य स्थान लागतें. ह्यांचें स्वरूप शुद्ध सत्वात्मक आहे. अकार, उकार व मकार या मात्रांचा लय झाल्यानंतर-तीन्ही अवस्थांचा लय झाल्यानंतर-अर्धमात्रेंत वृत्ति स्थिर होते. या स्वरूपाचें दर्शन अत्यंत शांत, आल्हादकारक व प्रसन्नात्मक आहे ! या अ–त्रिनंदनास उघड्या डोळ्यांनीं पहावें. त्याचें तसें दर्शन होतें. तें कोणत्याहि स्वरूपांत व स्थितींत होईल हें सर्वांस ऐकून तरी ठाऊक आहे. अभ्यासी पुरुषास मात्र तें तसें होत असल्याचा अनुभव घ्यावयास सांपडतो. सत्पुरुषांनीं या स्वरूपाचें मोठें बहारीचें वर्णन केलें आहे.

चंद्रसूर्य दिसती उगवले । अनेक तेज पाहतां फाकलें ॥
ऐसें तेज पाहिलें । दृष्टीसी भासे ॥
जो इंदुभास्करापरी भासे । दृष्टी लावूनी समरसें ॥
स्थिर करूनी मानसें । निश्चळ पाही ॥
तयाहि देखुनी । मयुरपिच्छे नीलमणी ॥
ऐसें दिसे निजनयनीं । स्वरूप एक ॥

—एकनाथ.

परमसाक्षात्कारी असे **मेरुस्वामी** नाथांचेप्रमाणेंच आपणास दर्शन घडलें असें सांगतात.

प्रांजळ सूर्यप्रभेचें दृश्य । तैसे पदार्थ दिसती अदृश्य ॥
स्वरूप दृष्टीनें सादृश्य । न्याहाळी समता ॥
अखंड मंडळ दृष्टीनें । विपरीत दृश्य निदानें ॥
भक्त मयुरे प्रेमळें । पिच्छे उभारूनी सोज्वळ ॥
सुश्याम वर्ण सकळे । नृत्य करिती ॥

—मेरुस्वामी.

हीं **अणोरणीयान्** । अशीं प्रकाशरूप ब्रम्हतेजें असल्यामुळें तीं अत्यंत सूक्ष्म रूपांत दिसणें साहजीक आहे. आकाशांत रात्रीचे वेळीं दिसणाऱ्या स्वर्गंगेंत ऊर्फ आकाशगंगेंत, असंख्य सूर्य व त्या प्रत्येक सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या सूर्यमालिका अशाप्रकारें असंख्य तेजोगोल आहेत, असें खगोलशास्त्रज्ञ ह्मणतात. या सर्व तेजोगोलास गति आहे. त्याप्रमाणें उपरीनिर्दिष्ट अवस्थेंत सूर्यासारखी वाटोळी व चंद्रासारखी अर्धचंद्राकार असंख्य तेजस्वरुपें दृष्टीपुढें वावरतांना दिसतात. तें रम्य स्वरुप पाहतां पाहतां त्या ठिकाणीं चित्ताची एकाग्रता जसजशी होत जाते तसतशी तीं तेजें एकत्र होत असल्याचा व स्थिर

होत असल्याचा अनुभव येईल. याच्या पुढचा अभ्यास कसा करावा हें पहा.

तया खोविजे दृष्टी । तया भ्रूमध्यें होय भेटी ॥
ते येऊनि नेत्रसंपुटी । होतसे स्थिर ॥

—एकनाथ

श्रीसमर्थ आपले शिष्यास या अभ्यासाची नवलाई सांगतात च या शेवटचे वेळीं धैर्यानें पुढील मार्ग आक्रमण करण्याचा इशारा देतात.

अनंत भानु तेज अद्भुत । खदिरांगार ज्वाळा उसळत ॥
धारिष्ट तेथें न निभत । दुर्घट विभू तेथीचा ॥
तेथें हुशारीचें काम । अग्नी लक्ष घालुनि नेम ॥
तीर लावून सुगम । मागे सारी सूर्याते ॥

—— रामदास

## उन्मनी—अवस्था

वर वर्णन केल्याप्रमाणें सूक्ष्मात्सूक्ष्मतरं नित्यम् । अशा तेजोमय असंख्य चंद्र सूर्यांचें ठिकाणीं धारणा धरली ह्मणजे मनाचा संपूर्ण लय होऊन, आपण एका विशिष्ट स्थितींत असून आनंदाचा उपभोग घेत आहों असें अनुभवास येतें. या अवस्थेस उन्मनी—अवस्था असें ह्मणतात. हिला अवस्था असें ह्मणता येणार नाहीं. पण ही स्थिती कळण्याकरितां हा शब्द प्रयोग वेदांत शास्त्रांत केला गेला आहे. येथें बुद्धि कुंठित होते, वाचा लीन होतात व मनाचा मागमूसहि रहात नाहीं. वाचेस व मनास अगोचर असें स्वस्वरूप आहे याचे कारण समर्थ सांगतात कीं,

पाहो जातां त्यासी। । क्षयोचि पाहत्यासी ॥
ह्मणुनि मनासी । अगोचर ॥
—रामदास

उन्मनी—अवस्थाचें व त्या अवस्थेंत हळुहळूं ब्रम्हतेज कसें प्रगट होत जातें याचें वर्णन पुढील प्रमाणें करतात.

त्यातें निजदृष्टीचा प्रवेशु । सहज उन्मनी सौरसु ॥
मग निज तेजाचा प्रकाशु। ब्रह्मरूप ॥
ऐशी ब्रह्मस्वरूपाची पेटी । पाहतां उघडेल दृष्टी ॥
तटस्थांची वृत्ति। कोण सांगे ॥
तेथें ब्रह्मतेज प्रगटले । साध्य साधन खुंटले ॥
आपआपण झालें । स्वस्वरूप ॥
—एकनाथ

या वरहुकुम श्रीज्ञानेश्वर महाराज आपल्या एका आरतींत या अवस्थेचें यथातथ्य व आल्हादजनक वर्णन करतात.

मन हें उन्मन झालें । नसें बद्धतेची वार्ता ॥
हेतू हा मावळला । शब्दा आली निःशब्दता ॥
तटस्थ होऊनी ठेलें । निजरूप पाहतां ॥
तें सुख काय सांगू । वाचे बोलता नयें ॥ धृ० ॥
—ज्ञानेश्वर

## आत्मा—स्वस्वरुप

देवयान पंथावरील—या प्रकाशमय मार्गावरील —पांथिकास विश्रांतिस्थल म्हणजे स्वरूपदर्शन हें होय ! उन्मनी—अवस्थेंत, स्थूल सूक्ष्मादि चारी देहांतीत; जागृत, स्वप्नादि चारी अवस्थांतींत; परा

पश्यंति आदि चारी वाचांतीत; अकार, उकारादि चारी मात्रांतीत असा पिंण्डदेहाचा स्वामी जो आत्मा, त्याचा साक्षात्कार प्रणवाभ्यासानें होतो. आत्म्याचें प्रत्यक्ष दर्शन होतें असें आमचें श्रेष्ठ साधुसन्त स्पष्टपणें सांगतात. हें दर्शन ज्यास झालें तोच खरा ब्रम्हज्ञानी! ब्रम्हज्ञानी कोण तर ज्यानें या देहामध्येंच प्रकाशरूप पाहिलें !

देहीं देव पाही डोळा । तोचि ब्रह्मज्ञानी ॥

— एकनाथ

आत्मा हा प्रत्यक्ष गोचर आहे व तो स्पष्टपणें दिसावयास पाहिजे. आरशांत जसें आपण आपलें रूप पाहिलें म्हणजे मनास आनंद होतो व आपलें स्वरूप तरी काय आहे हें कळतें, त्याप्रमाणें शुद्ध अंतःकरणांत मनोलयाभ्यासानें देहाचा साक्षी जो आत्माराम त्यांचें दर्शन होतें ! यांत गुह्य असें कांहीं नाहीं ज्यांना अनुभव घ्यावयाचा असेल त्यांनीं घेऊन पहावा म्हणजे प्रत्यक्ष दिसेल यांत सांगोसांगीं कांहीं नाहीं. ही नुसती कल्पनागम्य गोष्ट नसून प्रत्यक्ष दृग्गोचर होणारी वस्तु आहे ! ज्ञानेश्वरांचे गुरु **निवृत्तिनाथ** दृष्टांत पूर्वक अचूक वर्णन करतात.

सर्व घटीं वसे तो आत्मा प्रकाशे ।
प्रत्यक्ष आह्मां दिसे गुरुकृपा ॥

—निवृत्तिनाथ

वेदांत शास्त्रांत घटबिंबाचा दृष्टांत आहे. मातीचे घटांत ह्मणजे भांड्यांत पाणी भरून ठेविलें व तें दिवसा उन्हांत ठेविलें तर त्यांत सूर्य बिंब दिसतें. हजारों घट निरनिराळ्या ठिकाणीं ठेविलें तरीहि त्या सर्वांत सूर्यबिंब दिसेल. सूर्य आकाशांत एकच असला तरी हजारों घटांपैकीं प्रत्येकांत त्यांचें बिंब उमटलेलें दिसेल आतां

घट फुटला तर सूर्यबिंब दिसणार नाहीं. तद्वत् जीवांचे नानादेह हें घटाप्रमाणें आहेत व त्या ठिकाणचें चैतन्य हें बिंबरूप आहे. देह–रूपीं घट नाहींसा झाला तर त्यांत बिंबरूप चैतन्य दिसणार नाहीं. अविनाशी सूर्य हा सूर्यरूपानें आहेच. हा दृष्टांत शब्दरूपानें दिला आहे. त्या बरहुकुम हा दृष्टांत आत्मानुभवांत तत् सादृश्य व यथातथ्य कसा आहे हें वरील अवतरणांत पहावयास सांपडलें म्हणजे मनास एक-प्रकारें आनंद झाल्याशिवाय रहात नाहीं ! **ज्ञानेश्वर महाराज** या विषयावरील आपल्या एका पद्यामध्यें म्हणतात कीं, जडइंद्रियांना अगोचर अशी ही वस्तु मीं बोटानें कशी दाखवूं ? गुरुकृपेनें यांचे ज्ञान प्राप्त होतें तेव्हां हें गुह्य तूं गुरुपुत्राकडूनच समजाऊन घे.

**मागे पुढें सर्व आसतें । तुझ्या दृष्टीपुढें दिसतें ॥**
**कैसें बोटानें दाखवू तुला । पाहे अनुभव गुरुच्या मुला ॥ ध्रु० ॥**
**ही खुण त्वां ओळखुनि घ्यावी । गुरुपुत्रा जाऊनी पूसावी ॥**
**तो तुला नेवुनी दाखवी । सोय सांगितली ज्ञानदेवे ॥**

—ज्ञानेश्वर

समर्थ परंपरेतील एक संत व नाथमहाराज हें दोघे आपले नेहमींचे पद्धतीप्रमाणें असंदिग्धपणें सांगतात.

**रात्रींदिवसविण उदेला । आश्चर्य सूर्य ॥**
**अतींद्रिय तो देखिला । इंद्रियद्वारें ॥**

— मेरुस्वामी.

**माझें मज दावियेलें माझें मज दावियेलें ।**
**उघडे अनुभविलें परब्रह्म ॥**

— एकनाथ.

वरील विवेचनावरून स्वस्वरुपाचा साक्षात्कार कसा होतो हें कळून आलें असेलच. आतां या आत्म्यासच साधुसंतांनीं आपापल्या उपासनेप्रमाणें निरनिराळ्या देवांची नांवें— जसें विठ्ठल, श्रीराम कृष्ण, गोविंद, वगैरे वगैरे — दिलीं आहेत! आत्म्याचें स्वरुप अंगुष्ठ प्रमाणच कसें आहे व आत्म्याचे अविनाशित्वाची परीक्षा Test कशी घ्यावी हें सांगून हा लांबलेला दीप संपवूं. तत्पूर्वी परमसाक्षात्कारी **श्रीजनार्दनस्वामी** व आत्मसाक्षात्कारांतच नेहमीं तल्लीन झालेले व त्या अवस्थेंतून ज्यांचे उद्गार निघालेले सतत दृष्टीस पडतात असे **मेरुस्वामी** यांनीं देवयान पंथावरील बारीकसारीक आणखी अनुभव सांगितले आहेत त्याचा आस्वाद सर्वांस व विशेषतः अभ्यासी पुरुषास घेतां यावा ह्मणून त्यांचे वचनांतील थोडा भाग खालीं देत आहोंत. तो लक्षपूर्वक वाचावा. जनार्दनस्वामी आपले सत्शिष्य जे एकनाथ त्यांना, अभ्यासांत कसकसे अनुभव येत जातात ते असंदिग्धपणें सांगतात.

**चक्रामध्यें चक्र येती व्योमाकार । आदि मध्य हेर ज्योति त्याची ॥**

**प्रथम समाधि निबिड सर्पाकार । त्यामध्यें आकार चक्राचे ते ॥**

**झळकती माणीक दिव्यरत्नखाणी । अविनाश देखणी चिन्मयाची ॥**

**एकचक्रें येती आकाशा एवढी । त्यामध्यें चौकडी मोतियांची ॥**

**मणियाची ज्योति संध्याकाळीं जे वाती । तेलावीण दीप्ति उजळिल्या ।**

**जनार्दन ह्मणे एकनाथा घेईं । सोहं याचि देहीं समाधीसुख ॥**

ह्या आत्म्याचें दर्शन आपल्यास कसें झालें हें तो शिष्य सांगत असल्याबद्दल स्वामी लिहितात.

शिष्य ह्मणे स्वामी धरितां कान डोळे ।
एकाएकी उमाळे आदित्याचे ॥
विकसिता निर्मळ जैसा चंद्र दिसे ।
येताहे प्रकाशे आत्माराम ॥

— जनार्दनस्वामी.

समर्थ सांप्रदायांतील अनंतमौनींचे सत्शिष्य मेरूस्मामी हे फार बहारीचे, विसृत व काव्यमय वर्णन कसें करतात पहाः—

प्रांजळ सूर्यप्रभेचें दृश्य । तैसें पदार्थं दिसती अदृश्य ॥
स्वरूप दृष्टीनें सादृश्य । न्याहाळी समता ॥
निरंजन तेज बंबाळ । बिंबरूप विशालज्वाळ ॥
कल्लोळ धावती अंतराळ । कवळीत ते ॥
प्रकाशतोयीं घन वाकडी । चित्रविचित्र ज्वाळा प्रौढी ॥
गगन भरूनी परवडी । तेज वरुषे ॥
प्रकाशजीवनाच्या गारा । विघरित द्रवती सरारा ॥
असंभवित तारा । गगनोदरीं ॥
तेथूनी तिडक्या फुटत । भास्करा पेशा ॥

आणखी एका ठिकाणीं ते ह्मणतातः—

अकळ ज्ञानवृष्टी संपूर्ण । नेणो टाकील सृष्टी वुडवून ॥
अखंड दंडायमान । धारा सोडल्या ॥
चतुर्विध अष्टविध । पांचीक योग पंचविध ॥
प्रमाणरहित अनेकाविध । आभास इतुका ॥

—मेरुस्वामी

## आत्मा—देव—विठ्ठल

अज्ञानामुळें आपलें स्वस्वरूपास इतके दिवस आपण पारखे झालों होतों व भलत्याच मार्गावर गेलों होतों. सुदैवानें सद्गुरुकृपेनें व ईश्वरीकृपेनें देवयानपंथावर आल्यावर व आत्मयारामाचें पुण्यदर्शन झाल्यावर साधकास केवढा आनंद होत असेल याचें वर्णन करणें अशक्य आहे. ज्या सगुण मूर्तीचें ध्यानानें व नामस्मरणानें संपूर्ण मनोलय प्राप्त होऊन त्याचा शेवट आत्म् स्वरूपाचें दर्शनांत झाला त्या आत्म्यासच आमचे साधुसंत, भक्तीचा जिव्हाळा ठेवण्याकरतां, विठ्ठल, कृष्ण, राम, वासुदेव, वगैरे नामांनीं संबोधितात. आपल्या उपा-सनेप्रमाणें सगुण ध्यानास घेतलेल्या उपास्य दैवतेचें नांव ते आत्म्यास देतात.

कृष्ण ।विष्णु हरी गोविंद । या नामाचे ।निखिल प्रबंध ॥
—ज्ञानेश्वर

लोकांनीं ईश्वरावर श्रद्धा ठेवावी, त्याचीच भक्ती करावी, त्याचें भजन, पूजन, जप व ध्यान करावें आणि शेवटीं आत्म-कल्याण करून घ्यावें ह्मणून ‘ आत्मा हाच उपास्य दैवत व उपास्य दैवत हाच आत्मा ’ ही अंत:करणांत जागृति ठेवून त्या दृष्टीनें, तें नामस्मरण, ध्यान, पूजादि करितात ! साधुसंतांनीं लोकव्यवहार लौकिकाचारा प्रमाणें केला तरी स्वस्वरूप साक्षात्कार झाल्यावर कोणत्या गर्भितार्थानें अगर लक्ष्यार्थानें त्यांचे व्यवहार होत असतात हें आतां सहज लक्षांत आलें असेल.

आत्मारामाचें दर्शनामुळें झालेल्या आनंदांत मग्न झाले असतां आत्मा हाच सगुण देव आहे असे स्पष्ट उद्गार त्यांचें मुखांतून कसे निघाले आहेत ते पहा :—

अंतरीची ज्योति प्रकाशली दीप्ति । मुळीं जी होती अच्छादिली ॥
भावाचे मथिले निर्गुण संचलें । तें हें उभे केलें विटेवरी ॥
अमूर्त मूर्ति मधुसूदन । समचरण देखीयले ॥

— तुकाराम

देही देखिली पंढरी । आत्मा अविनाश वीटेवरी ॥
तो हा पांडुरंग जाणा । शांति रुक्मीणी निजांगना ॥
आकारले तितुके नासे । आत्मा अविनाश विठ्ठल दीसे ॥
ऐसा विठ्ठल हृदयीं ध्याई । चोखामेळा जडला पाई ॥

— चोखामेळा

देह देऊळ आत्मा देव । कोठें धरूं पाहतां भाव ॥

— रामदास

## आत्म्याचें स्वरूप—अंगुष्ठमात्र.

आत्मा हाच देव व त्याचें स्पष्ट दर्शन होतें हें कळल्यावर आत्म्याचें स्वरूप तरी कशा प्रकारचें आहे हें जाणण्याची इच्छा होणें साहजीक आहे. देवयान पंथावरून जाणाऱ्या अभ्यासी पुरुषांस शब्दानें सांगण्याचें कारण नाहीं. कारण त्यांना प्रत्यक्ष त्याचें दर्शनच होतें ! पण हें तरी बरोबर आहे अगर कसें, तसेंच आपण जात आहों हे योग्य मार्गानें जात आहों कां भलत्या आडवाटेनें जात असून आपणांस भ्रम होत आहे हें साधकास कळणें जरूर आहे. म्हणून शास्त्रप्रचीति काय आहे हें जाणून घेतले पाहिजे. चिकित्सक वाचकांचे व भाविक भक्तांचे समाधानाकरितां प्रथम शास्त्रप्रचीति पाहूं. आत्म्याच्या स्वरूपाचें वर्णन उपनिषदांत पुष्कळ ठिकाणीं स्पष्टपणें केलेलें आढळून येते. आत्मा हा अंगुष्ठमात्र, प्रकाशरूप, रविबिंबा–सारखा आहे. असें वर्णन केलेलें आहे. या ग्रंथांत साधुसंताचे

वचनाशिवाय इतर कोणतीहि वचनें घ्यावयाची नाहींत असें ठरविलेलें आहे. तरी पण क्वचित् प्रसंगी साधुसंतांनीं वर्णन केलेल्या देवयान पंथास श्रुतिप्रामाण्य कसें आहे हें कळून येण्याकरतां कांहीं उतारे घेणें जरूर आहे. खालीं दोन तीन उपनिषदांतील उतारे देत आहों त्यावरून स्वस्वरूपाचा साक्षात्कार साधुसंतांनीं शास्त्रप्रचीतीप्रमाणें कसा करून घेतला हें कळेल. त्यांनाहि त्याप्रमाणेंच अनुभव आल्याचें त्यांचे वचनावरून दिसून येईल. तसाच अनुभव सर्वांनी प्राप्त करून घ्यावा असें उच्च रवानें, कळकळीनें व कृपाळू अंतः करणानें ते नेहमीं कां सांगत असतात हेंहि लक्षांत येईल.

अंगुष्ठमात्रः पुरुषोन्तरात्मा ।
सदा जनानां हृदयें सन्निविष्ठः ॥
हृदामन्विशो मनसाभिक्लृप्तो ।
य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ॥

—कठ व श्वेताश्वतर

**भावार्थः**—अंगुष्ठप्रमाण पुरुष अंतरात्मा आहे व तो नेहमीं प्राण्याच्या हृदयामध्यें वसत आहे. हा ज्ञानाचा ईश आहे व मनाने समजणारा आहे. याला जे जाणतात ह्मणजे ह्याचा ज्यानां साक्षात्कार होतो ते अमृतत्व पावतात परब्रह्मस्वरूपी लीन होतात. असें कठ व श्वेताश्वतर उपनिषदांत सांगितलेलें आहे. हे श्रुतिवचन सर्वांनीं लक्षांत ठेवण्याजोगें आहे ह्मणून वर दिलें आहे.

अंगुष्ठमात्र पुरुषो ज्योतिरिव ॥

—कठ

अंगुष्ठमात्र पुरुष ज्योतिप्रमाणें आहे.

अंगुष्ठमात्रो रवितुल्यरूपः ॥

—श्वेताश्वतर

अंगुष्ठमात्र आत्म्याचें रूप **सूर्या**प्रमाणें आहे ! हृदयस्थ आत्मा रविबिंबाप्रमाणें व प्रकाशमान आहे. लोकांना जसा सूर्य उगवलेला दिसतो त्याप्रमाणें हा देहस्थ आत्मा भानुबिंबाप्रमाणें आहे !

**अंगुष्ठः प्रादेश शरीरमात्रम् ।**

— मैत्रायणीय.

आत्म्याचें शरीर **अंगुष्ठाएवढें** आहे. घटांतील जलामध्यें जसें रविबिंब लहान दिसतें त्याप्रमाणें आत्म्यांचें स्वरूप आहे. वरील उपनिषद्वाक्यांतील रहस्याबरहुकूम आमचे साधुसंत सांगतात. देवयानपंथावरील या विश्रांतिस्थानांत ऐश्वर्ययोगाचा अभ्यास करणारासच प्रवेश आहे. हे सर्व सुखांचें आगर आहे. आपलें निजधाम हा हृदयस्थ मनोरम आहे. हा आपल्यापुढें दृग्गोचर होतो असें नाथ ह्मणतात.

**ऐसे चक्षुमाजी गुह्य जे। अंगुष्ठपर्व मणी हे ॥**

— एकनाथ.

आत्म्याचें स्वरूप अंगुष्ठमात्र आहे असे वर स्पष्ट ह्मटलें आहे. त्याचें वास्तव्य हृदयाचे ठिकाणीं असून तो रविबिंबाएवढा प्रकाशरूप आहे असे या दीपारंभी दिलेल्या नाथांचे वचनावरून कळून येईल. तेच उतारे पुन्हां देत आहों.

**हृदयस्थ पाहिला जनार्दन ।**
**कळिकामय दीप देहीं दिसे ॥**
**माझें मज दावियेलें माझें मज दावियेलें ।**
**उघडे अनुभविलेंपरब्रह्म ॥**
**रविबिंबापरी प्रकाश तो केला। तोचि ठसावला हृदयामाजी।**

— एकनाथ.

हा चारी देहांचा स्वामी आहे असें जनार्दनस्वामी ह्मणतात.

**चिन्मय अविनाश प्रगटति ज्योत । तोच प्राणनाथ देहाचा हा ॥**

— जनार्दनस्वामी

ज्ञानेश्वर व जनाबाई म्हणतात:—

हेंच ज्योतिर्लिंग उगवले आहे कीं काय ? चमकलेल्या ज्योतिचे काय वर्णन करावे !

**माझ्या शरीरीं ज्योतीलिंग उगवले । अगाध कवळिले हस्तेविण ॥**

— ज्ञानेश्वर.

**ज्योत पहा चमकली । काय सांगो त्याची बोली ॥**

— जनाबाई.

**मग देखसीते आनंदमार्तंडातें । तेजोमय पुत्रा ॥**

— रामदास.

वेदांतशास्त्रांतील दृष्टांत आपण नुसत्या शद्बानें ऐकतो अगर वाचतों पण त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतल्यावर किती आनंद होत असेल याची कल्पना करावी ! **चांगदेव**महाराज आत्मानुभव सांगतात.

**जळामाजी भानुबिंब दिसे । तैसा देहीं दिसे परमात्मा ॥**

—चांगदेव

वर दिलेल्या सर्व उतार्‍यावरून स्पष्ट खुलासा होईल कीं, आत्म्याचें स्वरूप **अंगुष्ठप्रमाण** आहे. तो **तेजोरूप** म्हणजे प्रकाशमय व **सूर्यबिंबासारखा** आहे. त्याचें दर्शनांत **अत्यानंद व खरें सुख** आहे ! निरानिराळ्या साधुसंतांच्या वचनाकडे पाहिले तरी त्या सर्वांनीं एकच अनुभव ग्रथित केला आहे असें सहज दिसून येईल. साक्षात्कार हा सर्वांस सारखाच होणार !

## अविनाशित्व कसें जाणावें ?

चारी देहाचा साक्षी जो आत्मा त्याचें बिंबरूपांत व प्रकाश-रूपांत दर्शन झाले म्हणजे तो भ्रम नसून तें त्रिसत्य असें अवि-नाशीतत्व आहे. ह्याची परीक्षा ( Test ) पहावयाची असल्यास ती कशी पहावी हें **श्रीमद्भगवद्गीतेंत** सांगितलें आहे. अध्याय २ रा श्लोक २३–२४ मध्यें ब्रह्मस्वरूपाचें वर्णन केलें आहे.

नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥
अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एवच ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽ यं सनातनः ।
अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽ यमुच्यते ।

**भावार्थः—** याला ह्मणजे आत्म्याला शस्त्रें तोडीत नाहींत, त्याला अग्नि जाळीत नाहीं, तसेंच त्याला पाणी भिजवीत नाहीं व वायु सुकवीतहि नाहीं. [ कधींहि ] न तुटणारा, न जळणारा, न भिजणारा व न सुकणारा हा [ आत्मा ] नित्य, सर्वत्र भरलेला, स्थिर अचल व सनातन ह्मणजे चिरंतन आहे. या आत्म्यालाच अव्यक्त ह्मणजे इंद्रियांना गोचर न होणारा, अचिंत्य ह्मणजे मनानेंहि जाणण्यास अशक्य आणि अविकार्य ह्मणजे ज्याला कोणत्याच विकाराची उपाधि नाहीं, असें ह्मणतात.

ह्या परीक्षा ध्यानावस्थेंत पाहतां येण्यापेक्षां उघड्या डोळ्यांनीं करून पहाव्या ह्मणजे जास्त सत्यता पटेल. आत्मा दृष्टीगोचर होतांच त्याचें अधिष्ठान शस्त्रांचें ठिकाणीं करावें अगर त्यावर वाटल्यास शस्त्राघात करून पहावा, ह्मणजे तो शस्त्रानें छेदला जात नाहीं असें दिसून येईल ! अग्नीचें ठिकाणीं त्याची स्थापना

करावी म्हणजे तो अग्नीचे योगानें दहन न पावतां अग्नीचे ठिकाणीं त्याचें रूप स्पष्ट दिसतें असें कळेल. प्रखर सूर्याचे प्रकाशामध्येंही त्याचें तेज लुप्त होत नाहीं किंवा प्रशांत चंद्रप्रकाशांतहि तो विरून गेलेला दिसत नाहीं. जलाचें ठिकाणीं त्याची स्थापना करावी ह्मणजे तो जलांत बुडतो आहे अगर पाण्यानें तो ओला होत आहे असा कांही प्रकार झाल्याचे दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. एवढेंच नव्हे तर वाहत्या पाण्यांत तो वाहून गेलेलाहि दिसत नाहीं ! हस्तपादादि धुतांना पाहिल्यास तो धुतला जात नाहीं. जल प्राशनास घेतलें असतां त्यांत तो दिसतो, जल मुखांत घालतांना सुद्धां त्याचें स्वरूप त्यांत दिसतें व ब्रह्मस्वरूपाचेंच आपण पान करीत आहोंत असें होतें! भयंकर वारा, वावटळ अगर पाऊस पडत असला तरी तो कशानेंहि लोटला जात नाहीं अगर त्याचे शतशः तुकडे होऊन तो नष्टहि होत नाहीं !! अशा प्रकारें पृथ्वी, जल, तेजादि पंचमहाभूतांचेयोगें तो नष्ट झालेला दिसत नाहीं, तर उलट हा छेदिला न जाणारा ह्मणून अच्छेद्य, दहन न पावणारा ह्मणून अदाह्य, तसाच न भिजणारा ह्मणून अक्लेद्य व न सुकणारा ह्मणून अशोष्य असा असल्यामुळें त्यास नित्य, सर्वत्र भरलेला, स्थिर, अचल, सनातन, अव्यक्त, अचिंत्य व अकार्य अशी संज्ञा मिळाली आहे ! अशा प्रकारें आत्म्याचें अविनाशी तत्वाची सर्वत्र व्याप्ति पहावी ह्मणजे देह हा मर्त्य व विनाशी असून देही—चारी देहांचा स्वामी व साक्षीरूपानें असणारा जो आत्मा तो अविनाशी आहे. हें कळून येईल. आपल्या स्वस्वरूपाचा साक्षात्कार झाल्यावर आणि ' तो मी व मी तोच आहे ' अशी दृढ भावना झाल्यावर देहाचें ममत्व नष्ट होईल, निर्भयता उत्पन्न होईल, मायेचे बंध तुटतील, अज्ञानावरण नष्ट होईल, जन्ममरणाचे फेऱ्यांतून मुक्तता होईल व सकल दुःखांचा निरास होऊन निरातिशयानंद सुख प्राप्ति होईल !!

साधु —सत्पुरुष आत्म्याचे प्रकाशांत सर्व कार्ये करीत असतात. कोणावर अनुग्रह अगर कृपा करावयाची असेल, त्यास आशीर्वाद देणें असेल अगर प्रसाद देणे असेल किंवा कोणाशीं बोलावयाचे असेल अगर त्यास विषय समजावून देणें असेल तर या प्रकाशांत ते बोलत असतात, प्रसाद अगर आशीर्वाद देतात किंवा नाना दुखांच्या परिहाराचे उपाय सांगतात ! पण प्रकाशाचा अभाव असेल तर कोणतेहि कार्य करण्यास तो काल व ती वेळ उचित नाहीं असें समजून ते आपला बेत रहित करतात. अंधःकारांत—मायेच्या अंधरांत कोणतेहि सत्वगुणी शुभकार्य फलदायी होत नसतें. आपल्या खाण्यापिण्यांत, बोलण्यांत, निजण्यांत, किंवा दशेंद्रियांकडून होणाऱ्या सर्व क्रियांमध्यें प्रकाश आहे अगर नाहीं हें पाहतात व जेथें प्रकाश नसेल त्या ठिकाणचें कर्म अग्राह्य असें समजून ते त्याचा त्याग करतात. यायोगें जनव्यवहारामध्यें त्यांची वागणूक अत्यंत चमत्कारिक व कित्येक वेळीं वेड्याप्रमाणें अगर पिशाच्चवत् वाटते. पण अंतरीं ते स्वस्वरूपाशीं तादात्म्य पावलेले असतात हें विसरता कामा नयें. असो. हा विषय फार गूढ आहे. अनुभवाशिवाय यांतील रहस्य कळणार नाहीं. सध्यां देवयान पंथावरील या विश्रांतिचें स्वस्वरूपस्थळीं थोडी आनंदरूप विश्रांति घेऊं.

———



# दीप ४ था

## नामस्मरण–नादानुसन्धान

सर्व साधुसंतांनीं परमेश्वराच्या नामस्मरणाचें अत्यंत महत्व गाइलें आहे ' नामस्मरणाचा सर्वांस अधिकार आहे व त्यापासून–मुक्ति मिळेल ' अशी उच्चरवानें ते ग्वाही देत असतात. " अखंड नामस्मरण करा. एकवेळ तरी नांव घ्या म्हणजे तुमचीं सर्व पापें भस्म होतील व तात्काल तुह्मास मुक्ति मिळेल, नामस्मरणानें परमेश्वराचें दर्शन होतें, फार काय नाम हेंच परब्रह्म आहे ! तेव्हां त्या श्रेष्ठ मार्गानेंच तुह्मी जा " असा सत्पुरुषाचा उपदेश आहे. ह्या उपदेशाचें रहस्य काय ? हें म्हणणें खरें आहे काय ? अशी शंका सर्व साधारण मनुष्यास येणें साहजिक आहे. कारण प्रत्यक्ष असा अनुभव मुळींच येत नाहीं. भजनांत, हरीकीर्तनांत व इतर अन्यत्र ठिकाणीं पुष्कळ वेळ नामस्मरण करणारें भगवत्भक्त दिसतात. हातांत माळ घेऊन पुष्कळ काल जप करणारेंहि लोक भेटतात अथवा ज्या त्या सांप्रदायाप्रमाणें नामस्मरणादि विधी जस जसे असतील तस तशीं अनुष्ठानें करणारेंहि भक्तिमान् लोक दिसतात. परंतु परमेश्वरप्राप्ति झालेले साक्षात्कारी पुरुष फारच क्वचित् आढळतात . मग साधुसंतांनीं केलेला उपदेश खोटा ह्मणावयाचा कीं काय ? ह्यास उत्तर असें कीं नामस्मरणाचें रहस्यच आपणास कळलेलें नसतें. यावर थोडा विचार करावा व वृत्ति अंतर्मुख करावी ह्मणजे कळून येईल कीं, नुसते तोंडानें आपण नाम घेतो यापेक्षां कांहीं तरी थोडा

साधु ६...

निराळा मार्ग असला पाहिजे. वाणीनें नाम घ्या असें म्हणतात. नुसत्या तोंडानें—वैखरी वाणीनें नाम घेऊन फारसा उपयोग होत नाहीं तेव्हां ज्या चार वाणी सांगितल्या आहेत त्यापैकीं कोठल्या तरी श्रेष्ठ वाणीनें नामोच्चार व्हावयास पाहिजे असें समजावें. तोंडातलें तोंडांत हळू हळू जरी जप करीत बसले व असा पुष्कळ जप केला तरी चित्ताची एकाग्रता होत नाहीं अशी पुष्कळांची तक्रार असते. तरी ह्याहिपेक्षां जप करण्याची पद्धति—निराळ्या श्रेष्ठ वाणीनें जप करण्याची निराळी पद्धति-असली पाहिजे हें कळून येईल. नुसत्या वैखरी अगर मध्यमा वाणींत वाटेल तेवढें नामस्मरण करून उपयोग होत नाहीं. ही नित्य अनुभवाची गोष्ट आहे. अशा नामस्मरणाचा कालांतरानें ह्या जन्मीं अगर पुढें अनेक जन्मानंतर तरी उपयोग होईल हें खरें. पण '**ह्याच देहीं ह्याच डोळा**' परब्रह्मवस्तु पाहावी अशी ज्यांची मनीषा आहे व अशी ज्यास तळमळ व उत्कंठा लागली आहे, त्यांनीं ज्या मार्गानें जलद जातां येईल, असा मार्ग शोधून काढला पाहिजे व त्या दिशेनें प्रयत्न करावयास पाहिजे. सत्पुरुषांचीं वचनें व ग्रंथ अगदीं जडापासून उच्च साधकापर्यंत असणाऱ्या सर्व भूमिकेवरील लोकांकरितां असतात हें मागें सांगितलें आहेच. त्यांना प्रत्येक भूमिकेवरील साधकाकरितां निरनिराळे ग्रंथ करण्यास सवड असत नाहीं अगर असें ह्मटलें तरी चालेल कीं, त्यांचे ग्रंथ कोणीही वाचले तरी ज्या त्या भूमिकेवरील साधक आपआपल्या बुद्धिप्रमाणें तेवढाच विषय ग्रहण करील. ह्या दृष्टीनें विचार केला ह्मणजे नामस्मरणानें तात्काल परब्रह्म प्राप्ति कशी होते हें कळून येईल. एवढेंच नव्हे तर अनुभवास येईल. हें रहस्य कळण्याकरितां व अनुभव येण्याकरितांच सद्गुरूची आवश्यकता सांगितली आहे. त्याचें शिवाय यांतील वर्म कोण सांगेल ? **नामदेव** ह्मणतात:—

नामदेव ह्मणे स्वतःसिद्ध नाम ।
गुरुविण वर्म हातां नये ॥

एकनाथ महाराजहि याच शब्दांत त्याचा अनुवाद करतात.

संताशीं शरण गेलिया वांचून ।
एका जनार्दनीं न कळे नाम ॥

तेव्हां सद्गुरुस शरण गेल्या शिवाय याची किल्ली सांपडणार नाहीं. जो प्रत्यक्ष साक्षात्कार प्राप्त करून देईल तोच सद्गुरु होय हें मागें सांगितलें आहे. हल्लीं शेंकडो सांप्रदाय निघाले आहेत. स्वधर्माप्रमाणें कोणतेंहि कर्माचरण न केलें तरी चालेल, इंद्रियनिग्रह झाला नाहीं अगर केला नाहीं तरी चालेल असें सांगणारा व कांहीं थोडा चमत्कार करून दाखविणारा गुरु भेटला कीं तो सर्वांस प्रीय! वरें प्रतिकूळ परिस्थितीमुळें होत नाहीं ह्मणून म्हणा अगर बुद्धिस पटत नाहीं ह्मणून म्हणा स्वधर्माचरण न करणाऱ्या बुद्धिप्रामाण्य-वाद्यामध्यें मनोलयाचा अभ्यास करणारे कीतिसे आहेत? तेहि बुद्धि-प्रामाण्याचे गोंडस नांवाखालीं फसून वृत्ति-निरोध, मनोलय अगर साक्षात्काराचें मार्गांतील दुसरा कोणताहि अभ्यास न करिता तोंडानें हवें त्या स्थितींत, हव्या त्या पद्धतीनें, वाटेल तसें नामस्मरण अगर जप केल्यानें सर्व साध्य होईल व ज्ञानप्राप्त होईल, असें सांगणाऱ्या गुरूचे तावडींत सांपडतात. सुशिक्षित ज्ञानी म्हणविणारेंहि मोहानें फसतात ह्मणून त्यांना इषारा देणें जरूर आहे. कोणत्याहि मिषानें व कोणत्याहि वार्णानें हवे तेव्हां कां होईना, सकल सुखाचा दाता जो दयाघन परमेश्वर त्यांचें नामस्मरण केल्यास कालांतरानें कां होईना सद्गुरूची गाठ पडेल, अशी आमची भावना आहे. पण परमेश्वर प्राप्तीबद्दल—अखंड सुखप्राप्तिबद्दल—तळमळणाऱ्या जीवांनीं

आणि ज्यांचें पूर्वसुकृत चांगलें आहे व त्यायोगें जे या साक्षात्काराचे मार्गांत आहेत, त्यांनीं मात्र वाच्यार्थावर समाधान न मानतां लक्षार्थाकडे दृष्टी दिली पाहिजे व तदनुरोधानें गुरुपासून ज्ञान प्राप्त करून घ्यावयास पाहिजे. नामस्मरण कोणत्या वाणीनें कसें करावें, मनोलय कसा प्राप्त करून घ्यावा, खरें नामस्मरण म्हणजे काय ? व तें कोणतें ? नामस्मरणाची उच्च अवस्था कोणती ? व त्यायोगें ब्रह्मप्राप्ति कशी करून घ्यावी अगर आपोआप होतें, हें सर्व सद्गुरुपासून नीट समजावून घ्यावें. त्याचा अभ्यास करावा आत्मप्रचिती करून घ्यावी व शेवटीं स्वस्वरूपीं लीन व्हावें ! !

## नामाचें शास्त्रीय रहस्य

साधुसंतांनीं ज्या ज्या पद्धतीनें नामस्मरण केलें व ईश्वराच्या ज्या ज्या विशिष्ट नामांचा एकसारखा नामोच्चार म्हणजे जप केला त्या त्या पद्धतींनें व त्या त्या नामोच्चारानेंच नामस्मरण करणें जरूर व हितावह आहे. कारण त्यामध्यें विशिष्ट रहस्य साठविलेलें आहे हें सूक्ष्म विचारांती कळून येईल.

**भाषाशास्त्राचे दृष्टीनें** याचा विचारकरूं. नदीचा प्रवाह विस्तीर्ण व अफाट जरी दिसला तरी प्रथम उगम जसा अगदीं सूक्ष्म असतो त्याप्रमाणें या शास्त्राचें मूळ अगदीं सूक्ष्म आहे. परब्रह्मापासून—त्या गगनस्वरूपापासून—प्रथम नाद उत्पन्न झाला. जगाचें आरंभीं दुसरें कांहीहीं नव्हतें. या नादास ओंकारध्वनि म्हणतात. यालाच शब्दब्रम्ह ह्मणतात. ब्रह्म कसें आहे हें सांगतां येत नाहीं. शब्दानें सांगण्याच्या मर्यादेंत प्रथम हें ओंकारस्वरूपांत आलें म्हणून ओंकार हा ब्रम्हाचा वाचक आहे असें मानतात. ओंकारापासून पुढें अकार, उकार, मकार, व अर्धमात्रा

अशा मात्रा उत्पन्न झाल्या. ह्या मात्रांपासून पुढें अकारादि १६ स्वर व व्यंजनें मिळून छपन्न मात्रिका उत्पन्न झाल्या. ह्यासच मूळ **बीजें** असें म्हणतात. पुढें स्वरसंधीमुळें किंवा स्वर व व्यंजनें यांचें मिश्रणानें किंवा व्यंजन व्यंजनांचा योग स्वरासहित झाल्यामुळें अक्षरें उत्पन्न झालीं. अशा दोन किंवा अधिक अक्षरांचे एकीकरणामुळें अर्थनिष्पत्ति होऊं लागली तेव्हां ह्यास 'शब्द' अशी संज्ञा प्राप्त झाली. विशिष्ट पद्धतीनें अक्षरांचा संयोग झाला कीं, विशिष्ट प्रकारचा अर्थबोध होऊं लागला. त्यामुळें प्रत्येक शब्दास महत्व उत्पन्न होऊं लागलें. शब्दरचना होऊं लागल्यावर ज्यामुळें कांहीं अर्थनिष्पत्ति होईल असा शब्दसमूह बनूं लागला तेव्हां त्यास 'वाक्य' असें नामाभिधान देण्यांत आलें. अशाप्रकारें हें शब्दजाल उत्पन्न होऊन एक शब्दसृष्टीच उत्पन्न झाली! त्यामध्यें कवी, लेखक व बुद्धिमान् लोक हवा तसा अमर्याद संचार करूं लागले!

शब्दोच्चारास फार महत्व आहे. शब्दांचे उच्चार ठराविक पद्धतीनें व्हावयास पाहिजेत. एक शब्द दोन तऱ्हेनें उचारल्यावर त्याचे अर्थ भिन्न भिन्न होतात हें पुष्कळांस ठाऊक आहे. भाषाशास्त्रांत आपणांस फार खोल शिरावयाचें नसल्यामुळें उदाहरणें देण्याचें भानगडींत पडण्याचें कारण नाहीं. वेदांच्या अक्षरांचा उच्चार ठराविक रीतीनेंच व्हावा म्हणून स्वरांची योजना केलेली आहे. त्या रीतीनें वेदांचें पठण केलें म्हणजेच जें ज्ञान प्राप्त व्हावयाचें तें होत असतें. वेदाक्षरें म्हणण्यांत जर चूक झाली तर अर्थाचा अनर्थ होऊन इच्छित फल प्राप्त होण्या ऐवजीं अपकारच पदरीं पडेल. याचें रहस्य सर्वांस कळणें शक्य नाहीं म्हणून विनचूक स्वरासहित पठण करावें अशी वेदाज्ञा आहे असें थोरांनीं सांगितलें आहे. शब्दोच्चाराचें केवढें महत्व आहे! हें महत्व लक्षांत घ्यावें. सत्पुरुषांनीं ज्या ज्या नामांनीं

ईश्वराचें आराधन केलें, त्याचें अंतःकरणांस पाझर फोडला, त्याचें ठिकाणीं तल्लीनता प्राप्त करून घेतली त्या नामांतील शब्दांचें व त्यांचे उच्चारांचें केवढें महत्व असलें पाहिजे ! भाविक भक्तास प्रथम त्याचें महत्व कळत नाहीं म्हणून त्यानें सत्पुरुष ज्याप्रकारें व ज्या नामांचें नामस्मरण करतात तदनुरूपच आपण करावें हें हितकारक व शीघ्र फलदायी होय.

**संगीतशास्त्राचें दृष्टीनें** नामस्मरणाचा विचार करण्याजोगा आहे. संगित शास्त्राची इमारत सा, रे, ग, म, प, ध, नी, या सप्त स्वरांवरच उभारलेली आहे. सप्तस्वरांचा मिलाफ एकमेकांत कमीजास्त प्रमाणांत झाला म्हणजे नाना तऱ्हेचे राग उत्पन्न होतात. कांहीं स्वर कोमल आहेत व कांहीं मृदू आहेत. प्रत्येक स्वरास निरनिराळे नांव आहे. कोमल स्वर केंव्हां काढावें व मृदु केव्हां काढावें यांस पद्धत आहे व अशाप्रकारें तें एक शास्त्र बनविलें आहे. या स्वरांचा उच्चार कसा करावा ? हें कंठांतून कसें काढावें ? हें अनुभवाचें शास्त्र आहे. त्यांचें अध्ययन गुरुपाशींच करावयास पाहिजे. गुरु ज्या विशिष्ट पद्धतीनें स्वरांचा उच्चार करील त्याच पद्धतीनें शिष्यास तो करतां आला पाहिजे. तसें ज्ञान प्राप्त व्हावयांस कित्येक वर्षें अभ्यासांत घालावी लागतात. ती एक तपश्चर्याच आहे ! अशा प्रकारें एकाग्र चित्तानें अभ्यास केला तरच गुरुप्रमाणें सुंदर आलाप काढून सर्व लोकांचें रंजन करतां येतें व स्वतःसहि आनंदाचा उपभोग घेतां येतो. एका गायनाचार्य प्रसिद्ध गवईबुवा बरोबर गायनामध्यें तन्मयता उत्पन्न करून घेतली म्हणजे विशिष्ट प्रकारच्या आनंदाचा उपभोग कसा घेतां येतो याबद्दल भाषण करण्याचा योग आला होता. त्यावेळीं त्यानीं असें सांगितलें कीं, आपण स्वतः गाण्याशीं तल्लीन झाल्याशिवाय उत्तम गायन होणार नाहीं. निरनिराळे आलाप घेतांना स्वरांचा

मिलाफ कसा होत जातो हें प्रत्यक्ष आपणांस दिसते व अनुभवण्यास सांपडतें. यावरून असें लक्षांत आलें असेल कीं, विशिष्ट प्रकारानें स्वरांचा मिलाफ झाल्याशिवाय शास्त्रशुद्ध गायन होणार नाहीं, मधुर असे आलाप काढतां येणार नाहींत व त्यामुळें इतरे जनांचें व स्वत:चेंही मनरंजन करतां येणार नाहीं. मग आनंदाचा उपभोग कोठचा ?

नामस्मरणाचेंहि तसेंच आहे. कित्येक सत्पुरूष नामस्मरण तालबद्ध, सुरेल व मोठ्या मधुर वाणीनें करीत असतात. इतकें कीं, ऐकणारांच्या चित्तवृत्तीहि त्यामुळें तल्लीन होतात. स्वामी **रामतीर्थ** यांनीं ओंकाराचा जप एकांतांत दीर्घ स्वरानें व मधुर वाणीनें जपत जावा ह्मणजे हळुहळु वृत्ति तल्लीन होतात, मनास आल्हाद होतो व ब्रह्माशीं समरस होतां येतें असें सांगितलें आहे. नामस्मरणास देवादिकांचीं जीं नावें घेतलीं आहेत त्यामध्यें शास्त्रीय रहस्य साठविलेलें अनुभवास येईल.

**शारीरशास्त्र, योगशास्त्र** व **अभ्यासाच्या** दृष्टीनें विचार केल्यास नामशब्दांत कांहीं तत्व गोवलेलें आढळून येईल. नुसत्या तोंडानें वैखरी वाणीनें जरी नामस्मरण केलें तरी जिव्हा, ओंठ व कंठ या भागास ताण पडतो. त्यामुळें त्या त्या अवयवाकडे जाणाऱ्या ज्ञानतंतूवर ताण बसतो व त्याचा परिणाम त्या त्या अवयवांच्या क्रियानुरूप अवयव शुद्धिकडे होतो. जेवणानंतर नामस्मरण मोठ्यांदा केलें तर अन्नपचनासहि बराच उपयोग होतो. सतत एकाग्र चित्तानें अभ्यास ठेविला तर प्राणाची गती एका विशिष्ट तऱ्हेनें होत जाईल व त्याचा उपयोग चक्रभेदनाकडे होईल. मध्यमा वाचेनें नामस्मरण केलें तर कंठामधील ध्वनि उत्पन्न करणारें जे पडदे ( vocal cords ) आहेत त्यांचें कंपन सक्षम व जलद होतें. त्या पडद्यावर व घशावर फार ताण पडतो.

जिव्हेच्या स्नायूंचें आकुंचन सूक्ष्मपणें होत गेल्यामुळें तिच्यावर ताण पडतो. कंठांतील अवयवांच्या ज्ञानतंतूंचें सतत उत्तेजनामुळें, कंठांतील विशुद्ध चक्रावर परिणाम होतो व कालांतरानें प्राणलयाकडे त्याचा उपयोग होतो. पश्यंति वाणींत नामस्मरण कित्येकांस करितांच येत नाहीं. मनातलें मनांत नामस्मरणाची संवय थोड्याशा अभ्यासानें साध्य होते. मनांतलें मनांत सुद्धां शब्दोच्चार दोन पद्धतीनें करतां येतो. मोठ्यानें उच्चार करतां येतो ती एक व दुसरी म्हणजे जींत उच्चार अगदीं हळू करतां येतो ती. उच्चार आपलें मनोरूपीं कर्णानें स्पष्ट ऐकावयास येतो. पहिल्या पद्धतीनें नामस्मरण लवकर साध्य होतें. दुसरी पद्धत मात्र जरा कठीण आहे. मनांतलें मनांत अगदीं हळू सूक्ष्मपणें नामस्मरण अगर जप करावयाचा ह्मणजे त्यास जास्त एकाग्रता करावयास पाहिजे. मन अगदीं एकाग्र करावें तेव्हां नामस्मरण मनोरूपीं कर्णानें ऐकलें जातें अगर त्याची जाणीव होतें. तशी जाणीव झाली नाहीं तर लगेंच वृत्ति उद्भवूं लागतात, मन चंचल होतें व मग अर्थात् नामस्मरण रहातें. अशा प्रकारें नामस्मरण हृत्कमलामध्यें करतां येतें. त्यामुळें मनोलय त्वरित साध्य होतो, ज्ञानतंतूवर पुष्कळ ताबा मिळवितां येतो व प्राणाची गती विवक्षित प्रकारें वाहूं लागते. त्याचाहि लय मनाबरोबर हळू हळू होतो.

वाणींचा लय जसजसा साध्य होईल त्याप्रमाणें शेवटीं परा वाचेमध्यें नामस्मरण करतां येतें. परा वाचेंत नामस्मरण करतां येतें असें म्हणण्यापेक्षा, त्या वाचेनें तें आपोआप होतें असें म्हणतां येईल, एवढेंच नव्हें तर त्याचा तसा अनुभव येईल. ही वाचा स्फुरणरूप आहे. येथें फक्त अनुसंधान असतें. ह्या अनुसंधानरूप नामस्मरणानें संपूर्ण मनोलय होतो व शेवटीं वाचेच्या अतीत अशा स्वरूपाचें दर्शन होतें ! उपास्य

दैवताचा अनुग्रह झाल्याशिवाय ही अवस्था प्राप्त होणार नाहीं. आपली उपासना दृढ असली व सतत अभ्यास केला म्हणजे उपास्य दैवत आपणच प्रसन्न होऊन भक्तावर कारुण्यानें अनुग्रह करतें !

उपासनेचा अंतरभाव । सांभाळितो भाविकांचा राव ॥
नित्यप्रसन्न करुणार्णव । मंत्र श्रवणीं सांगे ॥

—मेरुस्वामी

नामस्मरण किती उच्च प्रकारें व्हावयास पाहिजे हें आतां लक्षांत आलें असेल. अशा नामस्मरणानेंच भवबंध तुटेल व खऱ्या आनंदाचा आस्वाद घेतां येईल !

नामस्मरणाची शेवटचीं अवस्था म्हणजे तें करावयाचें नसतें तर नामस्मरण आपोआप व्हावयास पाहिजे !

नामस्मरणाचा–नामजपाचा **ज्योतिषशास्त्र** दृष्टया विचारार्ह लक्ष देण्याजोगा आहे. नाममंत्रांत जितकी अक्षरें असतील तितके लक्ष जप झाला कीं आपल्या शारीरिक व मानासिक स्थितींत फरक झाल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. ज्योतिषशास्त्राप्रमाणें कुंडलींत द्वादशस्थानें असतात. पहिलें स्थानास तनु स्थान म्हणतात. हेंच जन्मलग्न होय. या पुढें धन, सहृज, पितृ, संतती वगैरे स्थानें आहेत. नाममंत्रांतील अक्षरा इतकें लक्ष जप झाला कीं, प्रथम पहिलें जें तनुस्थान तें शुद्ध होतें. प्रथम शरीर प्रकृति सुधारेल, शारीरिक रोग नष्ट होतील व आरोग्य प्राप्त होईल. शरीराचें आरोग्य लाभल्यावर अर्थात् मनाचेंहि आरोग्य लाभेल. मन शांत, दृढ व स्थिर होत असल्याचा अनुभव येईल. पुनः वरील प्रमाणाबरहुकूम तितके लक्ष जप झाला कीं कुंडलींतील दुसरें जें धनस्थान त्याची शुद्धि होतें. आपली आर्थिक परिस्थिती सुधारत असल्याचें अनुभवास येईल. स्थावर व जंगम इस्टेटींत फेरफार दिसूं

लागेल. याप्रमाणें ऐहिक सुखाबरोबर पारमार्थिक धनसंचयाहि होत असल्याची प्रचीत येईल. याप्रमाणें जसजसा जास्त जप होत जाईल त्याप्रमाणें कुंडलींतील एकएक स्थानें अनुक्रमें करून शुद्ध होत जातील. नामजप मोजला नाहीं तरी, वरील प्रमाणें अनुभव प्रत्यक्ष येत गेल्यावर त्या त्या स्थानाची शुद्धि होत आहे असें जाणावें व तशी ती होत गेली म्हणजे अमुक लक्ष जप झाला हें आपोंआपच ठरेल ! नाममंत्राचें अक्षरा इतका कोटि जप झाला म्हणजे आपल्या उपास्य दैवताचा सगुण साक्षात्कार होईल व सर्व कामना पूर्ण होतील ! उपासनेंत भावना प्रधान आहे. तेव्हां भावनायुक्त अंतःकरणानें जप केल्यास मोक्ष कसा प्राप्त करून घेतां येतो हें सहज ध्यानीं येईल.

प्रत्येक वार्णीतील नामस्मरणाचा केवढा विलक्षण परिणाम होतो याचा अनुभव घेऊन पहावा. श्रीक्षेत्र वाई जिल्हा सातारा येथें बरेच दिवस वास्तव्य करीत असलेले श्रीमत् प० प० **शांताश्रम स्वामी** महाराज यांचे पूर्वाश्रमांतील एक गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगीं आहे ती अशीः— त्यांनीं श्रीक्षेत्र काशी येथें गंगेंत उभे राहून राम-नाम मंत्राच्या १०० कोटी जपाचें उदक सोडलें ! त्याप्रमाणें त्यांनीं सुरवात केली. अहर्निश राम नामाशिवाय दुसरा उद्योग करावयाचा नाहीं किंवा दुसरा शब्दहि उच्चारावयाचा नाहीं. बारावर्षानंतर शंभर कोटी जप पुरा झाला त्यावेळीं त्यांना केवढी कृतार्थता वाटली असेल ! केवढी ही घोर तपश्चर्या ! या अखंड नामस्मरणाचा परिणाम पुढें असा झाला कीं सहा महिनेपर्यंत ‘ राम ’ या शब्दाशिवाय दुसरा शब्द त्यांना उच्चारतां येत नसे. रसनेवर केवढा विलक्षण ताबा त्यानां मिळवितां आला.

रसना जिंकल्यावर मग अर्थात् सर्व इंद्रियें, प्राण, मन वगैरे सर्व त्यांनीं सहज जिंकून ते साक्षात्कारी थोर पुरुष झाले. मनांतले मनांत

नामस्मरण करण्याचा अत्यंत अभ्यास होईल त्यावेळीं अखंड नामस्मरणाचा अनुभव घेतां येईल. तोंडानें दुसऱ्यांशीं बोलूं लागलें तरी त्यावेळीं मनांतलें मनांत नामोच्चार होत असल्याचा अनुभव येईल. जागृतिप्रमाणें स्वप्नांतहि नामस्मरणाची जाणीव होईल. परा वाचेंत नामस्मरण होऊं लागून त्याचा अनुभव येऊं लागला म्हणजे सतत स्फुरण होत असल्याचें अनुभवास येईल. ही तुर्या असल्यामुळें सर्व कालीं सर्व व्यवहारांत याचा उपभोग घेण्यास मिळतो. फार काय सांगावें, सत्पुरुषांनीं देह ठेविल्यावर त्यांचें अस्थीमधून नामस्मरण होत असल्याचें ऐकूं येतें ! ही गोष्ट अशक्य वाटण्याचें कारण नाहीं. सूक्ष्म विचारांतीं ही गोष्ट शक्य आहे असें ध्यानीं येईल.

## विशिष्ट नाम महात्म्य

परमेश्वराची विशिष्ट नामेंच नामस्मरणास कशी निवडून काढलीं आहेत इकडें थोडें लक्ष द्यावें. ब्रह्मदेवाचें नामस्मरण कोणी फारसे करीत नसल्यामुळें तो विषय सोडून देऊं. विष्णूचे जे विविध अवतार झाले त्यांपैकीं कांहीं अवतारांचेंच नाम घेतलें जातें. त्यांत सुद्धां विशिष्ट नामांचाच उच्चार होतो. प्रभू रामचंद्रांच्या अवतारामधील त्यांची पुष्कळ नामें प्रसिद्ध आहेत पण **राम**, सीताराम, किंवा श्रीराम हींच नामे नामस्मरणास योग्य अशीं धरलीं गेलीं आहेत व त्यांचेंच अखंड नामस्मरण चालू आहे. रघुनाथ, रधुनाथ किंवा रघुनंदन या नावांनें नामस्मरण कोणी करीत नाहीं. कृष्ण अवताराचें नामापैकीं **कृष्ण** कृष्ण किंवा **वासुदेव** वासुदेव असें नाम घेतलें जातें. बौद्ध अवताराचें **विठ्ठल** या नामाचा तर सतत नामघोष चाललेला पंढरपुरीं व इतरत्र ऐकुं येतो. विष्णुसहस्रनामामध्यें विष्णुची हजार नामें आहेत. पण त्यांपैकी बोटांवर मोजण्याइतक्यांच नामांचें नामस्मरण केलें जातें. श्रीशंकराची असंख्य नामें आहेत पण त्यापैकीं **शिव**, शंकर, हर किंवा महादेव

ऐवढ्याच नामांचा नामोच्चार सारखा होत असतो. त्रयमूर्ति दत्तप्रभूचें नाम-स्मरण दृत्त दत्त किंवा दत्तात्रय दत्तात्रय या शब्दांतच होतें. अशा प्रकारेंच शाक्त, गाणपत्य वगैरे जे जे सांप्रदाय असतील त्यामध्येंहि उपास्य देवतांच्या विशिष्ट नामांचा उच्चार होत असतो. साधुसंतांपैकीं कांहीं संतांचीं विशिष्ट नामें उदाहरणार्थ— ज्ञानदेव, एकनाथ, नामदेव, तुकाराम, रामदास, इत्यादि, साधुसंतांचीं नामें भक्त सतत घेतांना दिसतात. या सर्व विवेचनावरून येवढें दिसून येईल कीं, राम, कृष्ण, विठ्ठल, शंकर, शिव, दत्त, वासुदेव, नारायण, सच्चिदानंद वगैरे नामामध्यें विशिष्ट जादू भरलेली आहे ! त्यांची शब्दरचनाच अशी विशिष्ट पद्धतीची आहे कीं त्यांचा सतत नामोच्चार झाला कीं विशिष्ट अर्थबोध व्हावा, सुंदर आलाप निघावें, त्यायोगें ईश्वरास प्रसन्न करून घ्यावें, स्वतःचा मनोलय व प्राणलय करून घ्यावा व शेवटीं शब्दाचे अतीत जातां यावें ! नामस्मरणाचें केवढें हें वैभव व महत्त्व! साधुसंतांनीं हें सर्व लक्षांत घेऊन व त्याचा अनुभव घेऊन सर्व जनास त्याचाच उपदेश केला. आपल्या मुलांबाळांची नांवें वरीलप्रमाणें ठेवण्याची व्यवहारांत चाल आहे. ह्यांत त्या नामांचा उच्चार वारंवार व्हावा हा हेतू असतो. अस्तु.

साधुसंतांनीं नामस्मरणावर जो अत्यंत जोर दिला आहे तो याचकरतां. कोणत्याही मिषानें का कोईना पण परमेश्वराचें नामस्म-रण जीवांनीं केल्यास त्यांतच त्यांचें हित कमी अधिक प्रमाणांत आहे असें तें सांगत असतात.

## नामलक्ष्य

नामस्मरण श्रेष्ठ वाणीनें करून खरें ज्ञान व साक्षात्कार प्राप्त करून घेण्यास सांगण्याबद्दल सत्पुरुषांचा केवढा कटाक्ष असतो हें

लक्षांत घ्यावें. सर्वांच्या परिचयाचे असें **श्रीसमर्थांचे** मनाचे श्लोकच उदाहरणार्थ पहाना. हे श्लोक अत्यंत साधे, सोपे व सर्वांस उपयोगी असे आहेत पण त्यांत अत्यंत गर्भित अर्थ भरला आहे. हें लक्षपूर्वक वाचल्यावर कळून येईल. सर्व श्लोकांचे विवेचन कर—ण्याचे हें स्थान नाहीं. तरी पण सुरवातच नामस्मरणाचें रहस्यानें भरलेली असल्यामुळें तेवढ्यापुरतांच विचार करूं.

मनाचा पहिला श्लोक असा आहे कीं—

**गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा ।**
**मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ॥**
**नमो शारदा मूळ चत्वारिवाचा ।**
**गमो पंथ आनंत या राघवाचा ॥**

**समर्थ** पहिल्याच श्लोकांत ह्मणतात कीं सत्व, रज तमादि त्रिगुण व चवथा शुद्ध सत्वगुण यांचे अतीत, सर्व इंद्रिये व अंतः-करण पंचकादि सर्व तत्वें यांचा प्रेरक व चालक मूलस्वरूप प्रका-शरूप परमात्म्याचे उत्पत्ति स्थान, अशा परब्रह्मस्वरूपास ऐक्य भावानें नमन असो. हेंच गणपती स्मरण ? या परब्रह्म स्वरूपाप्रत जाण्याच्या मार्गाचे दिग्दर्शन करितात. गणपती नंतर सरस्वतीचें नमन किंवा ईशानंतर शारदा ह्मणजे अंबेचे स्तवन क्रमप्राप्त आहे. हे शारदा ह्मणजे परा, पश्यंति मध्यमा वैखरी रूप आहे. या स्वरूपाचें अवलंबन केलें ह्मणजे परब्रह्मा प्रत जातां येतें. या राघवाप्रत जाण्याचा मार्ग प्रकाशरूप आहे ! या मार्गानें गेलें ह्मणजे अप्रांत एक जिनसी व सर्व व्यापी अशा अनंत रूपाप्रत जातां येतें ? या श्लोकांत परब्रह्म स्वरूपास समर्थांनीं आपलें उपास्य दैवत जें श्रीराम त्याचे नांवानें संबोधिलें आहे. या राघवाचें स्वरूप मनाचे श्लोकांचे शेवटचे शेवटचे

श्लोकांत वर्णिले आहे. तेथें ते ह्मणतात कीं, या **राघवाचे स्वरूप गगनासारखें आहे !** याचा साक्षात्कार झाला ह्मणजे जगाच्या उद्भवलयास कारण असलेल्या मूळमायेचे अतीत जातां येतें.

नभासारिखें रूप या राघवाचे ।
मनी पाहतां मूळ तूटे भवाचे ।

— रामदास

गगनस्वरूपीं परब्रह्माप्रत देवयान पंथाने जाण्यास अभ्यास कसा करावा हें समर्थ दुसऱ्या श्लोकांत सांगतात, तो श्लोक असा.

प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।
पुढें वैखरी राम आधीं वदावा ।
सदाचार हा थोर सांडु नये तो ।
जगीं तोचि तो मानवी धन्य होतो ॥ २ ॥

— रामदास

प्रभातकाल हीं ब्रम्हांडाची तूर्यावस्था आहे. अशा वेळीं प्रभू रामचंद्राचे—त्या राघवाचे—ध्यान करावें. नाम–स्मरण करावें. हें कोणत्या वाणीनें करावें हें सांगतात. पाहिल्या श्लोकांत चार वाणींचा उल्लेख आला आहे. त्यापैकीं वैखरी ही चवथी वाणी आहे. ती वाणी सोडून रामाचें नाम अगोदरच्या वाणीनें ह्मणजे परावाचेनें घ्यावें. वैखरीचा लय क्रमानें परावाचेमध्यें करावा. सत् ह्मणजे सत्स्वरूप जें परब्रम्ह, त्याप्रत नेणारा हा आचार असल्यामुळें याचें पालन नित्य करावें. मनोलयाचा अभ्यास हाच स्वस्वरूपाप्रत नेणारा असल्यामुळें या मार्गाचा नित्य अभ्यास करावा. या पंथानें जो जाईल तो शेवटीं स्वस्वरूपीं लीन होतो ! देहधारी जीवामध्यें तोच धन्य होय.

समर्थांनीं कशाप्रकारें नामस्मरण करावयास पाहिजे हें उच्च ध्येय मनास प्रथमच सांगून टाकलें आहे. या श्लोकांचा वाच्यार्थ ज्यानीं आपआपल्या भूमिके प्रमाणें कसाही लावला तरी लक्ष्या-र्थाकडे दृष्टी दिली ह्मणजे समर्थांचे लिहिण्यांत किती उच्च अर्थ अभिप्रेत आहे हें सूक्ष्म विचारांती लक्षांत येईल. दृढ अभ्यासानें जसजशी भूमिका वर चढत जाईल त्या त्या प्रमाणें साधुसंतांच्या वचनांतील गर्भितार्थाकडे लक्ष देऊन जीवांनीं आपलें कल्याण करून घ्यावें. ही दृष्टी एकवेळ लाभली ह्मणजे कोठल्याही ग्रंथांत स्वस्वरूप बोधाशिवाय दुसरें काय दिसणार ?

" नामस्मरणानें तात्काल मुक्ति मिळतें, एकवेळ नाम घेतलें तर ब्रह्मप्राप्ती होते " ह्या वचनांतील रहस्य जाणावयाचें असल्यास त्यांचें वाक्गंगेचें जलांत खोल बुडी द्यावयास पाहिजे म्हणजे त्यांतील चिद्रत्नें हातीं येतील ! या दृष्टीनें त्यांची शिकवण काय आहे तें पाहूं. त्यांचें बरोबर उच्च वातावरणांत विहार केला म्हणजे त्यांचें वचनांतील रहस्य कळून येईल. साधुसंत म्हणतात मध्यमा वाचेंत ज्ञान होणार नाहीं. पश्यंतीपेक्षां श्रेष्ठ व परेच्या पलीकडील अवस्थे-मध्यें अनुभवास येणाऱ्या गुरुमंत्राची आह्मी उपासना करतों.

सोऽहं बीजतत्व गुरुनाम मंत्र ।
ज्ञानी उपासीत हरिराज ॥

—निवृत्तिनाथ

सार सार विठोबा नाम तुझे सार ।
आदि मध्य अन्तीं निजबीज ओंकार ॥

—ज्ञानदेव

ह्यावरून **ॐ कारो नाम नामतः** । ह्या श्रुति प्रामाण्याचाच अनुवाद केलेला दिसून येईल. ब्रह्माच्या स्वरूपाचें वर्णन कोणासहि करतां येणार नाहीं. तें निःशब्द आहे. त्यापासून प्रथम ध्वनि अगर नाद उत्पन्न झाला. तो प्रणवरूपांत उत्पन्न झाला ! हेंच अनंत नाम होय ! ह्यास **नादपुरुष** अशी संज्ञा आहे. **देवयान पंथांत** ज्यास अमानुष पुरुष ह्मटलें आहे तोच हा ! हाच शेवटीं ब्रह्माप्रत घेऊन जातो ! ! असें उपनिषद्वाक्यामध्यें ह्मटलें आहे. ह्याचें स्मरण कसें करावें अगर आपोआप व्हावें हें कळून घ्यावें.

**अनंत हें नाम जयांतूनि आलें ।**
**त्यांतचि जिरालें जळीं जळ ॥**

— नामदेव

एकनाथ महाराजहि ह्या ' अनंत ' नामाचा उल्लेख करून, नामदेवाप्रमाणेंच गुरुपासून हें जाणून घ्यावें असें सांगतात !

## अनाहत ध्वनि

एका पदार्थाचा दुसऱ्या पदार्थावर आघात झाल्याच्या योगें ध्वनि उमटत असतो. ध्वनीचें ज्ञान श्रोत्रेंद्रियास होत असतें. बाह्य सृष्टींत उत्पन्न होणारा ध्वनि एका विशिष्ट मर्यादेपर्यंत ऐकूं येतो. सृष्टींत उत्पन्न होणारे सर्वच नाद आपणास ऐकूं येणार नाहींत. आघातजन्य ध्वनि श्रोत्रपथाचें टप्पांत असल्यास ऐकूं येतात. आघाताशिवाय जो ध्वनि उत्पन्न होतो व ऐकूं येतो त्यास **अनाहत ध्वनि** असें म्हणतात. हे ध्वनि पुष्कळ प्रकारचें आहेत. ते शरीरामध्येंच उत्पन्न होतात व त्याचें ज्ञान होतें. **श्रीमत् शंकराचार्य** आपल्या योगतारावली ग्रंथांत ह्मणतात.:—

अनाहताख्यो बहुभिः प्रकारैः ।
अन्तःप्रवर्तेत सदा निनादः ॥

कित्येकांनीं अशी कल्पना काढली आहे कीं शरीरामध्यें जे रुधिराभिसरण होतें त्याचा हा नाद असावा. पण ही कल्पना चुकीची आहे. कारण रुधिराभिसरणाचा एका ठराविक पद्धतीचा आवाज असणार. शिवाय हृदय हें फार मोठ्यांदा उडतें. त्याचा स्वतंत्र अगर त्यांत मिश्रित आवाज असणार. हटयोगांत व उपनिषदांतहि निरनिराळ्या प्रकारचें पुष्कळ नाद सांगितलें आहेत. तेव्हां अनाहत ध्वनि म्हणून जो म्हणतात तो अगदीं निराळा आहे. अतींद्रिय ज्ञान प्राप्ति झाल्याशिवाय ह्याचें खरें स्वरूप कळणार नाहीं हें खास.

ध्यानयोगानें, जपामुळें अगर चित्तैकाग्रतेच्या दुसऱ्या कोणत्याही अभ्यासाचे योगें मनोलय होऊं लागला व प्राण सुषुम्णापन्थ आक्रमण करून ब्रह्मरंध्राप्रत जाऊं लागला कीं आंत नाद उत्पन्न होऊं लागतो.

सहस्रदळांमधुन अनुहात ध्वनि उठी ।
नामाचेनि गजरे पातकें रिघालीं कपाटीं ॥

—नामदेव

ज्याक्षणीं आत्मस्वरूपाचें ठिकाणीं चित्त स्थिर होईल त्याक्षणीं नाद ऐकूं येईल. ह्यावेळीं श्रोत्रेंद्रियाचें ठिकाणीं अतींद्रिय ज्ञान ( special sense ) उत्पन्न होऊं लागतें व कर्णामध्यें ध्वनि उमटत असल्याचे स्पष्टपणें समजतें. हाच अनाहत ध्वनि होय ! ह्यास अनुहातध्वनि असाहि शब्द वापरण्यांत आला आहे. हे नाद पुष्कळ प्रकारचे आहेत हें वर सांगितलें आहेच. प्राण ब्रह्मरंध्रांत क्षणभर तरी स्थिर होऊं लागतांच समुद्राचे लाटाप्रमाणें अगर मेघगर्जनेप्रमाणें किंवा वाद्यगर्जनेप्रमाणें मोठमोठे नाद ऐकूं येऊं लागतात. ब्रह्मरंध्रांत प्राण

कांहीं काल अगर बराच वेळ स्थित होत आहे हें ओळखण्याची खूण म्हणजे क्रमानें शंख, मृदंग, घंटा, वेणुनाद, वीणारव, भ्रमराचे गुंजारव वगैरे वगैरे नाद ऐकूं येऊं लागणें हें होय ! ह्या नादपुरुषाचा साक्षात्कार झाला ह्मणजे ह्या नादावरच अनुसन्धान ठेवावयास पाहिजे. मोठ्या नादावर लक्ष न ठेवितां सूक्ष्म नादावर लक्ष ठेवावें. अभ्यासांत एकवार मोठ्या व पुनः सूक्ष्म नादावर किंवा, सूक्ष्म अगर स्थूल कोणत्याही नादावर आळी-पाळींनें जरी मन स्थिर झालें तरी हरकत नाहीं. कित्येकांनां हें विषयांतर वाटेल पण हें विषयांतर इतर विषयांतराप्रमाणें मन चंचल न करितां स्थिरच करील ! कोणत्याहि नादावर मन स्थिर झालें तरी त्याचा लयच होईल.उपनिषदांमधूनहि हे नाद नदीप्रवाहाप्रमाणें, कास्यपात्राचे ध्वनिनुरूप, घंटा नादनाप्रमाणें, बेडकाचे शब्दाप्रमाणें, पावसाच्या वृष्टीप्रमाणे वगैरे वगैरे नानाविध नादाप्रमाणें असल्याबद्दल वर्णन पहावयास सांपडेल. अभ्यासी पुरुषास त्याचे धारणाशक्ति प्रमाणें वर नमूद केल्याप्रमाणें नादब्रह्माचा अनुभव येत असतो. कित्येकास हे नाद कमी प्रमाणांत ऐकू येतील, कित्येकास क्रमवार त्यांचा साक्षात्कार होईल तर कित्येकास एक दोन टप्पे ओलांडून पुढील मंजूळ व मधुर ध्वनींत तल्लिनता व तद्रूपता प्राप्त करून घेता येईल ! संन्तांचीहि हीच शिकवण आहे. **मुक्ताबाई** आपल्या **चांगया** बाळास सांगतात:—

निजीं निज बाळा न करी आळी ।
अनुहत टाळी वाजवीते ॥
सोहं सोहं हाचिधरी छंदु ।
सुखे निद्रा करी अद्वैती रे ॥

योगीमान्य व ज्ञानी मातेंचे वरील शब्द ऐकतांच अनुग्रहीत बाळानें कानांत ऐकिलें कीं:—

रुणझुण रुणझुण किनरी वाजे ।
येणोचि आनंद त्रिभुवन गाजे ॥
चांगा वटेश्वर नादीं निमाला ॥
ब्रह्म पाहतां ब्रह्मचि जाहला ॥

— चांगदेव

हा ध्वनि उमटतांच आनंदानें संतांचे मुखांतून ह्याचा निर-निराळ्या रूपानें परिस्फोट झाला आहे !

चार वाचा कुंठित जाहली ।
सोहं ज्योति उभारली ॥
अनुहात घंटा श्रवणीं ।
ऐकुन विस्मय झाली जनी ॥

— जनाबाई

धिं धिं तुरे वाजती । अनुहत ध्वनि गर्जंति ॥

—नामदेव

जय जय झनकन जय जय झनकन।
अनुहात जंगट नाद गर्जे ॥

—गोरा कुंभार

जें कांहीं, अल्प कां असेना, नादरूपानें ऐकावयास मिळते तें परमेश्वराचें रूपच होय ! नाद हा परब्रह्माचाच शब्द आहे. हें मूळस्फुरण आहे. तेव्हां निरनिराळे नादहि परब्रह्माची स्वरूपेंच

आहेत ! त्यांचें ठिकाणीं अनुसंधान ठेवावयास पाहिजे ह्मणजे संपूर्ण मनोलय होतो. मधाचें ठिकाणीं आसक्त असणारा भ्रमर मधावर लक्ष ठेवितो, फुलाचे स्वादावर लक्ष ठेवीत नाहीं, त्याप्रमाणें नादा-सक्त मन विषयाचें ठिकाणीं रममाण होणार नाहीं. विषयरूपीं उद्या-नांत स्वैरपणें विहार करणाऱ्या मनोरूपीं मत्त गजाचे, अनाहत ध्वनि रूपीं अंकुशाशिवाय दुसरें कोण नियमन करील ? ह्मणून नादानु-संधानानें संपूर्ण मनोलय प्राप्त करून घ्यावा. हा चित्तलय इतर पुष्कळ लयापेक्षां श्रेष्ठ आहे. ह्याचे योगानें लवकर समाधी साध्य होते व परब्रह्मस्वरूपीं लीन होतां येते. नादानुसंधानाचें महत्त्व **श्रीमत् शंकराचार्य** यांनीं आपल्या योगतारावली ग्रन्थामध्यें अत्यंत बहारीनें वर्णिलें आहे हें खालीं उद्धृत केलेल्या त्यांच्या वचनावरून दिसून येईल.

> नादानुसन्धान समाधिमेकम् ।
> मन्यामहे मान्यतमं लयानाम् ॥
> नादानुसंधान नमोऽस्तु तुभ्यं ।
> त्वं साधनं तत्वपदस्य जाने ॥
> भवत् प्रसादात्पवनेन साकम् ।
> विलीयते विष्णुपदे मनो मे

— योगतारावली.

याचा **भावार्थ** असा कीं, हजारो प्रकारचे जे लयाभ्यास सांगितले आहेत त्या सर्वांमध्यें नादानुसंधानानें प्राप्त होणारा लयच सर्वांत श्रेष्ठ आहे व तो एकटाच समाधी साध्य करून देणारा आहे. हे नादपुरुषा ! तुला प्रणाम असो ! कारण आम्ही असें जाणतो कीं परब्रह्मप्राप्तीचें तूं साधन आहेस. तुझा कृपाप्रसाद झाला—तुझ

साक्षात्कार झाला ह्मणजे प्राणाबरोबर मनहि परब्रह्म स्वरूपीं लीन होते!

वर जें नाद वर्णन केलें आहेत त्या सर्वांपेक्षां श्रेष्ठ व शेवटचा नाद ह्मणजे स्पष्टपणें सो ऽ हं सो ऽ हं असा ध्वनि उमटणें हा होय ! तो तसा उमटावयास पाहिजे. हीच शेवटची पायरी होय. ह्याचा लय एकदम अप्रांत गगनस्वरूपीं अशा खं ब्रह्मांत होतो ! साधुसंतांनीं याचें वर्णन केलेलें आढळेल. ह्याचेंच स्मरण अगर अनुसंधान ठेवावयास पाहिजे. **हेंच खरें नामस्मरण होय !** हा नाद अखंड उत्पन्न होणें—सुरू असणें ह्यासच अखंड नामस्मरण ह्मणतात. याच नामस्मरणाचें आनंदांत साधुसंत तल्लीन होतात व त्याचा आस्वाद घेण्यास सर्व जनास सांगत असतात. नामस्मरण ते करीत नसून त्याचा अनुभव घेत असतात !!

अनुहात ध्वनि करित निशिदिनीं । मन लुब्धुनि गेलें तया ॥
अखंड हे खेळे जपे सर्वकाळीं । हृदय कमळीं आनन्दला ॥

— नरहरी सोनार

जप करी ऐसा अखंड खंडेना । निशी दिनीं मना होय जागा ॥
नामा ह्मणे मना होई रामरूप । अखंडीत जप सो ऽहं सो ऽहं ॥

— नामदेव



# दीप ५ वा

## परमात्मस्वरूप

सहस्ररश्मी भगवान् सूर्यनारायण उदयाचलावर आल्यावर अंध:काराचा नाश करून सर्व पृथ्वी प्रकाशमय करून टाकतो. त्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा—त्या चित्सूर्याचा उदय होतांच अज्ञानरूपीं अंध:कार नाहींसा होऊन चित्प्रभा जिकडे तिकडे फांकली जाते ! या प्रकाशांत देवयान पंथावरील पांथिकास पुढील मार्ग झपाट्यानें आक्रमण्यास उत्साह येतो, हिंमत येते व विश्वास वाटतो. आत्म्याचा साक्षात्कार झाल्यावर सुद्धां गुरुकृपा असेल तरच पुढील मार्ग आक्रमिला जातो. झालें हें ज्ञान म्हणजेच सर्वस्व मिळालें व ब्रह्मज्ञान प्राप्त झालें, अशी जर साधकानें भलती समजूत करून घेतली तर तो पुढें इच्छित स्थळीं जाण्याचें ऐवजीं मध्येंच या मार्गावर अडकून पडेल. ह्यापुढें पुष्कळ पंथ आक्रमण करावयाचा आहे. प्रकाशाचे मार्गावर स्वच्छ चित्सूर्याचे प्रकाशांत आपण आलों आहों, एवढेंच लक्षांत घेऊन साधक दृढ अभ्यास गुरुवर निष्ठा ठेवून करील, तर तो जलद जलद एक एक टप्पे गाठीत जाईल. येथून पुढील विवेचन जरा कठीण असल्यामुळें वाचकांनीं नीट लक्षपूर्वक ग्रंथ वाचावा ह्मणजे विषय सहज ध्यानीं येईल. अभ्यासी पुरुषांनीं आपल्या अनुभवास ताडून पहावे. हा अभ्यासाचा व अनुभवाचा विषय असल्यामुळें थोडा कठीण वाटेल पण त्यांत जरा खोल निमज्जन केलें ह्मणजे त्यांतील रहस्य सहज कळून येईल.

स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारणादि चारी देहांचा साक्षी जो आत्मा त्याचा साक्षात्कार ज्या प्रमाणें होतो, त्याप्रमाणें आपल्या भोंवतालीं असलेल्या ब्रम्हांडाचा साक्षी जो परमात्मा त्याचा साक्षात्कार होतो ! ह्या परमात्म्यास ईश्वर असें म्हणतात.

शुद्ध सत्व प्रकृतींत । परब्रह्म असे प्रतिबिंबीत ॥
तोचि जगाचा तात । श्रुति संमत ईश्वर जो ॥

ब्रह्मांडाची उत्पत्ति स्थिती व लय याचा कारक हाच आहे असें समजतात. आपल्या देहास पिंड अगर व्यष्टी असें ह्मणतात. ब्रह्मांडास समष्टी असें ह्मणतात. पिंडाचे चार देह आहेत त्याप्रमाणें ब्रह्मांडाचे चार देह कल्पिले आहेत. हे चार देह ह्मणजे १ विराट २ हिरण्यगर्भ ३ अव्याकृत व ४ मूलप्रकृति हे होत. ह्या देहांची कल्पना येण्याकरितां थोडक्यांत त्यांचें वर्णन करूं. ह्यांचें सविस्तर वर्णन व्यासप्रणित **श्रीमत्‌भागवता**मध्यें केलेलें आढळून येईल. **एकनाथ** महाराज व **रामदास** यांनीं आपल्या भागवत व दासबोध ग्रंथामध्यें यांचें वर्णन केलें आहे तें जिज्ञासूंनीं पहावें.

## ब्रह्मांडाचे चत्वार देह

**१ विराटः**— अखिल चराचरसृष्टि, पृथ्वि, सत्यपाताळ व सप्तस्वर्गलोक वगैरेंचा यांत समावेश होतो. नामरूपात्मक सर्व जगताचा यांत अंतर्भाव होतो. भगवंतांनीं आपला प्रियभक्त जो अर्जुन त्यास विराट् स्वरूप दाखविलें. त्याचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं आपल्या भावार्थ दीपिकेंत फार बहारीचें केलें आहे. ब्रह्मांड स्वरूपी ईश्वराचा हा स्थूल देह आहे याचा अभिमानी ब्रह्मदेव आहे असें मानिलें आहे. जगाच्या उत्पत्तीचें कर्तृत्वपण त्याजकडे दिलें आहे अशी आपली समजूत

आहे. विराट् देह ही ओंकाराची अकार मात्रा होय. येथें जागृतावस्था कल्पिली आहे.

**२ हिरण्यगर्भः**— आपला सूक्ष्म देह आहे त्याप्रमाणें ईश्वराचा हा लींग देह होय. पिंडाच्या इंद्रियांच्या ज्या देवता त्या ह्या देहाचें अवयव होत. उदाहरणार्थ, पिंड देहाच्या नेत्र या ज्ञानेंद्रियाची देवता सूर्य ही मानिली आहे. तेव्हां सूर्य हाच ईश्वराचा नेत्र होय ! ह्या प्रमाणें सर्व इंद्रियांचे समजावें. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधादि विषय ह्मणजे प्रत्यक्ष पंचमहाभूतें; प्राण हाच वायु, विष्णु हा ज्याचें अंतःकरण, चद्र हा ज्याचें मन, ब्रह्मा हा ज्याची बुद्धि, चैतन्य रूप आदिनारायण हा ज्याचें चित्त व शंकर हा ज्याचा अहंकार असा हा देवतामय अपंचिकृत हिरण्यगर्भ देह आहे. सत्वगुणी, सर्वांस व्यापून राहणारा असा विष्णु हा या देहाचा अभिमानी आहे. ही उकार मात्रा असून येथें स्वप्नावस्था मानली आहे.

**३ अव्याकृतः**—या देहाचे पिंडाच्या कारण देहांशीं साम्य आहे. परमात्मा अष्टधा प्रकृतींत प्रतिबिंबून त्यासच आपलें रूप समजतो. स्वस्वरूपाचें अज्ञानास–नेणीवपणास अव्याकृत देह समजला आहे. विराट व हिरण्यगर्भ या दोन्ही देहावेगळें नाहींपणानें जें आहे तोच हा ! सूक्ष्म दृष्टीनें विचार केला तर हें शबल मायेचें रूप आहे. ह्याचें ठिकाणीं काम क्रोधादि असंख्य विकार उत्पन्न करण्याचें बीज आहे. ह्यास तमोगुणी ह्मटलें आहे. ही मकार मात्रा आहे व याचा अभिमानी रुद्र आहे. ही सुषुप्ति अवस्था मानली आहे.

**४ मूळप्रकृतिः**—हा ईश्वराचा महाकारण देह होय. हेंच मूळ मायेचें रूप होय ! ब्रह्माचें ठिकाणीं प्रथम जें स्फुरण उत्पन्न झालें तेंच मूळ मायेचें अधिष्ठान. ह्या मूळ मायेपासून परमात्मा हा भिन्न आहे. ह्यास पुरुष असें म्हणतात पण तो अभिन्नपणें हिच्याशीं

वर्ततो ह्मणून यास अर्धनारी नेटश्वरहि ह्मणतात. शुद्ध सत्व हा गुण ह्या देहाचें ठिकाणीं आहे. हें अर्धमात्रेचें ठिकाण आहे. तें ज्ञानस्वरूप आहे. मी ब्रह्म आहे अशी जाणीव या ठिकाणीं फक्त असते! ब्रह्मांडाची ही तूर्या अवस्था होय.

ब्रह्मांडाच्या उपरीनिर्दिष्ट चारी देहांची कल्पना आल्यानंतर साक्षात्काराचें दृष्टीनें ह्याचें अनुभव कशा प्रकारें येतात हें पाहूं. देवयान पंथावरील ही अत्यंत महत्वाची स्थानें आहेत. ह्यांचें संपूर्ण आकलन झाल्यावर मग शेवटची अवस्था प्राप्त होते.

## निर्गुण उपासना-चित् सूर्य

देवयान पंथावरील स्वस्वरूप दर्शनाचें ठिकाणीं विश्रांति घेतल्यानंतर आनंदाचा उपभोग घेऊन अभ्यासी पुरुष नवीन जोमानें या प्रकाशमय मार्गाचें— या तेजोपथाचें जेव्हां एकाग्र चित्तानें आक्रमण करावयास लागतो तेव्हां प्रथम ब्रह्मांडाच्या विराट स्वरूपाचें दर्शन होतें. आत्म्याचें दर्शन झाल्यावर येथून पुढें खरी निर्गुण उपासना सुरू होते असें ह्मणण्यास हरकत नाहीं. सगुण उपासनेचा परिपाक ह्मणजे निर्गुण उपासना होय. प्रथम चित्ताचें चांचल्य फार असल्यामुळें ईश्वराचें सगुण प्रतीक ध्यानास घेणें जरूर असते. चित्त एकाग्र होण्याकरिता ईश्वराचें नामस्मरण, पूजन, भजन वगैरे उपचारांची जरूरी असते. निर्गुणोपासनेमध्यें ह्या उपचारांची जरूरी नसते. तेथें फक्त एक अनुसंधानरूप वृत्तिची आवश्यकता आहे. ह्मणून अंगुष्ट मात्र आत्म्याचें दर्शन होताच त्याचेंच ध्यान करावयास पाहिजे. त्याचें ध्यान करावयास लागले ह्मणजे ब्रह्मांडाचे देहांचा क्रमवार साक्षात्कार होतो. बाहेर जसें आकाश आहे तसें आपल्या अंतःकरणांत आकाश आहे. त्यास **चिदाकाश** ह्मणतात. 'पिंडीं

तें ब्रह्मांडीं व ब्रह्मांडीं तें पिंडीं ' अशी ह्मण आहे. ती सार्थ आहे. आपल्या देहाचे–पिंडाचें–दोन भाग कल्पिले आहेत. त्यांत व्यष्टि व समष्टिचा अंतर्भाव होतो असें मानतात. आपल्या कंठापासून ( कंठांत विशुद्ध नावाचें ज्ञानचक्र आहे ) खालचे भागास व्यष्टि अगर पिंड मानतात व वरचे भागास समष्टि किंवा ब्रह्मांड असें मानतात, भ्रूमध्यामध्यें अग्नि ऊर्फ आज्ञाचक्र आहे. त्या ठिकाणीं प्राण जाऊं येऊं लागला, किंचित् काल स्थित होऊं लागला म्हणजे आत्म्याचें दर्शन होतें. आत्म्यासच सूर्य असें उपनिषदांत ह्मटलें आहे. हीच ब्रह्मांडाची अकार माला व हाच स्थूल विराट देह. हाच चित्सूर्य होय ! ह्या चित्सूर्याचा साक्षात् प्रकाश जोपर्यंत पाहिला नाहीं तोपर्यंत नुसतें शब्द ज्ञान आंधळे आहे असें समजावें.

आत्मज्ञान सूर्योदय । नसता, व्युत्पत्ति सृष्टिसी तम होय ॥
प्रकाशेना आत्मतत्व स्वयें । तें ज्ञानचि आंधळें ॥

—मेरुस्वामी

## चित्‌चंद्र-मंडळ

चित्सूर्याचें जरा कडक व लखलखीत प्रकाशांत प्रवास केल्या मुळें आपला भक्त श्रांत झाला असेल अशा कल्पनेनें जणूं काय अंतःकरणांत कारुण्य उत्पन्न होऊन तो करुणार्णव चित्घनप्रभू चंद्राचें शीतळ, शांत, आल्हादकारक किरणांचा त्याजवर वर्षाव करतो ! चिच्चंद्राच्या शीतळ किरणांच्या लाभामुळें व चंद्रकलेच्या अमृतपाना- मुळें शांतता येते ! चित्सूर्याचें ध्यानाच्या योगें चंद्रज्योती प्रकाशेल असें समर्थ सांगतात.

आतां अग्रीं लक्ष लावीं । काय दिसेल तें न्याहाळीं ।
चंद्रज्योति प्रकाशली । विभु बांधिला बळकट ॥
तेथें हुशारीचें काम । अग्रीं लक्ष घालुनि नेम ॥
तीर लावून सुगम । मागें सारी सूर्यातें ॥
तेव्हां मागील दाह शमेल । शीतळाई सर्वांग होईल ॥
चंद्राची प्रभा सुढाळ । फडफडीत चांदणें ॥

— रामदास

सूर्य आपल्या सर्व किरणासह विलीन पावतो. नंतर रजनी–नाथाचें साम्राज्य सुरू होतें. त्याप्रमाणें सूर्यमंडळाचा लय चंद्रमंड–ळांत होतो. चंद्रमंडळाचे अनुभव नानाप्रकारें येतात. ही स्वप्नावस्था मानली आहे व हा ब्रह्मांडांचा सूक्ष्म देह आहे. या अवस्थेंत रजनीचे प्रशांतवेळीं चंद्राचा प्रकाश सर्वत्र भरला असला तरी तारकांचा प्रकाश असतोच. त्या प्रकाशरूप तारका चंद्रासह जशा ब्रह्मांड गगनांत दिसतात त्याप्रमाणें चिदाकाशांत हे अनुभव स्पष्टपणें ध्यावयास सापडतात. प्रतिपदेपासून चंद्राच्या निरनिराळ्या कला ज्याप्रमाणें दृग्गोचर होतात तद्वत् ध्यानावस्थेंत त्या दृग्गोचर होऊन त्यांचे सौंदर्य अनुभवण्यास सापडतें !

विकासिला निर्मळ जैसा चंद्र दिसे ।
जें ब्रह्मांडी असें तेंचि पिंडी दिसे ॥

— जनार्दनस्वामी

या अवस्थेशी तादात्म्य पावलें म्हणजे निरनिराळ्याप्रकारे पुष्कळ तऱ्हेनें अनुभव साधकास येतात. याचा व्यवहारांत जागृतपणीहि अनुभव घेऊन पहावा. उदाहरणार्थ चंद्रमंडळाशीं ध्यानानें हवे तेव्हां

तादात्म्य पावतां येऊं लागले ह्मणजे सूर्याचे प्रखर उन्हांत जाण्याचा वावरण्याचा अगर बसण्याचा प्रसंग आला तरी, अंतरंगांत चंद्राच्या शीतळ किरणांचे अमृत असल्यामुळें त्यास प्रखर सूर्यकिरणांची बाधा होणार नाहीं ! हा अनुभवाचा विषय आहे. अभ्यासी पुरुषांनीं हा अनुभव घेउन पहावा. नमुन्याकरतां एक उदाहरण दिलें पण अशा प्रकारचें पुष्कळ अनुभव प्रत्यक्ष घेऊन पाहण्याजोगे आहेत.

## डोळीयाचा डोळा

आपल्या नेत्राची देवता सूर्य आहे हें मागें सांगितलें आहे. सूर्य हा ब्रह्मांड स्वरूपाचा नेत्र. सूर्यमंडळ ज्ञानानें भेदन केल्यावर म्हणजे त्या अवस्थेचा लय पुढील अवस्थेत केल्यावर चिन्मय सुखाची नवलाई उपभोगण्यास सापडते. अतींद्रिय ज्ञान उत्पन्न झालें ह्मणजे ज्ञान नेत्र उघडला असें आपण समजतो. ब्रह्मांडाचा नेत्र जो सूर्य त्याचे लयांतच चिच्चंद्रमंडळाचा साक्षात्कार आहे. पिंडब्रह्मांडाच्या ऐक्यांचे दृष्टीनें विचार केला ह्मणजे हाच डोळीयाचा डोळा होय असें सत्पुरुष सांगतात.

पुढें दिसेल जें नवल । ते पाही हंस मेळ ॥
चंद्रकिरण शीतळ । पाहसी तूं मम वत्सा ॥
तोचि डोळियाचा डोळा पाही । देहातीत वर्म विदेही ॥
चिन्मयसुखाची नवाई । भोगी आपुले कीं गा ॥

— श्रीसमर्थ

सत्पुरुष जेव्हां अनुभवाच्या दृष्टीनें उद्गार काढतात तेव्हां त्यातील लक्ष्यार्थाकडे लक्ष दिलें पाहिजे म्हणजे त्यांतील अनुभवाची खूण कळत जाते. दासबोधामध्यें श्री समर्थ रामदासस्वामी

महाराजानीं गुढार्थाच्या पुष्कळ ओव्या कशा लिहिल्या आहेत त्यापैकीं उदाहरणार्थ एक पहा.

**नयनेंचि पहावा नयेन । मनें शोधावें मन ॥**

डोळयानें डोळा कसा पहावा ? मनानें मनास कोठें शोधावें ? ही दृष्टी ज्यास प्राप्त झाली त्यास सर्वांचें अंतर्यामीं असणारा भगवान् दिसेल !

नेत्रासंबंधीं आणखी एक विवेचन रहस्यपूर्ण आहे. आत्म-ज्ञानरूपीं शरीराचे दोन नेत्र म्हणजे वैराग्य व विवेक हे होत. हे दोन्ही चक्षू स्वच्छ झाले म्हणजे पदार्थ सहज दिसूं लागतात. याचे उत्तानार्थाकडे दृष्टी ध्यावी. हें नेत्र उघडतांच देवाचें दर्शन होतें असें सत्पुरुष म्हणतात.

**विवेक आणि सत्संगती हे । नेत्रद्वय बा आहे ॥**

असेंहि वचन आहे. विवेकास अनुसंधान अगर नादानुसंधान असें कल्पिलें आहे. सत्संगती याचा लक्ष्यार्थ सत् म्हणजे सत्स्वरूप ब्रम्ह, याचें सानिध्य म्हणजे प्रकाश अगर नाद. हे दोन्ही नेत्र उघडल्यावर निर्मल देवाचें दर्शन कां होणार नाहीं?

**उघडुनी निजविवेकचि अक्ष ।**
**देव असाक्ष पाहिले ॥**

— मेरुस्वामी

## पितृलोक

चंद्रमंडळ—चंद्रलोक हा पितृतुल्य मानला आहे. येथें पित-रांची वस्ती आहे अशी कल्पना आहे. यज्ञयागादि पुण्य कर्में, श्राद्धादि कर्में व इतर दानधर्मादि पुण्यकर्मांचें योगानें हा लोक प्राप्त होतो. शेवटीं पुण्यक्षय झाल्यानंतर येथून पतन आहे.

क्षीणे पुण्ये मर्त्यलोके विशन्ति ।

या लोकाचे पुढें फक्त ज्ञानी म्हणजे साक्षात्कारीच जातात !

## अग्नि मंडळ

चंद्रमंळाचे प्रशांत अशा प्रकाशानंतर देवयान पंथावर जास्त उजेडाचे व तेजस्वी असें स्थान भेटतें तें अग्निमंडळ होय. ध्यानावस्थेंत चंद्रमंडलाचा लय अग्निमंडळांत होतो. हें तेजस्वी आहे ! ही ब्रह्मांडाची उकार मात्रा आहे. ही सुषुप्ति अवस्था असल्यामुळें येथें आनंदाचा भोग मिळतो. हा ब्रम्हांडाचा कारण देह आहे. ह्यास अव्याकृत असें म्हणतात. येथें विकृति नसते. एकच रूप पहावयास मिळतें. या अवस्थेंतही पुष्कळ प्रकारचें अनुभव येतात येथें मागील अवस्थेप्रमाणें चंद्र व तारका दिसणार नाहींत. सर्वत्र एकच प्रकाश व्यापून असलेला दिसेल !

चंद्र सूर्य रश्मीं न देखो तारांगणे ।

अवेघा हरी होणें होचि घेवो ॥

—निवृत्तिनाथ

## ध्रुवभेदन—मूलप्रकृति

ब्रह्मांडाच्या तिसऱ्या देहाचा—अव्याकृत देहाचा लय त्याचे महाकारण देहांत होतो. सुषुप्ति नंतर साहजीकच तूर्येचा उद्भव होणार ! अग्निमंडळाचे प्रकाशावर सतत धारणा धरल्यानें या तेजोपथाचें उत्तुंग शिखर गाठतां येतें. यास अत्यंत एकाग्र वृत्ति व्हावयास पाहिजे. हें सूक्ष्म स्थान आहे. प्राणाची गती सहस्रदल मंडलापर्यंत होऊं लागली म्हणजें याचें दर्शन होतें. हें सूक्ष्म द्वार आहे.

याची प्रचीति अत्यंत सूक्ष्म रूपांत येते. एकनाथ महाराज याचें सप्रमाण वर्णन करतात.

तयावरी वर्तुळ बिंदुज्योति । श्रोती अन्यथा न मानावे चित्तीं ॥
मसूर प्रमाण तेजस्थिती । तया अंतरदृष्टी पीत भासे ॥
नील सुनील अमल । देवसाळी शुक केवळ ॥
तयाहूनि अतिनिर्मळ । सूक्ष्म ज्योति ॥
चक्षुचिया दशांश भागी । तेथें पाहती जे योगी ॥
स्वयंतेज निजांगीं । स्वतेजें असे ॥

— एकनाथ

तेथें निद्राना सुषुप्ति । चंद्र सूर्य मावळले ॥

—नामदेव

हें अत्यंत सूक्ष्म तेज, अणोरणीयान् । अशा मूळमायेचें स्वरूप आहे ह्मणून यास मूलप्रकृति असें ह्मणतात. हिचेपासून मूळ मायेचें प्रथम स्फुरण उत्पन्न झालें. दिक्काल येथूनच सुरूं झाले ! सृष्टीतत्त्वाचा आरंभ हाच.

दृष्टीचे प्रमाण चक्षुमाजी ।
लक्षिता तिळप्रमाण चक्षुमाजी ॥
तेथूनि सृष्टि विस्तारे सतेजी ॥
सावकाशे संपूर्ण ॥

— मेरुस्वामी

मस्तकांतील सहस्रदल कमलांत शिरण्याचें बिंदुरूप द्वार आहे. या खिडींतून अगर सामुद्रधुनींतून पुढें एकदम प्रकाशाच्या सागरांत लीन होता येते !

सहस्रदूल बिंदु त्यांत तेज असे।
हे तो काय सांगा मज ॥

—ज्ञानेश्वर

ही तूर्या अवस्था असल्यामुळें स्फुरण रूप आहे. परब्रह्मापासून मूळ स्फुरण अगर इषणा जी उत्पन्न झाली ती हीच होय. पिंडाच्या तूर्या अवस्थेचें वर्णन व महत्व मागें आलें आहेच. ही त्या तूर्येचीहि तूर्या आहे! पिंडाची तूर्या ज्याप्रमाणें चारी देहाचा साक्षी जो आत्मा त्याचें दर्शन करून देते, त्याप्रमाणें ब्रह्मांडाची ही तूर्या अवस्था ब्रह्माडांचे चारी देहांतीत जो प्रकाशरूप परमात्मा त्याचा साक्षात्कार प्राप्त करून देते !!

ते माझी निजात्मचर्या । तुमचे तूर्येचीचि तूर्या ॥
आत्मप्रचीतींच्या सूर्या । प्रकाशिले जियेनें ॥

— मेरुस्वामी

आकाशामध्यें ध्रुवास अढळस्थान आहे. त्याचे भोवतीं सर्व तारकांनीं भ्रमण केलें पाहिजे. सर्व प्रकाशमय तारकांनां गती आहे. पण या ध्रुवास गती नाहीं. शेवटीं प्रळयकालींच हा फक्त लीन होतो. त्याप्रमाणें या सूक्ष्म पण अत्यंत दैदीप्यमान बिंदुस्वरूपाचा लय प्रकाशरूप परमात्म्यांत होतो म्हणून ह्यास ध्रुवपद असें नामाभिधान दिलें आहे ! ह्यास उर्वरित ब्रम्ह असें म्हणतात असें समर्थ आपले शिष्यास ‘ सोलीव सुखाचा ’ आनंद देतांना सांगतात.

तया मध्यभागीं सघन । अढळपद दैदीप्यमान ॥
उर्वरित ब्रह्म जाण । ध्रुव बैसला अढळते ॥

—रामदास

परब्रह्म एकाकी होतें. दुसरें कांहींहि नव्हतें. त्यासून प्रथम मूळ ध्वनि उत्पन्न झाला. जो नाद उत्पन्न झाला तो ओंकाररूपीं होता. नाद हेंच मूळ स्फूरण होय. ह्यास नादपुरुष असें म्हणतात. यास रूप अगर देह नसल्यामुळें अमानव पुरुष असें श्रुतींत म्हटलें आहे. सोऽहं वृत्ति हें मूल प्रकृतिचेंच स्वरूप आहे. तिचें वर्णन येथें करावयास पाहिजे पण या विषयावर पुढें स्वतंत्र दीपच यावयाचा असल्यामुळें येथें फक्त याचा उल्लेख केला आहे. मागें अनुहत ध्वनींचें वर्णन गेल्या दीपांत आहे. त्या पैकीं शेवटचा जो ध्वनीं तेंच या मूल प्रकृतीचें स्वरूप होय ! वायूचा लय जसा आकाशांत होतो त्याप्रमाणें ओंकाराचा लय शेवटीं ब्रह्म-स्वरूपांत—गगनस्वरूपांत होतो !

## पिंड ब्रह्मांड ऐक्य.

देवयान पंथावरील उत्तुंग शिखरप्रदेशापर्यंत आपण मजल मारली. तरी अद्याप बराच प्रांत आक्रमण करावयाचा आहे हें लक्षांत ठेवावें. यापुढें मात्र अतीशय आनन्दाच्या प्रांतांत आपणांस प्रवेश मिळणार आहे ! आनन्दांतसुद्धां पायऱ्या आहेत. जडजीवापेक्षां शतपट मनुष्यांचा आनंद आहे. ह्याचे शतपट गंधर्वांचा आहे. गंधर्वांचे आनंदाचे शतपट देवांचा आनंद आहे. याप्रमाणें चढत्या पायरीनें शेवटीं ब्रम्हानंद हा शेवटचे पायरीचा आनंद मानला आहे. आपला हा स—अतिशय—सातिशय आनंद आहे. ब्रह्मानन्द हा तसा नसल्यामुळें तो निरतिशयानंद आहे. प्रकाशरूप परमात्म्याच्या साक्षातकारांत निरतिशयानंद सुखप्राप्ति होणारी आहे. ह्या आनंदाच्या सागराचें वर्णन करण्यापूर्वी पिंडब्रम्हांड यांचे ऐक्य कसें आहे हें पाहूं. आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून लक्षांत आलें असेल कीं, पिंडाचे जसें स्थूल, सूक्ष्म,

कारण व महाकारण हे देह आहेत; तसें ब्रह्मांडाचे विराट, हिरण्य-गर्भ, अव्याकृत व मूलप्रकृति असें चार देह आहेत. यांचे वर्णनावरून दोघांचें साम्य लक्षांत आले असेल. पिंड देहाप्रमाणें ब्रम्हांडांत जागृत, स्वप्न, सुषुप्ति व तूर्या ह्या अवस्था कशा आहेत व यांचा लय क्रमवार एकेकांत कसा होतो हेंहि दिसून आले असेल. पिंडाप्रमाणें ब्रम्हांडाच्या मात्रा कल्पिल्या आहेत. त्या मात्रांचाहि क्रमवार लय होतो. पिंडाच्या चारी देहांच्या मात्रानुरूप अभ्यासाच्या दृष्टीनें व साक्षात्काराच्या दृष्टीनें जसें अनुभव येतात, तसेंच ब्रह्मांडाच्या अकार, उकार, मकार व अर्धमात्रेप्रमाणें सूर्यमंडळ, चंद्रमंडळ, अग्निमंडळ व ध्रुवमंडळ याप्रमाणें अनुभव येतात! शेवटीं पिंडाचे चारी देहाचा साक्षी जो आत्मा त्याचा साक्षात्कार होतो त्याबरहुकूम ब्रह्मांडाचे चारी देहातींत, चारी अवस्थांतींत व परेच्या पलीकडील जो प्रकाशरूप परमात्मा त्याचा साक्षात्कार होतो ! ह्यावरून पिंडब्रह्मांड हें एकच आहेत. पिंडीं तेंच ब्रह्मांडीं व ब्रह्मांडीं तेच पिंडीं याचा अनुभव याच देहीं कसा मिळतो हेंहि वर दाखविलें आहे. हीच गोष्ट साधुसंत सांगतात.

देह ते विदेह महाकारण ब्रह्म ।
हें निश्चयाचें वर्म ऐसे जाणा ॥

— ज्ञानेश्वर

जे ब्रह्मांडी असे तेचि पिंडी दिसे ।
बोलावयाचा भास नाहीं पुढें ॥

— जनार्दनस्वामी

पिंडाचा साक्षी आत्मा व ब्रह्मांडाचा साक्षी परमात्मा हा

एकच आहे. पहिला किंचिज्ञ आहे तर दुसरा सर्वज्ञ आहे. पहिला अंशभूत आहे तर दुसरा संपूर्ण आहे. तो त्याचाच अंश असल्यामुळें दोन्ही एकरूपच आहेत. दुसऱ्याचें ज्ञान झाल्यावर पहिल्याचें विशिष्टत्व अगर निराळेपणा रहात नाहीं. उपाधी भेदानें जीव शिवाचें ऐक्य होते. पिंडब्रह्मांडाचें हेंच ऐक्य. आत्मा व परमात्मा यांचेहि हें ऐक्य होय ! परमात्मा सर्व व्यापी आहे. ह्मणून त्यास **विष्णु** असें म्हणतात. तो सर्वांत श्रेष्ठ व सर्वांचा ईश आहे ह्मणून त्यास परमेश्वर म्हणतात. हा महत् प्रकाशरूप आहे म्हणून त्यास **महादेव** असेंहि ह्मणतात. हा परब्रह्माचें दृश्य असें स्वरूप आहे म्हणून यास **ब्रह्मा** असेंहि ह्मणतात. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे या प्रकाशरूप परमात्म्याचें ज्ञान झाल्यावर आपआपल्या भक्तिनुरूप त्यास ह्या त्या सार्थ नावानें संबोधिता येते ! सगुण उपासनेप्रमाणें आत्म्यास जशी भक्त निर-निराळी नांवें देतो त्याप्रमाणें परमात्म्याचा सांक्षात्कार झाला कीं त्यासहि तशाच नामानें तो संबोधितो !

## परमात्म्याचें स्वरूप

परमात्म्याच्या स्वरूपाचें वर्णन सर्व साधुसंतांनीं अत्यंत रस-भरित, काव्यमय व बहारीनें केलेलें आढळून येतें. देवयानपंथावरील जवळ जवळ शेवटच्या मुक्कामाचें हें स्थल असल्यामुळें याचें वर्णना-करितां शब्दसृष्टीचें उद्यानांत स्वैर विहार साक्षात्कारी पुरुषांनीं केल्यास नवल काय ? हें स्थान म्हणजे आनन्दाचा सिंधु ! हा प्रकाशाचा सागर आहे ह्मणून यास **प्रकाशरूप परमात्मा** असें ह्मणतात !

**नयनी पाहतां न दिसे बिंब ।**
**अवघा प्रकाश स्वयंभ ॥**

जिकडे पाहे तिकडे उद्योची दिसे ।
एका जनार्दनीं नित्य प्रकाशें ॥
माझे मीपण देहीच मुराले ।
प्रत्यक्ष देखिले परब्रह्म ॥

— एकनाथ

प्रकाशरूप परमात्म्याचें वर्णन सर्व साधुसन्तांनीं पुष्कळ तऱ्हेनें व प्रतिमारूपानें केलेलें आढळेल. सर्वांत ज्ञानदेवांनीं फार विस्तृत व बहारीचें वर्णन केलें आहे.

ज्योति वेगळा ज्योति वसे ।
चन्द्र सूर्याहूनि तेज ते आगळे ।
अव्यक्तें व्यापिले अनुभवें ॥

दुसरें एका ठिकाणीं पद्यांत ते म्हणतात, हे प्रफुल्लवदना कृष्णा, तुझ्या मुखावर कोटि चंद्राचा प्रकाश विलसित आहे. हा कमलनयन निरतिशयानंदोत्पादक असें हास्य करीत आहे ! !

तुझियें निडळीं कोटि चन्द्रप्रकाशे ।
कमल नयन हास्य वदन हांसे ॥

— ज्ञानेश्वर

आत्मज्ञान ज्यानें आपल्या दृष्टीनें पाहिलें नाहीं त्या मनुष्या-बरोबर ह्या विषयावर संभाषण करण्यांत अर्थ नाहीं. जे अनुभवी असतात तेच सर्व जाणतात व संतहि अशांच्याच बोलण्यापासून संतोष पावतात असें ज्ञानेश्वर म्हणतात ! !

नामदेव फार काव्यमय वर्णन करतात:—

कोटि सूर्यप्रभा दीप्ती । गगनीं झळकली अवचिती ॥
सन्त नामया सांगती । पैल आला कमळापति ॥

— नामदेव

ह्या परमेश्वराचें दर्शन सहस्रदल मंडळांत होतें. उत्तमांगीं सहस्रदल नावाचें ज्ञानचक्र आहे. शारीरशास्त्रदृष्ट्या डोक्यांतील मेंदूचा हा भाग होय. मेंदूंत हजारो ज्ञानतंतू व त्यांचीं स्थानें आहेत. तेव्हां हेंच सहस्रदल कमल मानण्यास हरकत नाहीं. ह्यास ब्रह्मरंध्र अगर दशमद्वार असेंहि म्हणतात. या ठिकाणींच प्रकाशरूप परमात्म्याचा साक्षात्कार होतो.

सहस्रदळीं हरि आत्मा हा कुसरी ।
नांदे देहाभीतरीं अलिप्तसदा ॥

— मुक्ताबाई

जनाबाईनीं तर स्पष्ट शब्दांत प्रकाशरूप परमात्मरूपीं विठ्ठलाचें दर्शन दशम द्वारांत घेतल्याचें काव्यमय वर्णन केलें आहे.

नवद्वारातें भेदुनी । दशमद्वारीं गेली जनी ॥
नामा ह्मणे जनी पाहे । द्वारीं विठ्ठल उभा आहे ॥

— जनाबाई

ह्यावरून दिसून येईल कीं, ध्यानावस्थेंत सूर्य चन्द्रादि मंडलांचें व शेवटीं प्रकाशरूप परमात्म्याचें दर्शन होणें क्रमप्राप्त व साहजिक आहे. साधुसंतांनीं तसे अनुभव प्रत्यक्ष घेतलेले आहेत ह्मणून ते सर्व जनांचें हिताकरिता व अभ्यासी भक्तांनां दीपवत् व्हावेत म्हणून लिहून ठेविलेले आहेत. एकनाथ महाराज स्पष्ट सांगतात कीं हें सच्चिदानंद स्वरूप प्राणलिंग प्रत्यक्ष दिसतें ! हें जाणणारा पुरुष विरळाच !

हजारों जीवामध्यें अभ्यासी जीव थोडे. अशा अभ्यासी असंख्य जीवांपैकीं परमात्म्याचा साक्षात्कार करून घेणारा विरळाच. पण जो दृढ निश्चयानें अभ्यास करतो त्यास अपरोक्ष साक्षात्कार होतो असें संताचे ह्मणणें आहे.

तेजोराशी परब्रह्म असे । धारणेसी समरसें ॥
प्राणलिंग प्रत्यक्ष दिसे । सच्चिदानंद ॥
ऐसेनी संर्वांगें पाहतां । परमात्मा दिसेल तत्वता ॥
हे निरामय कर्ता । विरुळा जाणें ॥　　— एकनाथ

नाथ आणखी एका ठिकाणीं ह्मणतात.

परब्रह्म सुखाचा सोहळा । पाहिलासे डोळा भरूनी ॥

सद्गुरूची पूर्ण कृपा पाहिजे. ह्मणजेंच ही अवस्था प्राप्त होतें व शास्त्रप्रचीति व गुरुप्रचीति प्रमाणें आत्मप्रचीति येते. एकदा खरी आत्मप्रचीती झाली म्हणजे अनुभव अशी वस्तु रहात नाहीं तर सहज प्रचीतीच सतत असते. सिंहाचे जन्माची अशी कल्पना आहे कीं, सिंहाचा छावा आपल्या मातेचें पोट फाडून जन्मास येतो. त्याचा जन्म झाल्यावर त्यास उत्पन्न करणारी माता जगूं शकत नाहीं व दाखवितां येत नाहीं त्याप्रमाणें आत्मप्रचीतीचे आहे. ज्ञानी अंतर्निष्ठच सद्गुरूचा अगाध महिमा जाणतात.

अनुभवेवीण निजांगें । सहजप्रतीती जगे ॥
सिंह उत्पत्ति स्वांगें । जननी नुरे ॥
अगाध गुरुदीक्षेची चर्या ।
अगाध उन्मनी वरी वर्ते तूर्या ॥
अगाध चित्सूर्याच्या सूर्या ।
उदेलासी हृदयांबरीं ॥　　— मेरुस्वामी

## परब्रह्माचे सगुण रूप

**प्रकाशरूप परमात्मा**– सर्व व्यापी, निराकार, निरालंब व गगनस्वरूप अशा **खं** ब्रह्माचें–परब्रह्माचें सगुणरूप आहे ! हाच खरा सगुण देव होय ! साधुसंत देवाची उपासना करतात तेव्हां परमात्म्याचा साक्षात्कार त्यांना झाला असल्यामुळें या प्रकाशरूपाचीच ते उपासना करतात असें समजावें. ही निर्गुणोपासना आहे हें मागें सांगितलेंच आहे. साधुसंतांचें वचनामध्यें, आपण व्यवहारांत ज्यास सगुण देव ह्मणतो त्या देवाची भक्तिपर वचनें जेथें आढळतात त्याच ठिकाणीं निर्गुणोपासनापर वचनेंहि सापडतात. याचा मेळ कसा घालावयाचा हें आतां सहज लक्षांत आले असेल. साधकांनीं त्यांच्या लक्षार्थांकडे लक्ष देऊन स्वात्मकल्याण करून घ्यावयास पाहिजे. या सगुण रूपाबद्दल ज्ञानेश्वर निःसंदिग्धपणें सांगतात.

**ज्ञानदेव ह्मणे सोपानाते ऐसे ।**
**निराकार असे आकारेसी ॥**

—ज्ञानेश्वर

आपल्या महाराष्ट्रीय साधुसंतांनीं अखिल ब्रह्माची उत्पत्ति, स्थिति व लय करणाऱ्या सच्चिदानंद रूपी प्रकाशरूप परमात्म्याशीं तल्लीन होऊन आनंद सागरांत मग्न झाल्यावेळीं काढलेले वरील उद्गार आहेत ! अशा तऱ्हेचा सगुण साक्षात्कार आपणास झाला व तो सर्वांनीं करून घ्यावा असा त्यांचा आदेश आहे ! सर्वांत **ज्ञानेश्वर व एकनाथ** यांनीं, अभ्यासी पुरुषास उपयोगी पडेल अशा तऱ्हेनें क्रमवार व अत्यंत स्पष्ट शब्दांत अनुभव ग्रथित केले आहेत. साक्षात्काराचें मार्गांतील अभ्यासी पुरुषास ह्यांचा अनुभव असेलच !

साधुसंताच्या वचनांतील लक्ष्यांशच घेऊन त्यायोगें आत्म-साक्षात्कार करून घ्यावा असें समर्थ सांगतात. **समर्थांच्याच**

वचनांचे आधारें उदाहरणार्थ ही गोष्ट दाखवून देऊं. इतर साधुसंत तरी दुसरें काय सांगणार ? सर्वांची आत्मप्रचीति एकच असणार. यावरून सर्वांस एकच वस्तु लक्ष्य आहे असें जाणावें.

**वाच्यांश जाणोनि सांडावा । लक्ष्यांश विवरोनि घ्यावा ॥**
**वाच्यांशें भक्ति मुक्ति बोलावी । लक्ष्यांशें तद्रूपता विवरावी ॥**

—रामदास

सगुण या शब्दाचा अर्थ लक्ष्याचे दृष्टीनें अगर निर्गुण उपासनेच्या दृष्टीनें निराळाच अगर चढता घ्यावयास पाहिजे. अंगुष्ठमात्र आत्मा हेंच प्रथम सगुणरूप घ्यावयास पाहिजे. ह्या आत्म्याचें ध्यान करावयास पाहिजे. हेंच अंतर्निष्ठाध्यान होय. ह्यांत सर्व वृत्ति अंतर्मुख करावयास पाहिजेत. आत्म्याचें ध्यान करतां करतां सर्वव्यापी अशा निर्गुण स्वरूपाचा साक्षात्कार होतो.

**देव अंतरात्मा सगुण । सगुणे पाविजे निर्गुण ॥**
**निर्गुण ज्ञानें विज्ञान । होत असें ॥**

— रामदास

आत्मसाक्षात्कारच सर्व श्रेष्ठ आहे. तो निर्गुण उपासनेनें प्राप्त होणारा आहे. निर्गुण उपासनेमध्यें ज्या ज्या पायऱ्या आहेत व जे जे अनुभव येतात त्या पायऱ्या व ते अनुभव यांचें अचूक ज्ञान व्हावयास पाहिजे. नाहींतर सर्वच श्रम ! साधकानें फसूं नये म्हणून **समर्थांनीं** प्रत्येक अवस्थेचें स्पष्ट वर्णन केलें आहे. मुख्य ब्रह्म कोणचें ? शुद्ध स्वरूप कोणचें व मुख्य उपासना कोणची ? हें उघड सांगितलें आहे. तें कळण्याकरितां लक्ष्यांश नेहमीं ध्यानीं आणावयास पाहिजे. पिंडाचे निरासामध्यें आत्मानात्म विचार मुख्य आहे. ब्रह्मांडांचे देहांच्या निरासांत सारासार विचार मुख्य आहे.

ब्रह्मांडाच्या—अव्यक्त ब्रह्माच्या—उपासनेमध्यें सारासार विचार करावा असें सांगितलें आहे. सार कोणतें व असार कोणते हें पहावें. जें लय पावतें तें असार व जें शाश्वत रहातें तें सार. आत्म्याचा लय परमात्म्यांत होतो ह्मणून आत्मा ही असार वस्तु व परमात्मा ही सार वस्तु. तेव्हां परमात्मवस्तूच ग्रहण करावयास पाहिजे ह्मणजे परमात्म्याचाच साक्षात्कार करून घेणें जरूर आहे. आठवा देह जो मूळमाया त्याचे निरासानंतर मुख्य देव जो परमात्मा त्याचा साक्षात्कार होतो. ह्यासच **सर्वोत्तम** परमेश्वर म्हटलें आहे ! यांचेंच ध्यान करावें व ह्याचेंच ठिकाणीं अनुसंधान ठेवावें.

अखंड ध्यानचि करावें । सर्वोत्तमाचे ॥
परमेश्वरीं लावावें अनुसंधान । लाविता होईजे पावन ॥
मुख्य ज्ञानेचि विज्ञान । पाविजेते ॥

—रामदास

ह्याचें ध्यान केलें म्हणजे परब्रह्माशीं तद्रूपता प्राप्त होईल. जो निर्मळाचें ध्यान करील तो निर्मळ होईल; कारण जो ज्याची उपासना करतो तो तद्रूप होतो. परमात्म्याचा साक्षात्कार झाला ह्मणजे प्रकृतीचा आपोआप संव्हार होतो. प्रकृति ह्मणजे आदिशक्ति मूळ शुद्ध माया. मूळमायेस व प्रकाशरूप परमात्म्यास शिवशक्तिरूप मानिलें आहे. ही शक्ति शक्ताहून भिन्न राहत नाहीं पण तदधीन रहाते. हिच्या निरासाबरोबर परमात्मस्वरूपाचाहि लय निरंजन स्वरूपांत होतो. हा चढता अर्थ, हा लक्ष्यार्थ, अनुभवाच्या दृष्टीनें हा मुख्य व उच्च अभ्यास **समर्थांनीं दासबोधांत** सांगितला आहे दशक १३ समास ७ ह्यांत तर त्याचें अगदीं स्पष्ट विवेचन आहे. एक गोष्ट लक्षांत घ्यावी कीं, दासबोधांत ' आत्मा ' हा शब्द

निरनिराळ्या अर्थांनीं वापरलेला आहे. साधकानें प्रसंगानुरोधानें अर्थ लावावा व ध्यानीं घ्यावा.

आधीं आत्मानात्म विवेक थोर। मग सारासार विचार थोर ॥
सारासार विचारें संव्हार। प्रकृतीचा ॥
विचारें प्रकृति संव्हारे। दृश्य अस्तांच वोसरे ॥
अंतरात्मा निर्गुणी संचरें। अध्यात्म श्रवणें ॥
चढता अर्थ लागला। तरी अंतरात्मा चढताचि गेला ॥
उतरल्या अर्थें उतरला। भूमण्डळीं ॥
अर्थासारखा आत्मा होतो। जिकडे नेला तिकडे जातो ॥
अनुमानें संदेही पडतो। कांहीं येक ॥
निसंदेह अर्थ चालिला। तरी आत्मा निसंदेहाचि जाला ॥
अनुमान अर्थें जाला। अनुमान रूपीं ॥
या कारणें सर्व सांडावें। येक देवास धुंडावें ॥
तरीच वर्म पडे ठावें। कांहीं येक ॥

— रामदास

वरील ओव्यावरून स्पष्ट दिसतें कीं, अभ्यासी पुरुषानें चढता अर्थ उत्तानार्थ—ध्यावयास पाहिजे, त्या शिवाय मुख्य वस्तु त्याला प्राप्त होणार नाहीं. हाच साक्षात्काराचा मार्ग सांगितला आहे. निर्गुणोपासनेनें निरंजन स्वरूपाचा साक्षात्कार करून घ्या. हेंच ज्ञान सांगितलें आहे.

ज्ञान आणि उपासना। दोनी येकचि पाहाना ॥
या ज्ञानाचें विज्ञान होतें। शोधून पाहा बहुमतें ॥

—रामदास

ज्ञान व उपासना कोणत्या अर्थानें एक आहेत हें आतां लक्षांत आलें असेलच. ज्ञानाचें विज्ञान होतें म्हणजे साक्षात्कार होतो. शाद्बिक ज्ञान सांगणारे पुष्कळ भेटतात, त्यांनां ब्रम्हज्ञान व मिथ्या निश्चय हे शद्ब कल्पनामय मात्र ठाऊक असतात. साधुसंतानां मुमुक्षूनां विज्ञान दशा प्राप्त करून द्यावयाची होती ह्मणून त्यांनीं औपनिषद् ज्ञानाप्रमाणेंच निर्गुणोपासना सांपून साक्षात्कार प्राप्त करून घ्या व स्वात्मराज्य मिळवा असें सांगितलें. हीच मुख्य भक्ति–आत्मनिवेदन–भक्ति त्यांनीं सांगितली.

**जाणतां जाणतां जाणीव जाते । आपली वृत्ति तद्रूप होते ॥**
**आत्मनिवेदन भक्ति ते । ऐसी आहे ॥**

परमात्म्याचें ध्यान धरतां धरतां जाणिव कळा समूळ नष्ट होते व शेवटीं सूक्ष्म वृत्ति लीन होते ह्मणून ही भक्ति ज्यानें केली तो धन्य धन्य !

**ह्मणोनी ज्ञाता धन्य धन्य । जो निर्गुणेसी अनन्य ॥**
**आत्मनिवेदनें मान्य । परम पुरुष ॥**

—रामदास

## प्रकाश व नाद यांचें ऐक्य

प्रकाशरूप परमात्म्याचा साक्षात्कार होणें ह्मणजे परब्रह्मस्वरूपाचें सगुण स्वरूपाचा साक्षात्कार होणें; प्रकाशरूप हेंच निर्गुण निराकार, निरालम्ब अशा गगनस्वरूपाचें सगुणरूप होय, हें तत्व साधुसत्पुरुष आत्मप्रचीतीवरून कसें उघड सांगत आहेत हें दाखविण्यांत आलें. तसेंच सच्चिदानन्द स्वरूपीं परमेश्वराचें खरें नामस्मरण ह्मणजे नादपुरुषाचा साक्षात्कार होणें हें होय; आणि अनुहातध्वनि उत्पन्न

होऊन त्यावर अनुसन्धान राखणें हेंच अखंड नामस्मरण व ह्यानें परब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होते, हें सत्पुरुषांच्या अमृततुल्य वचनांचें आधारें सांगण्यांत आलें. अतींद्रिय ज्ञानानें कर्णामध्यें अनाहतध्वनि उत्पन्न होऊन नादपुरुषाचा साक्षात्कार होणें अगर प्रकाशरूप परमात्म्याचा साक्षात्कार होणें ह्या दोन्ही अवस्था अत्युच्च व समान दर्जाच्या आहेत. साधुसन्तांनीं आक्रमिलेल्या देवयान पंथाचीं हीं अखंड उपवनें किंवा आनंदसिंधु आहेत अगर हीं परिसमाप्ती स्थलें होत! ह्यापैकीं एक श्रेष्ठ व एक कनिष्ठ आहे असें मानण्याचें कारण नाहीं. साधकदशेमध्यें ज्या ज्या विशिष्ठ तऱ्हेनें साधकानें अभ्यास केला असेल अगर त्याच्या गुरूची जशी शिकवण असेल तदनुरूप त्याला अगोदर प्रकाशरूपाची नाहींतर नादाची प्रचीती येईल. ध्यान धारणाभ्यासादि मनोलयाचा अभ्यास करणारास प्रथम प्रकाशरूपाचा साक्षात्कार होईल तर हटयोगाचा अगर कांहीं मुद्रांचा किंवा मनोलयाचाहि अभ्यास करणारास प्रथम नाद ऐकूं येऊं लागतील. सर्व साधारणपणें असें जरी असूं शकलें तरी **परब्रह्माच्या सगुणस्वरूपाचें दर्शन साधकास प्रकाशरूप अगर नादरूप** ह्यापैकीं कोणच्या स्वरूपांत प्रथम होईल हें निश्चयात्मक कोणासच सांगतां येणार नाहीं. कोणत्याहि स्वरूपांत दर्शन झालें तरी दोन्हीं स्वरूपांत लवकरच दर्शन खात्रीनें होतें! हीच शेवटची पायरी आहे. ह्यापुढें ज्ञात अशी अवस्था नाहीं. कारण ह्या अवस्थेचा लय अगम्य अगोचर अशा परब्रह्मस्वरूपांत होतो. एवढें खरें कीं, प्रकाश अगर नाद यांचा अन्योन्य सम्बन्ध आहे. एकाची उत्पत्ति होतांच दुसऱ्याची उत्पत्ति होते. असें होणें अगदीं साहजिक आहे. कारण सहस्रदलकमलामध्येंच दोघांचा उगम आहे हें मागें उद्धृत केलेल्या सन्तवचनावरून सहज ध्यानीं आलें असेलच. ध्यानावस्थेमध्यें

डोक्यांत मेंदूचें मध्यभागीं प्रकाशाचें अगर नादाचें स्फुरण होत असल्याचा अनुभव अभ्यासी पुरुषांस येंतच असेल ! हा आत्मप्रचीतिचा व थोडा सूक्ष्म विषय आहे. अभ्यासी साधकांनां अनुभवितां येण्याजोगा आहे. असो. नाद आणि प्रकाशज्योति हीं एकरूपच आहेत.

नाद ज्योति परिपूर्ण आत्मा ।
परेसी महात्मा उजळला ॥

— ज्ञानेश्वर

परमेश्वराच्या खऱ्या सगुण रूपाचें खरें नामस्मरण करा. त्याचें आद्य नामाशिवाय दुसरा श्रेष्ठ मंत्र कोणता असणार !

नाम तेंचिरूप रूप तेंचि नाम ।
नामरूपा भिन्न नाहीं नाहीं ॥
आकारला देव नामरूपा आला ।
ह्मणोनि स्थापिलें नाम वेदीं
नामापरता मंत्र नाहीं हो आणीक ।
सांगतील ते मूर्ख ज्ञानहीन ॥

— नामदेव

आमचें साधुसंत ध्यानावस्थेंत परब्रह्माचें सगुण रूपाशीं तन्मय तदाकार होत असतां आनंद किती तऱ्हेनें उपभोगीत होते, आनंद सागरांत मोठ्या मौजेनें आनंद लहरींशीं कसें खेळत होते व आनंदाचा उपभोग घेत होते ह्याचें फार बहारीचें वर्णन त्यांनीं करून ठेविलें आहे. ह्या आनंदांत मग्न असतां पदांच्या रूपानें त्यांचें मुखांतून कितीतरी वचनामृतें बाहेर पडली आहेत. तीं पदें म्हणत असतां ह्मणणारास नुसत्या शब्दज्ञानानें आनंद होतो, मग जे प्रत्यक्ष त्याचा

अनुभव घेत असतील त्यांचे आनंदातिशयाची नुसती कल्पना इतरे जनांनीं केलेली बरी ! अशा वचनांपैकीं एक दोन वचनेंच खालीं उध्दृत करीत आहों.

आनन्दु बोलतां शब्दीं नातुडे ।
श्रवणीं ऐकतां श्रोताचि बुडे ॥
डोळा पाहतां अगाध पडे ॥
अनुभव चिंतिता मनाचि बुडे ॥

— एकनाथ

श्रीहरी श्रीहरी ऐसे वाचें ह्मणेन ।
वाचा धरिसी तरी मी नयनीं पाहीन ।
ध्यानीं मी ध्याईन जेथें तेथें ॥

— नामदेव

सद्गुरुसुद्धां सत्‌शिष्याला आत्मस्वरूप दाखवितात, नाम सांगतात व त्यायोगें त्याचें अंतर्बाह्य पालटून आनन्दाचा उपभोग देतात !

सांगितलें गुज । दाखविलें निज ॥
पाल्हाळी हो तुज । काय चाड ॥
खेचर ह्मणे नामयातें । अवघाचि देव ॥

— खेचर

या उपदेशानंतर नामदेवाची झालेली स्थिति पहा.

दृष्टीचें देखणें श्रवणींचें ऐकणें ।
मनाचें बैसणें एक होय ॥
नामा ह्मणे तरी विठोबा येऊनि भेटे ।
काया पालटे कैवल्य होय ॥

—नामदेव

नाथ ह्मणतात:—

नामरूपा नाहीं मेळ । नुसतां वाचेचा गोंधळ ॥
एका जनार्दनीं छन्द । बोला माजीं परमानंद ॥

—एकनाथ

साधकाच्या इच्छेप्रमाणें प्रकाशरूपाच्या ध्यानाचे योगानें अगर नादानुसंधानानें शेवटचा लय प्राप्त करून घेतां येतो हें जरी खरें असलें तरी नादानुसंधानानें होणारा लय श्रेष्ठ मानिला आहे. एका दृष्टीनें हें म्हणणें बरोबर आहे. नाद हा वायुस्वरूप आहे. हें ब्रम्हांचें मूळ स्फुरण आहे. तेव्हां वायूचा लय गगनस्वरूपांत होणें क्रमप्राप्त आहे. शिवाय शब्द हा आकाशाचा गुण आहे. तो तेथें लीन होणें हें यथाक्रम आहे. दुसरें प्रत्यंतर असें कीं, स्वरूप साक्षात्कार होऊन पूर्णावस्था जरी प्राप्त झाली तरी देह असेपर्यंत देहप्रारब्ध भोगण्याइतकेंच व्यवहार सुरू असतात. ह्यावेळीं सहजावस्था प्राप्त होते व त्या अवस्थेंत नादानुसंधानच कायम टिकतें. देहप्रारब्ध भोगावयाचे म्हटलें कीं शेवटची अवस्था सोडून तुर्यावस्थेंत यावयास पाहिजे. ह्या अवस्थेंत ब्रम्हकार्य व मायाकार्य हीं दोन्हीं सुरू ठेवितां येतात. इच्छेप्रमाणें वृत्ति चटकन आंत अगर बाहेर नेतां येते. अशा स्थितींत प्रकाशाचे अनुसंधानापेक्षां नादानुसंधान सहज राहूं शकतें म्हणून नादानुसंधानास श्रेष्ठत्व प्राप्त झालें असावें. शिवाय नादाचें प्रेम अगम्य आहे !

वेणु नादाचिया कळा । पान्हा फूटला निराळा ॥

— एकनाथ

माझें सुख मज दावियेलें डोळा ।
दिधली प्रेमकळा नाममुद्रा ॥

असतां निरंतर येणें अनुसन्धानें ।
प्रारब्ध भोगणें गोड वाटे ॥

— नामदेव

## चक्रभेदन

मूळ वायु **मूलाधार चक्रावरून** निघून दुसऱ्या म्हणजे स्वाधिष्ठान चक्रावर आल्यावर त्याचे दोन भेद होतात. एक प्राण व दुसरा अपान. प्राण सहजगत्या उर्ध्व जातो, अपानवायूची गती अधोमुख आहे. **स्वाधिष्ठान चक्रावर** आपानवायूची गती उर्ध्वमुख करावयास पाहिजे. ती तशी करतां आली ह्मणंजे अपान उर्ध्वगत होऊन तो तिसऱ्या ह्मणजे **मणिपूर चक्रावर** उर्फ **नाभिकमला**–मध्यें प्राणवायुशीं लीन होण्यास येतो. नाभिकमलाचें महत्व फार आहे. हे बेंबीचे समांतर रेषेंत पृष्ठरज्जूचे पुढचें अंगास असल्यामुळें त्यांस नाभिकमल म्हणतात. या ठिकाणीं इडा व पिंगला नामक नाड्या येऊन मिळतात. येथून सुषुम्णापंथ उर्ध्वमार्गानें सुरू होतो. कुंडलिनी नांवाची प्राणशक्ति येथें वास्तव्य करते. प्राण व अपान यांचा मिलाफ येथें झाला किंवा अपान प्राणांत लीन झाला म्हणजे तो सुषुम्णा मार्गांत शिरूं पाहतो. मनोलयाचे दृढ अभ्यासानें ह्या कुंडलिनी नामक शक्तिस चालना मिळते व प्राण सुषुम्णापंथांत शिरूं लागतो ! परा अगर निदान पश्यंति वाचेंतील अखंड नामस्मरणानें, ध्यानानें किंवा तिसऱ्या दीपांत सांगितल्याप्रमाणें कोणत्याहि प्रकारचें गुरूपदिष्ट मार्गानें, ही कुंडलिनी जागृत होते. ह्यावेळीं निरनिराळ्या प्रकारचें अनुभव येऊं लागतात. ही **प्राणरूप कुंडलिनी शक्ति** नाभिचक्र भेदन करून वर अनाहत चक्राकडे किंवा हृदयकमलाकडे जाऊं लागली ह्मणजे तिला प्रकाशरूप प्राप्त

होते. वीज ही शक्ति आहे. ती दाखवितां येत नाहीं पण ज्यावेळीं ती विशिष्ट मार्गानें जाऊं लागते तेव्हां धर्मगानें प्रकाशीत होते व दृग्गोचर होते. त्याप्रमाणें ही कुंडलिनी या मध्यमार्गांत प्रकाशजला-च्या निर्झराप्रमाणें वाहतानां दिसंत !

तैसी हृदयकमळ वेन्हीं ।
दिसे जैसी सोनियाची सरी ॥
नातरी प्रकाशजळाची झरी ।
वाहत आली ॥

— ज्ञानेश्वर

चित्ताची आत्यंतिक एकाग्रता झाल्यावर सर्व शरीरांतील प्राण शक्ति एकवट ( Forces Concentrate ) होऊन - ती विशिष्ट मार्गानें ( one direction ) वाहूं लागते त्यावेळीं शारीरिक इंद्रि-यांचे धर्म व बहुतेक सर्व स्फुरण बंद पडतें असा अनुभव येतो. **अनाहत** हें चौथें चक्र आहे. येथें मनाचें वास्तव्य मानिलें आहे. येथें प्राण आल्यावर मन व प्राण एकरूप होतात. एक दुसऱ्यांत लीन होतो ! या अनाहत चक्राचें भेदन केलें ह्मणजे वायूचें स्फुरण होऊं लागतें. दशविध नादांपैकीं कांहीं नादांचें स्फुरण सुरूं होतें. हृदयाचें ठिकाणचें चिदाकाश हें महदाकाशांत लीन होऊं लागतें. अशा प्रकाश व नाद स्वरूपांत प्राणशक्तीची उर्ध्वगती पुढें कंठ-स्थानांतील पांचव्या **विशुद्ध** चक्रावरून सहाव्या आज्ञा उर्फ अग्नी चक्रापर्यंत चालूं असते. या दोन्ही चक्रांच्या भेदनांतील अनुभव प्रकाशरूपांत येतात किंवा क्रमवार अनुहतध्वनिरूपांत—नाद रूपांत येतात. **अग्निचक्रावर–भ्रूमध्यांत** आत्म्याचें दर्शन होतें !

त्याचें ध्यानानें पुढील मार्ग आक्रमण करतां येतो. सहाव्या आज्ञा चक्रानंतर कुंडलिनी शक्ति ब्रह्मरंध्रांत म्हणजे **सहस्रदलकमलांत** प्रवेश करते. या मार्गांत ब्रह्मांडाचे चारी देहाचे अनुभव—सूर्य, चंद्र, अग्निमंडळ-दिकांच्या दर्शनाचे अनुभव येतात. परमात्म्याचा अंगुष्टमात्र असा तेजोदेह विलीन होऊन त्यास वायूचें स्वरूप येतें. हा हंस पक्षी असून तो महदाकाशांत विहार करतो असेंहि रूपक कित्येक करतात. शेवटीं तो त्या आकाशांतच लीन होतो! चिदाकाश व महदाकाश असा भेद रहात नाहीं. तो सर्वत्र प्रकाश एकरूपानें भरलेला दिसतो! प्राण शक्तीचें कुंडलिनी हें नांव लोपून स्फुरणरूप मारुत **—नादपुरुष** अशी तीस संज्ञा प्रात्प होते! हिचें शक्तिरूप पुढें ती शिवरूपाप्रत जाईपर्यंत म्हणजे परब्रह्मस्वरूपीं लीन होईपर्यंत रहातें.

**तेंवेळीं कुंडलिनी ही भाष जाये ।**
**मारूत ऐसे नाम होये ॥**
**परी शक्तिपण ते आहे ।**
**जव न मिळे शिवीं ॥**

—ज्ञानेश्वर

चंद्राचे शरीरावर षोडश कला भासतात. षोडश कला शिवाय चंद्राचें कलारहित असें स्वस्वरूप साक्षित्वानें असतें. त्यास **सत्रावी** कला म्हणतात. त्याप्रमाणें पिंडब्रह्मांडाचे निरासानंतर आत्मस्वरूप साक्षित्वानें असतें. तोच प्रकाशरूप परमात्मा! हीच सत्रावी! या अवस्थेप्रत गेल्यावर कुंडलिनी सत्रावीचें अमृतपान करते असें रूपकात्मक वर्णन साधुसंतांनीं केलें आहे. कित्येकास कुंडलिनी हें एक कोडें अगर गौडबंगाल आहे असें वाटतें. तो हटयोगाचा विषय असून तो आपणास आकलन होणार नाहीं तेव्हां त्या भानगडींत पडूं

नये असें कांहींना वाटते. पण इतकें भिण्याचें कारण नाहीं. कुंड-लिनीचें वर्णनांतील काव्य व रूपकें गाळून टाकावीत ह्मणजे तिचें खरें रूप कळेल. कुंडलिनी साडेतीन वेटोळीं घालून खालीं तोंड करून बसली आहे. तीं वेटोळीं काढलीं ह्मणजे मग ती उर्ध्वमुख होते व मग सुषुम्णापथांत प्रवेश करते असें काव्यमय वर्णन आहे. तें बरोबर आहे. याचा अर्थ उघड आहे. ओंकाराच्या साडेतीन मात्रा आहेत. या मात्रानुरूप वाचा, देह, अवस्था वगैरेंचा क्रमवार लय अभ्यासानें केला ह्मणजे प्रकाशरूप आत्मस्वरूपाचें दर्शन होतें. हे अनुभव कोणाहि साधकास येतात. अभ्यास करून पहावा ह्मणजे यांतील रहस्य कळेल व अनुभव येतील. यास हटयोगाची जरूरी नाहीं. मनोलयाचें कोणतेहि अभ्यासानें किंवा नुसत्या गुरुकृपेनेंसुद्धां कुंडलिनी जागृत होते हें मागें सांगितलें आहे. ज्ञानेश्वरीचा सहावा अध्याय—अभ्यास योग—या दृष्टीनें वाचावा ह्मणजे देवयान पंथावरील अनुभव कसकसे येतात व **ज्ञानेश्वर** महाराजांनीं ते क्रमवार कसे दिले आहेत हें कळून येईल.

## लयाचा क्रम

देवयानपंथावरील दिव्य स्थलांचें क्रमवार दर्शन झालें! या तेजोपथावरील अनुभव क्रमवार कसे येतात हें यथानुक्रम सांगितलें. क्रमवार अभ्यासाचा साधकास फार उपयोग होतो. प्रकाशरूप पर-मात्म्याच्या साक्षात्काराचे मार्गांतील अनुभव, विराटस्वरूपाचे देह व अमूर्त ब्रह्माच्या मात्रात्मक लया प्रमाणें क्रमवार येतात. सूर्य, चंद्र, तारा, मेदिनी वगैरे ब्रह्माचींच रूपें आहेत असें उपनिषद्कारहि सांगतात. ( श्वेताश्वेतर २–११ ) त्यांचा अनुभव यावयास पाहिजे व तसा तो येतोहि हें साधुसंताचें वचनावरून ध्यानांत आलें असेल.

हा लय कसा होतो हें दृश्य फार मनोहर आहे ! यास **शास्त्रप्रतीति** म्हणजे उपनिषदामध्यें पुष्कळ ठिकाणीं हा क्रम एक सारखाच दिला आहे ही होय. याज्ञवल्क्यऋषींनीं जनक राजास ब्रह्माचा उपदेश केला. तो मात्रालयपद्धतिनें केला. ती हकीकत **बृहदारण्यक उपनिषदांत** आहे. प्रथम ह्या पुरुषाची ज्योति सूर्य म्हणून सांगितली. सूर्य अस्त पावल्यावर म्हणजे लय पावल्यावर चिच्चंद्र ह्या ज्योतीचा उदय होतो असें सांगितलें. त्याचा लय अग्निमंडळांत होतो. अग्नीचा लय मूळ स्फुरणरूप वाचेंत होतो. शेवटीं तिचा लय आत्मस्वरूपांत होतो ! **मैत्रायणीय**मध्यें म्हटलें आहे कीं रवीमध्यें चंद्र स्थित आहे. चंद्रामध्यें अग्नी स्थित आहे. तेजामध्यें प्रकाशरूप परमात्मा स्थित आहे. हा अगदीं स्पष्ट क्रम सांगितला आहे. **छांदोग्य** ( ५:३ ) मध्यें एक बोधप्रद कथा आहे. गौतम कुलोत्पन्न आरुणीचा मुलगा श्वेतकेतू, प्रवाहणाकडे गेला. त्यावेळीं त्यानें श्वेतकेतूस कांहीं गूढ प्रश्न केले. त्यांचीं उत्तरें त्यास देतां येईनात. तेव्हां तो परत बापाकडे गेला. बापाला तें ज्ञान नव्हतें. म्हणून आरुणी स्वतः प्रवाहणाकडे गेला व ज्ञानसंपन्न झाला. त्यांतहि उपासक सूर्याप्रत, तेथून चंद्राप्रत, चंद्रमंडळापासून विद्युत—अग्निमंडळाप्रत जातात व तेथून अमानव पुरुष नादपुरूष त्यांना ब्रह्माप्रत नेतो, असें सांगितलें आहे. **श्रीमत् भगवद्गीतेंत** भगवन्तानीं आपुलें स्वरूप वर्णन करतांना **ज्योतिषामपि तत् ज्योतिः** । असें सांगितलें आहे. तसेंच पंधराव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।**
**यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥**

भावार्थ—(ज्ञानी) जेथें गेलें असतां परत येत नाहींत ( असें )

तें माझें परमस्थान होय! ते ना सूर्य, ना चंद्र, ना अग्निहि प्रकाशित करीत नाहीं. यांत सूर्य, चंद्र व अग्नि हा क्रम ओळीनें सांगितला आहे. याच अध्यायांत पुढें १२ व्या श्लोकांतहि तोच क्रम पुनः सांगण्यांत आला आहे इकडे अवश्य लक्ष्य द्यावें.

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥१२॥

भावार्थ—जें तेज सूर्यामध्यें असून सर्व जगाला प्रकाशित करतें, तें तेज चंद्रांत व अग्नींत आहे तें माझेंच तेज असें समज !

अशाच अर्थाची श्रुति **कठ** ( २५:१५ ) **मुण्डक** (२२:९) व **श्वेताश्वतर** ( ६:१४ ) मध्यें आली आहे. तिचा भावार्थ असा कीं, ज्याला सूर्य, चंद्र, तारका व वीज प्रकाशित करूं शकत नाहींत त्याला हा अग्नी तरी कसा प्रकाशित करूं शकेल ? प्रथम कठोपनिषदांत ही श्रुति येऊन नंतर जशीच्या तशीच मुण्डक व श्वेताश्वतरामध्यें आली आहे. यावरून या क्रमाचें महत्व किती आहे हें कळून येईल!

क्रमवार लयाभ्यासानें प्रकाशरूप परमात्म्याचा साक्षात्कार वरील शास्त्रप्रचीति प्रमाणें कसा होतो हें साधुसंतांचे मागें उद्धृत केलेल्या वचनास ताडून पहावे म्हणजे दोन्ही प्रचीति एकच आहेत असें दिसून येईल. हा प्रकाशरूप परमात्मा सहस्रदलकमलांत हिरण्मय कोशांत-वास्तव्य करतो असें **मुण्डक** ( २:२:९ ) नांवाचें उपनिषदामध्यें स्पष्ट ह्मटलें आहे. त्या श्रुतीचा भावार्थ असा कीं:—( मायेचा ) मलरहित, शुद्ध, निरवयव, शुभ्र, आधारभूत–ब्रह्म, हिरण्मय कोशांत–सहस्रदलमण्डलांत–स्थित आहे. आत्मस्वरूपाचा ज्यास साक्षात्कार झाला आहे त्यानांच ह्याचें ज्ञान होतें !

**देवयान व पितृयाण** या मार्गांचें वर्णन बहुतेक प्रमुख श्रु-

तिमधून केलेलें आढळतें. या दोन मार्गापैकीं देवयानाचेंच वर्णन अधिक व प्रामुख्यानें केलेलें दिसतें. ईशावास्योपनिषदांत [ ९ ] **अंधःकार व प्रकाश** असें वर्णन आढळेल तर प्रश्नोपनिषदांमध्यें ( १–९ ) पितृयाण उर्फ **रयि** व देवयान उर्फ **रश्मि** असा भेद केलेला दिसेल. मुण्डकोपनिषदामध्यें [ १–२–११ ] सूर्यमार्गाचें विवरण पहावयास सांपडतें. छांदोग्यामध्यें ह्या दोन्ही मार्गांचें विस्तृत वर्णन केलेलें आहे. [ ५–१० ] कौषितकी मध्यें **पर्यंकविद्या** ह्मणून ह्यांचेंच दिग्दर्शन केलेलें दृष्टोत्पत्तीस येईल. तें फार मोठें व खुला–सेवार आहे.

ह्या सर्वांचा विचार केला तर असें दिसून येईल कीं, कांहीं ठिकाणीं देहपातानंतर आक्रमण्याचे हे मार्ग आहेत असें जरी ह्मटलें असलें तरी इतर श्रुतींचे तात्पर्याकडे पाहतां ज्ञानी मनुष्यास ह्या मार्गांत सांगितलेल्या टप्प्यांचा अनुभव ह्याच देहांत घ्यावयास सांपडतो असा अर्थ अभिप्रेत आहे. कारण ज्यास परब्रह्माचा साक्षा–त्कार झालेला आहे—जो परब्रह्माप्रत गेलेला आहे त्यास देहपातानंतर ' जाणें व येणें ' असें राहतें कोठें ? जो ज्ञानी असतो तो पुनः जन्म पावत नाहीं. ह्याच देहीं तो परब्रह्मरूप होतो असें कठादि श्रुतींत [ १–३–८ व २–६–१४–१९ ] स्पष्ट सांगितलें आहे.

ह्या शेवटचे अवस्थेप्रत जात असतांना जीव–शिवाचें ऐक्य, पिंड–ब्रह्मांडाची एकतानता, आत्मा–परमात्म्याचे सामरस्य ह्यांचे अनुभव लयाभ्यासाचे योगानें घेत असतांना श्रुतिमध्यें समुच्चयानें वर्णन केलेल्या देवयानपन्थांतील दृश्यांचे अनुभव साक्षात्कारी पुरुषास येतात! ' देव ' ह्या शब्दाचा अर्थ ' प्रकाशमय ' असा केलेला आहे. तेव्हां या मार्गांत प्रकाशाचेच अनुभव येणें हें क्रमप्राप्त व यथान्याय्य आहे. ह्मणून याच देहीं ब्रह्मरूप अवस्था प्राप्त होतानां साक्षात्काराचें

मार्गांत दिसणाऱ्या प्रकाशमय दृश्यास 'दैवयानपन्थ' असें नामाभिमान दिलें आहे. ह्या मार्गांत कसकसे टप्पे लागतात याचें वर्णन उपनिषदांतून पहावयास सांपडेल. सूर्यमंडळ, चन्द्रमंडल, अग्निमण्डल, तारका, विद्युत वगैरे वगैरे स्थलांची–दृश्यांचीं–वर्णनें आढळतात. त्या बरहुकूम अनुभव आह्मास 'याच देहीं याच डोळा' पहावयास सापडतात असें आमचे साधुसंत सांगतात.

चन्द्रसूर्य रश्मि न देखो तारांगणें ॥
अवघा हरि होणे हेंचि घेवो ॥

—निवृत्तिनाथ

सम तेज पाहे तव एकचि वो तेज ।
ॐकार सहज निमाला तेथें ॥
निवृत्ति उपदेश ज्ञानिया लाधला ।
तत्वीं तत्व बोलला ज्ञानदेव ॥

—ज्ञानदेव

"मुक्तिसुखाचा सोहाळा आह्मी याच देहीं भोगितों" त्याकरितां देहपाताची वाट पाहण्याचें कारण नाहीं असें छातीठोकपणें साधुसन्त सांगतात !

न कळे दिवस राती । अखंड लागलीसे ज्योती ॥
आनन्द लहरीची गती । वर्णूं किति तया सुखा ॥
जाला इहलोकीं परलोक ।
आले सकळिक वैकुंठ ॥

—तुकाराम

यावरून पाहतां श्रुतींचा देवयानपन्थ व साधुसंतांचा देवयान-पंथ यांत अंतर काय राहिलें ? जें पूर्ण परब्रह्म स्थितीस पोहोचलें व जें याच देहीं ब्रह्मरूप झालें, ईश्वराचे गुण ज्यांचे अंगीं आल्यामुळें ईश्वर स्वरूप ज्याना मानण्यांत येतें व ज्यांनीं अघटित चमत्कार करून दाखविलें, अशा ज्ञानेश्वर महाराजासारख्या परम साक्षात्कारी साधुसं-तांच्याच तोंडून हे बोल निघतात ! उपनिषदांत सर्वत्र निर्गुण ब्रह्माची उपासना सांगितली आहे. त्याचें आत्यान्तिक फल ह्मणजे याच देहांत परब्रह्मस्वरूप साक्षात्कार होणें हें होय ! अभ्यास करतां करतां देहपात झाल्यामुळें ही शेवटची अवस्था या जन्मांत ज्यास प्राप्त होणार नाहीं त्यास देहपातानंतर देवयान मार्गानें परब्रह्माप्रत जातां येईल. ज्ञानी लोकांनां हा नियम लागू नाहीं. दुसरें असें पहा कीं पिंड ब्रह्मांडांचें ऐक्य झाल्यावर ब्रह्मांडांचे अनुभव पिंडाचे ठिकाणीं यावयास नको कां ? पूर्वींचे साधुसन्त तसेंच या काळचे साक्षात्कारी पुरुष हे उपनिषदांत वर्णन केल्याप्रमाणें सर्व अनुभव येतात असें सांगतात ! जे कोणी अभ्यास करित असतील त्यानांहि देवयानपन्थावरील टप्प्यांचे अनुभव येत असतील.

याच देहांत देवयान मार्ग आक्रमितां येतो. त्यास देहपाताची जरूरी नाहीं. उलट याच देहांत ज्यास देवयान मार्गानें जातां येईल तोच **खरा ज्ञानी** असेंहि श्रुतिप्रामाण्य आहे. **मैत्रायणी उप—निषदांत** ( ६ ) एक कथा आहे ती अशी:—**बृहद्रथ** नांवाचा राजा राज्याधिकाराचें ठिकाणीं आपल्या पुत्राची स्थापना करून, हें शरीर अशाश्वत असें जाणून, वैराग्ययुक्त होत्साता अरण्यांत गेला. तेथें तो उग्र तप आचरण करीत एक हजार दिवस उभा राहिला ! तेव्हां धूमरहित अग्निप्रमाणें तेजःपुंज असे आत्मवेत्ते भगवान् **शाकायन्य** मुनि बृहद्रथ राजाजवळ आले व ह्मणाले ‘ राजा उठ उठ. वर माग.’

राजा त्यांना साष्टांगप्रणिपात करून म्हणाला:—हे भगवन्! मला आत्म्याचें ज्ञान नाहीं. तें ज्ञान मला सांगा.

शाकायन्य म्हणाले:—हे इक्ष्वाकुकुलोद्भवा राजा, हा प्रश्न कठीण आहे. तुझ्या दुसऱ्या इच्छा असतील त्या माग.

शीघ्रगति वायुच्याच नांवानें प्रसिद्ध असलेल्या बृहद्रथ राजानें दुसरें कांहींहि मागितलें नाहीं. तेव्हां शाकायन्य मुनींनीं त्यास, वाल–खिल्यांनीं ऋतुप्रजापतीस सांगितलेली व ती मैत्री ऋषींनीं आपल्यास सांगितलेली ब्रम्हविद्या सांगितली. ही सांगतां सांगतां ब्रह्मप्राप्तीचा मार्ग सांगितल्यानंतर शाकायन्य मुनी ध्यानमग्न झाले! त्यांना योग्य आदरानें नमस्कार करून बृहद्रथ राजाहि ध्यानमग्न झाला व तो उत्तरायण मार्गानें गेल. कारण या देहांत वाकड्या मार्गानें गती नाहीं. हाच इहलोकीं ब्रह्माचा मार्ग आहे. सूर्यरूपीं द्वार भेदन करून उर्ध्वमार्गानें तो गेला. !

कांहीं कालानन्तर शाकायन्य मुनी व बृहद्रथ राजा हे दोघेहि ध्यानावस्थेंतून उत्थान दशेप्रत प्राप्त झालें. मग "इंद्रियाचा चालक व नियामक कोण" याप्रमाणें ब्रह्मद्रथ राजानें प्रश्न विचारल्यावरून शाकायन्यांनीं त्यास ओघाओघानें संपूर्ण ज्ञान सांगितलें. तसेंच अथे–दानीं ज्ञानोपसर्गा राजन् याप्रमाणें राजास संबोधून आत्मज्ञानास येणारीं विघ्नेंहि सांगितलीं.

या कथानकावरून स्पष्टपणें दिसून येईल कीं देवयान पंथां–तील पहिला टप्पा जो 'सूर्यमंडळ' तो बृहद्रथ राजानें या देहींच आक्रमण केला. शाकायन्य मुनिवर्यांनीं त्या पुढील साक्षात्काराचें ज्ञान सांगितल्यावर त्यानें परब्रह्म स्वरूपाचा साक्षात्कार करून घेतला व देहपातापूर्वींच शेवटची अवस्था प्राप्त करून घेतली!

या सर्व विवेचनावरून देवयान पंथ आक्रमण्यास देहपाताचीं

आवश्यकता नाहीं हें दृष्टोत्पत्तीस आलें असेलच. हा आत्मसाक्षात्काराचा मार्ग आहे. त्यांत दुसरें ' रहस्य ' कांहीं नाहीं. सर्व उघड ज्ञान आहे. साधुसंत तेच अनुभव उघड सांगतात. ते कळवून घेणाराची व अभ्यास करून आत्मप्रचीति घेणाराचीच उणीव आहे. हा अभ्यासाचा विषय असल्यामुळें शब्दज्ञानाचा कीस काढीत बसण्यापेक्षां अंतर्मुख वृत्ति करून मनोलयाचा अभ्यास करून आत्मप्रचीति घेत रहावी हें उत्तम. अस्तु.

पाश्चात्य व पौर्वात्य तत्वज्ञानाचें तुलनात्मक विवेचन केलेला अगदीं अलीकडील **लो. टिळकांचा गीतारहस्य** हा मोठा ग्रंथ असल्यामुळें त्यांतील दहाव्या प्रकरणांतील एक उतारा खालीं देत आहों तिकडेहि वाचकांनीं लक्ष द्यावें. रहस्यकार म्हणतात:—

" शुद्ध अध्यात्मशास्त्राचें यापुढें आणखी असें म्हणणें आहे कीं, ब्रह्म व आपला आत्मा एक हा पूर्ण साक्षात्कार ज्याच्या मनांत नित्य जागृत आहे, त्यानें ब्रह्म प्राप्त करून घेण्यास कोंठेंही दुसरीकडे कशा साठीं जावयाचें ? किंवा मरणाची तरी वाट कशाला पहावयाची? उपासनेसाठीं घेतलेल्या सूर्यादि प्रतीकांच्या म्हणजे सगुण ब्रम्हाच्या उपासनेनें जें ब्रह्मज्ञान होतें तें प्रथम थोडे अपुरें असतें कारण, त्या मुळें सूर्य लोक किंवा ब्रह्म लोक इत्यादिकांच्या कल्पना मनांत उद्भवून त्या मरणसमयींहि कमीजास्त मानानें कायम असण्याचा संभव असतो. म्हणून ही कसर काढून टाकून मोक्ष मिळण्यास अशा लोकांनीं देव-यान मार्गानेंच गेलें पाहिजे हें ह्मणणें सयुक्तिक आहे. ( वे. सू. ४. ३. १५ ) कारण मरणसमयीं ज्याची जशी भावना किंवा ऋतु तशी त्याला ' गति ' मिळत असत्ये असा अध्यात्मशास्त्राचा ठाम सिद्धान्त आहे. ( छा. ३. १४. १. ) पण सगुणोपासनेनें किंवा अन्य कारणानें ब्रह्म व स्वतःचा आत्मा याच्या दरम्यान अशा तऱ्हेचा कोण-

ताहि व्दैती आडपडदा ( तै. २. ७ ) ज्याच्या मनांत यात्किंचित शिल्लक राहिला नाहीं, तो नेहमींच ब्रह्मरूप होत असल्यामुळें अशा पुरुषास ब्रह्मप्राप्तीस्तव दुसऱ्या कोठेंच जावयाचें कारण रहात नाहीं हें उघड आहे. यासाठीं शुद्ध ब्रह्मज्ञानानें जो पुरुष पूर्ण निष्काम झाला. " न तस्य प्राणा उत्क्रामन्ति ब्रह्मैव सन् ब्रम्हाप्येति " त्याचें प्राण दुसऱ्या कोठेंहि जात नाहींत, तो नित्य ब्रह्मभूत असून ब्रम्हांतच लय पावतो. असें बृहदारण्यकांत ( बृ. ४. ४. ६. ) याज्ञवल्कानें जन– कांस सांगितलें असून अशा प्रकारचा पुरुष " **अत्र ब्रह्म समश्नुते** " ( कठ ६. १४. ) **येथल्या येथेंच** ब्रम्ह अनुभवितो असें बृहदा- रण्यक व कठ या दोन्हीं उपनिषदांत वर्णन आहे. ब्रम्ह म्हणजे अशी वस्तु नाहीं कीं तीं अमक्या ठिकाणीं आहे आणि तमक्या ठिकाणीं नाहीं असें म्हणतां येईल ( छा. ७. २९. मुं.२.२.११.) मग केव्हांहि पूर्ण ब्रह्मप्राप्ति होण्यास पूर्णज्ञानी पुरुषास उत्तरायणांतून सूर्यलोकांस याप्रमाणें मार्ग क्रमीत क्रमीत जाण्याचें कारण काय ? "**ब्रह्मवेद ब्रह्मैव भवति** " ( मुं. ३.२.९.) ज्यानें ब्रम्ह ओळखिलें तो इहलोकीं किंवा येथल्या येथेंच ब्रम्ह झाला. कारण एकानें दुसरीकडे जाण्यास एक आणि दुसरा हा स्थलकृत किंवा कालकृत भेद शिल्लक असला पाहिजे; आणि हे भेद अखेरच्या म्हणजे अद्वैत व श्रेष्ठ ब्रम्हानुभवांत असूं शकत नाहींत. म्हणून " यस्य सर्वमात्मेवाऽभूत् " ( बृ. २.४.१४ ) किंवा " सर्वं खल्विदं ब्रम्ह " ( छा. ३.१४.१ ) अगर मीच ब्रम्ह आहे.—" अहं ब्रम्हा ऽस्मि " ( बृ. १. १४. १० ) अशी ज्याच्या मनाची नित्य स्थिती झाली तो दुसऱ्या जागीं ब्रम्ह प्राप्तीसाठीं कसा जाणार ?

तो नेहमींच ब्रह्मभूत असतो. मागील प्रकरणाचें अखेर सांगि- तल्याप्रमाणें गीतेंतहि याच अभिप्रायानें " **अभितो ब्रह्म निर्वाणं**

**वर्तते विदितात्मनाम्** " ( गी. ५. २६. )— ज्यांनीं द्वैत ह्मणजे दुजाभाव टाकून देऊन आत्मस्वरूप ओळखिलें त्यांस प्रारब्ध कर्मक्षयार्थ देहपाताची वाट पहावी लागली तरी मोक्षप्राप्त्यर्थ कोठेंही जावयाचें नसल्यामुळें ब्रह्मनिर्वाणरूप मोक्षाचें ताट नेहमीं त्यांच्यापुढें वाढलेलेंच असतें; किंवा " **इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः** " ( गी. ५. १९ ) ज्यांच्या मनांत सर्व भूतांतर्गत ब्रह्मैक्यरूपीं साम्य बिंबलें त्यांनीं ( देवयानमार्गाची अपेक्षा न ठेविता ) येथल्या येथेंच जन्ममरणादि जिंकलें अगर " **भूतपृथग्भावमेकस्थ-मनुपश्यति** " — सर्व भूतातील नानात्व नाहींसें होऊन ती सर्व ज्याला एकस्थ ह्मणजे परमेश्वररुपीं दिसू लागलीं तो ' **ब्रह्मसंपद्यते** ' ब्रह्मालाच मिळाला [ गी. १३. ३० ] अशा रीतीचीं या परम ज्ञानी पुरुषांचीं वर्णनें दिलेलीं आहेत. तसेंच " देवयान व पितृयाण हे दोन मार्ग तत्वतः **जाणणारा** कर्मयोगी मोह पावत नाहीं. " [ गी. ८. २७ ] असें जें गीतेंतील वचन वर दिलें आहे. त्यांतील " तत्वतः जाणणारा " या पदांचा अर्थहि " परमावधीचें ब्रह्मस्वरुप ओळखणारा " असा विवक्षित आहे असें दिसतें. ( भाग ७. १५. ५६ पहा. ) पूर्ण ब्रम्हभूत किंवा परमावधीची ब्राह्मीस्थिति हीच होय; आणि **श्रीमच्छंकराचार्यांनीं आपल्या शारीरिक भाष्यांत** ( वे. सू. ४. ३. १४. ) हीच अध्यात्म ज्ञानाची अत्यंत पराकाष्ठा किंवा पूर्णावस्था आहे असें प्रतिपादन केलें आहे. किंबहुना ही स्थिती प्राप्त होण्यास मनुष्य एकाप्रकारें परमेश्वरच झाला पाहिजे असें म्हण-ण्यास हरकत नाहीं आणि अशा रीतीनें ब्रह्मभूत झालेले पुरुष कर्म-सृष्टींतील सर्व विधिनिषेधांच्या पलीकडच्या स्थितीस पोचलेले असतात हेंहि मग सांगावयास नको. — कारण, यांचें ब्रह्मज्ञान सदैव जागृत असल्यामुळें हे जें कांहीं करितात तें नेहमींच शुद्ध निष्कामबुद्धीनें

प्रेरित अतएव पापपुण्यापासून अलिप्त असतें. ही स्थिति प्राप्त झाल्यावर ब्रह्मप्राप्तीसाठीं दुसरे कोठें जाण्याची किंवा मरण्याची म्हणजे देहपात होण्याचीहि जरूर रहात नसल्यामुळें अशा स्थितप्रज्ञ ब्रह्मनिष्ठ पुरुषास ' जीवन्मुक्त ' असें म्हणतात. [ यो. ६. ९ पहा. ]

—गीतारहस्य

## परमात्मपूजा

शेवटीं या खऱ्या सगुण प्रकाशरूपी परमात्याची पूजा सत्पुरुषांचेच शब्दांत करून हा दीप संपवू.

चिद्ज्योतिर्मय अभंग । शिवगुरु ज्योतिरानंद लिंग ॥
ज्याच्या ज्ञानाग्नि नयनें अनंग । भस्म भस्मोनी गेला ॥
पृथ्वि लिंग स्वयंभ गाभारा । अभिषेक ज्ञानघन अखंडधारा ॥
वरुषति स्वानंदाच्या गारा । तेंचि तीळ तांदूळ स्वभावें ॥
गुरुकृपा अखंडैकधार । चिदाकाश गंगा निरंतर ॥
स्वयंभ गुरुलिंगासी साक्षात्कार । अभिषेक हा ॥
विशुद्ध सत्व गाळीव सुगंध । तेणें अर्चिला स्वरूप सिद्ध ॥
चैतन्य बिल्वदळें कोमल शुद्ध । लाखोली वाहिली ॥
सुवेद्य धान्याची मोकळी । परम शोभा लक्ष लाखोली ॥
भाव अठरासाव फळली । वनस्पति पुष्पार्थे ॥
शून्यप्रेतधूम्र सुधूप । उजळले चित्सूर्य चंद्र दीप ॥
अद्भूत लय अमूप । नैवेद्य जाला ॥
निरावरण सुधाआवरण । आपोलिंग स्वप्रकाशवर्ण ॥
अभिषेक ज्ञानतेजघन । अखंडतपन तयासी ॥
ज्ञानसुधार्णवीं संभावला । आत्मचंद्र प्रकाशला ॥
अनुभव सुगंधे शोभला । गगनगाळीव वपु ॥

———

# दीप ६ वा.

## सोऽ हम् वृत्ति.

साक्षात्काराचे मार्गांतील अत्युच्च अवस्था ज्या प्रकाश व नाद, यांचें ऐक्य कसें आहे व या दोन्हीहि अवस्था अभ्यासांतील मार्गाच्या व गुरूपरंपरेच्या भिन्नत्वामुळें, साधकास अगोदर अगर नंतर प्राप्त जाहल्या, तरी त्या दोन्हीही श्रेष्ठ व समान आहेत, एवढेंच नव्हे तर एकीच्या उद्भवाबरोबर दुसरीचाहि उद्भव होतो, हें दाखविण्यांत येऊन साधुसंतहि यांचें कसें आनंदानें वर्णन करितात हें सांगितलें आहे. निर्गुण, निराकार, निरालंब अशा गगन स्वरूपाच्या ह्या सगुणरूपाचें ध्यान करून परब्रह्म स्वरूपीं लीन होण्यास कोणत्या वृत्तिची जरूरी आहे, त्यावेळीं कोणती एकाकी वृत्ति भासमान असते याचा विचार आतां करावयाचा आहे.

ह्या सगुण ब्रह्माचें—प्रकाशरूप परमात्म्याचें—या नाद पुरुषाचें—ध्यान, ब्रह्मरंध्रांत—मुर्ध्निस्थानांत करावें असें श्रुतिमध्यें सांगितलें आहे. त्यावेळीं फक्त एकच वृत्ती असते. हिलाच **सो ऽ हं** वृति असें ह्मणतात. याच वृत्तीनें परमात्म्याचें ध्यान करावें ह्मणजे शेवटीं ही वृत्ति सुद्धां लीन होते.

॥ भेटीसी गेलीये तव तेंचि जालीये ॥

— ज्ञानेश्वर

पाहूं गेलों तव मी माझीं हारपले ।
मन ब्रह्मीं वेडावलें सोहं शब्दीं हारपलें ॥

— चांगदेव

देवयानपंथाचा हा शेवटचा टप्पा आहे. हा शेवटचा बिंदू आहे. हा अत्यंत सूक्ष्म मार्ग आहे. ह्यापुढें मार्ग नाहीं. याचा शेवट अप्रांत स्वरूपांतच होणार ! एकच पदानें येथें गमन करतां येईल !

सहस्रदल कमलांत जों जों प्राण स्थिर राहील तों तों पर—मात्म्याचें ध्यान स्थिर होईल. ह्याच वृत्तीच्या अखण्ड अनुसंधनानें अखंड ध्यानानें गगनस्वरूपीं असा विठ्ठल आह्मास प्राप्त झाला व याच वृत्तिमध्यें अखण्ड राहावें असें साधुसन्त सांगतात.

सो ऽ हं शब्दें मार केला । विठ्ठल काकुळती आला ॥

— नामदेव व जनाबाई

सो ऽ हं सो ऽ हं ह्याचि धरी छन्दु ।
सुखें निद्रा करी अद्वैतीरे ॥
तेथे ओळखी नाहीं विसरू नाहीं ।
चिदानन्दीं पाहीं रूप तुझें ॥

— मुक्ताबाई

ह्या वृत्तिमध्यें साधक तन्मय तदाकार जाहला म्हणजे अखंड आनंदाचा उपभोग घेतो ! याचे बहारीचें वर्णन निरनिराळे ठिकाणीं करण्यांत आलें आहे.

ह्या निरतिशयानंद सुख प्राप्तींत आठव—नाठव वगैरे सर्व समूळ वृत्ति नष्ट होतात.

तुका ह्मणे गंगा सागर संगमीं ।
अवघ्या जाहल्या उर्मी एकमय ॥
अनुहातीं गुंतला नेणें बाह्यरंग ।
अन्तर निवालें ब्रह्मरसे ॥

—तुकाराम

शांति येऊनि माळ घाली । अलक्ष्य सेजे निजली ॥
हंस पदें ऐक्य जाली । सुख सुखातें निमग्न ॥

—रामदास

चारी वाचांचें अतीत जी उन्मनी अवस्था तिच्यामध्यें ह्या सोहं वृत्तीचा अनुभव येतो. ही वृत्ति— ज्योत परब्रह्मस्वरूपीं लय पावते. तेंच निरंजन स्वरूप होय ! ह्याच देहीं असें समाधी सुख लाभेल तो धन्य होय !

चारी वाचा कुंठित जाहली ।
सोहं ज्योति उभारली ॥
ज्योत परब्रह्मीं जाणा ।
जनी ह्मणे निरंजना ॥

—जनाबाई

जनार्दन ह्मणे एकनाथा घेई ।
सोहं याचि देहीं समाधी सुख ॥

— जनार्दनस्वामी

तुकाराम महाराज आणखी एका ठिकाणीं हें अपार सुख कसें प्राप्त होईल हें सांगतात. एकांतांत निवांत बसून अभ्यासानें अनुभव घ्यावा ह्मणजे चित्ताचें एकाग्रतेनें मनोलय होऊन अपार असें सुख— निरातिशयानंद सुख प्राप्त होईल. ब्रम्हांडाची उत्पत्ती, स्थिति व लय ज्या स्वरूपापासून होतात त्याचा आपोआप साक्षात्कार होईल ! या स्वरूपासच आपल्या उपास्य—दैवताचें नांवानें, त्या गोपाळाचें नावानें तुकारामांनीं संबोधिलें आहे.

अनुभवें अनुभव अवघाचि साधिला ।
तरी स्थिरावला मन ठायीं ॥

बैसोनि निवांत शुद्ध करी चित्त ।
तया सुखा अन्त पार नाहीं ॥
येऊनी अंतरीं राहील गोपाळ ॥

— तुकाराम

## अ–जपा जप

सोहंच्या तात्विक अर्थाचा विचार करण्यापूर्वीं त्याच्या अजपाजप रूपाचा थोडक्यांत विचार करूं. **सोऽ हम्** यास अजपागायत्री अगर अजपा मंत्र असें ह्मणतात.

अ–जपा जपाबद्दलची माहिती पुष्कळांना क्वचितूच असेल. हें मोठें रहस्य आहे असें कित्येकांना वाटतें. तर हा विशिष्ट जप आहे व तो सांप्रदायिक आहे अशी कित्येकांची भावना आहे. हें कांहीं गौडबं–गाल आहे व कळणें शक्य नाहीं अशीहि कित्येकांची समजूत आहे. कोणत्यानां कोणत्या सकारण अगर अकारण निमित्तानें हा विषय गूढ होऊन बसला आहे. हा विषय फार महत्वाचा आहे. प्रत्येक जीवाशीं याचा संबंध आहे. ह्याचें यथातथ्य ज्ञान प्राप्त करून घेतलें असतां मनोलय व प्राणलय सहज करून घेतां येऊन अंतीं स्वस्वरूप साक्षात्कार प्राप्त करून घेतां येतो ! सर्व सत्पुरुषांनीं याचें फार महत्व वर्णन केलें आहे व या विषयावर उहापोह केला आहे. समर्थ **श्रीरामदास** स्वामी यांनीं आपले **दासबोधांत** एक स्वतंत्र समास यास दिला आहे. विषय कळून घेऊन त्याप्रमाणें नित्य अभ्यास करीत गेलें तर यांतील रहस्य प्रत्यक्ष अनुभवास येत जाईल.

उपासना या दृष्टीनेंहि याचें फार महत्व आहे. कित्येक घरां–तील वडील मंडळी सकाळीं उठून शौचमुखमार्जन झाल्याबरोबर आचमन करून या जपाचें उदक सोडतांना आपणास पहावयास

सांपडतात. नुसतें कर्म म्हणून प्रातःकालीं याचें उदक सोडणारे पुष्कळ दृष्टीस पडतात. त्यांना त्यांतील रहस्य ठाऊक नसल्यामुळें त्यांचे विधींत पाठांतर फार पाहावयास सांपडतें. या जपाचें ध्यानाचा एक श्लोक आहे. तो म्हणण्यांत तर फार चुका आढळतात. तसें होणें साहजिक आहे. अगोदर आमची सर्व विद्या संस्कृत भाषेमध्यें आहे. ती भाषा अलीकडे फार थोड्यांना कळते. त्यांतून शास्त्रीय परिभाषा असली म्हणजे मग तें फार अवघड होऊन बसतें. या जपाच्या ध्यानाचे श्लोकांत सर्व रहस्य साठवलेलें आहे व याचें वर्णनहि त्यांत आहे; तेंव्हां हा श्लोक कठीण असणारच. तो म्हणतांना व एकापासून दुसऱ्याकडे जातांना पाठभेद कित्येकवेळीं अनर्थकारक झाल्याचें दिसून येतें.

## अजपा जप म्हणजे काय ?

या सृष्टीमध्यें देहधारी जितका प्राणी आहे, त्याप्रत्येकाचें जीवित प्राणवायूवर अवलंबून आहे असें दिसून येईल. भूपृष्ठावर वावरणाऱ्या प्राण्यांचें, श्वासोच्छ्वासावर जीवित अवलंबून आहे असें आपणास प्रत्यही आढळून येतें. जलामध्यें वावरणाऱ्या जलचरांनासुद्धां प्राणवायु घेण्याकरितां ईश्वर निर्मित कांहीं इंद्रियें असतात. भूगर्भामध्यें सांपडणाऱ्या प्राण्यांनासुद्धां प्राणवायूची आवश्यकता लागते असें शास्त्रज्ञांचे विचारावरून दिसून येईल. यावरून असें ध्यानीं येईल कीं, जारज, स्वेदज, उद्भिज, अण्डजादि चारी खाणीपैकीं कोणत्याहि खाणींत उत्पन्न झालेला प्राणी असो, त्यास श्वासोच्छ्वासाची जरुरी आहे. श्रीसमर्थ म्हणतात कीं:—

देहधारक जितुकाप्राणी । श्वेतजउद्भिजादिक खाणी ॥
स्वासोस्वास नस्तां प्राणी । कैसे जिती ॥

— रामदास

मनुष्यप्राण्यापुरताच आपणास विचार कर्तव्य असल्यामुळें मनुष्यप्राण्यांच्या दृष्टीनें याचा विचार करूं. ही श्वासोच्छ्वासाची क्रिया अखण्ड चालूं असते व ह्याचें कमिजास्ती प्रमाणावर, स्थैर्यावर व निरोधावर आयुष्याची मर्यादा अवलंबून असते. पाश्चात्य शास्त्राचेंसुद्धा असें मत आहे कीं, मनुष्यानें श्वासोच्छ्वासाचें प्रमाण नियमीत केलें तर मनुष्याचें आयुष्य खात्रीनें वाढलेंच पाहिजे.

श्वास नाकानें आंत फुफुसांत घेणें व तो बाहेर सोडणें या दोन्हीं क्रियेस एक श्वासोच्छ्वास [ Respiration ] रेस्पिरेशन म्हणतात. असें श्वासोच्छ्वास दर मिनिटास सुमारें आठरा होतात असें वैद्यशास्त्राचें मत आहे. हें प्रमाण अत्यन्त श्रम केल्यावर, फुफुसाचें व इतर विकारांत, किंवा भीतीमुळें मनावर परिणाम झाल्याकारणानें वाढतें. चित्ताचें समाधान असलें ह्मणजे हें प्रमाण कमी होतें. आपल्या शास्त्रानें असें सांगितलें आहे कीं, प्रत्येक जीवाची आयुर्मर्यादा त्याच्या प्रारब्धकर्मानुसार कमीजास्त वर्षांची ठर-लेली आहे. म्हणजे त्यानें जन्माला आल्यापासून मृत्युमुखीं पडेपर्यंत ठराविक संख्येचे श्वासोच्छ्वास घेतले पाहिजेत अशी एक विधिघटना दिसते. अहोरात्र म्हणजे चोवीस तासामध्यें मनुष्याचे श्वासोच्छ्वास २१६०० होतात. ही संख्या शास्त्रज्ञांनीं ठरवून टाकिली आहे. या हिशेबानें पाहतां असें दिसून येईल कीं, एकातासांत ९०० श्वासोच्छ्वास होतात व एका मिनिटांत १५ श्वासोच्छ्वास होतात. हें प्रमाण वैद्यशास्त्राशीं जुळत आहे हें ध्यांनीं येईलच. ही जी श्वास घेण्याची क्रिया व सोडण्याची ह्मणजे उच्छ्वासाची क्रिया, यामध्यें सहजासहजीं एक जप होतो असें वेदांतशास्त्राचें व आगमशास्त्राचें

मत आहे. ज्याप्रमाणें कोणत्याही देवतांचे जप अगर मंत्रांचे जप मुद्दाम जपावे लागतात त्याप्रमाणें हा जप मुद्दाम जपण्याचें कारण पडत नाहीं; तर हा जप आपोआपच, सहजासहजीं, न जपतां होतो. ह्मणून यास **अ–जपा–जप** असें म्हणतात.

## जपाचा तात्त्विक अर्थ

हा जो अनायासानें सहजासहजीं जप होत असतो यांत कोणता मंत्र जपला जातो हें आपण पाहूं. एकांतामध्यें स्वस्थ चित्तानें बसावें व श्वासोच्छ्वासावर लक्ष ठेवावें. ह्मणजे सो हं सोहं असें शब्द उमटतात असें प्रत्यक्ष अनुभवास येईल. श्वास आंत घेतांना '**सो**' असा शब्द व बाहेर सोडतांना '**हं**' असा शब्द उमटतो. अशा तऱ्हेनें सोहंचा हा अखंड जप सुरू असल्याचें ध्यानीं येईल.

**एकांतीं मौन्य धरून बैसे । सावध पाहातां कैसे भासे ॥**
**सोहं सोहं ऐसे । शब्द होती ॥**

—रामदास

आपण जागृत अवस्थेंत अगर स्वप्नावस्थेंत असलों किंवा गाढ निद्रेंतहि असलों तरी, हा जप आपल्या न कळत पाण्याचें प्रवाहा–प्रमाणें एकसारखा सोहं, सोहं, सोहं असा सुरू आहे ! यां अखंड होत असलेल्या जपमंत्राचें अक्षरांकडे पाहिले म्हणजे कळून येईल कीं, सः व अहं अशीं दोन पदें यामध्यें आहेत. यांचा अर्थ असा कीं **तो मी ( आहे. )** वेदांतशास्त्राचे दृष्टीनें याचा वाच्यार्थ व लक्ष्यार्थ निरनिराळा आहे. वाच्यार्थ असा कीं, अज्ञानोपाधीमध्यें अवि-वेंत गुरफटलेलें आहे असें भासणारें चैतन्य, ह्मणजे अर्थात अहं विशिष्ट बिंदुमात्र **जीव,** हा मायोपाधिक सर्व जगावर सत्ता चालवि–

णारा ईश्वर आहे. हा अर्थ घेतला ह्मणजे या मंत्रांत जीवाशिवाचें ऐक्य दर्शविलें आहे असें दिसून येईल ! लक्ष्यार्थानें विचार केला तर असें दिसून येईल कीं, आपलें स्वस्वरूप जो अंगुष्ठमात्र **आत्मा** तो अखिलव्यापी प्रकाशरूप **परमात्मा** आहे. या दृष्टीनें आत्म्याचें व परमात्म्याचें यांत ऐक्य दर्शविलें आहे असें ध्यानीं येईल ! या मंत्राचें **सकार** हें शक्तिबीज आहे व **हकार** हें पुरुषबीज मानलें आहे असें समजावें सकारबीज नामरूपात्मक दृश्य जडाचा उद्भव दर्शवितें व हकार बीज हें त्याचा लय दर्शवितें. या दोन्हीं बीजांच्या योगें वृत्तींचा उद्भव व लय कळून येतो व साक्षीरूप प्रगट होतें ! या जपासम्बन्धी कित्येकांनीं असें विधान सुचविलें आहे कीं, श्वास आंत घेतांना 'स:' म्हणजे 'तो ईश्वर मी आहे' अशी वृत्ति श्वासाबरोबर आंत घ्यावी, व श्वास बाहेर सोडतांना अहं ह्मणजे मी ही अहंकार वृत्ति बाहेर सोडावी. अशा तऱ्हेनें देहाच्या अहंकाराचा त्याग करीत जावें व ईश्वर वृत्ति सतत आंत साठवीत जावी म्हणजे कालांतरानें आपणच सर्वव्यापी ईश्वर आहोंत असा साक्षात्कार होईल ! सोहंचा अनुभव अभ्यासाशिवाय मिळणार नाहीं. हे सहज शब्द आहेत. ही सहज उपासना आहे.

**उच्चारेविण जे शब्द । ते जाणावे सहज शब्द ॥**
**प्रत्याया येती परंतु नाद । कांहींच नाहीं ॥**
**ऐसी हे अ-जपा सकळासी । परंतु कळे जाणत्यासी ॥**
**सहज सोडून सायासी । पडोच नये ॥**

— रामदास

हा जप सर्व प्राणिमात्र करतात. परंतु तो फक्त जाणत्यासच कळतो व त्याचें रहस्य त्यास समजतें. या सहज जपाचें रहस्य कळून घेतल्यास इतर कोणत्याहि मंत्रजपांचें सायासांत पडण्याचें कारण

नाहीं. इतर जप हे मुद्दाम उच्चार करून करावें लागतात तसा हा जप करण्याचें कारण पडत नाहीं.

या सहज होणाऱ्या अ—जपा—जपावर भावना ठेविली म्हणजे सहज देवाची उपासना आपोआप होते, सहज जप होतो, त्याचें ध्यान घडतें, स्तुती होते व ईशस्तवन होतें ! अशा तऱ्हेनें जी सहज सेवा होते तीच सर्वव्यापी ईश्वरास प्रीय होते. म्हणून याच जपाचें रहस्य समजावून घेणें व त्याचा अनुभव घेणें हें श्रेष्ठ कर्तव्य होय ! आपल्या देहरूपीं घरांत सुरू असणाऱ्या या ज्ञानभांण्डाराचें जर आपण ज्ञान करून घेतलें नाहीं तर निर्दैवी पुरुषाप्रमाणें स्थिती होते. निर्दैव्यास द्रव्याचा साठा तळघरांत असला तरी सांपडत नाहीं. एतदर्थ तो दरिद्री राहतो. खालीं लक्ष्मी राहते व वर दरिद्री वावरतो अशी स्थिती होते ! तळघरांत द्रव्याचा साठा, भिंतींत द्रव्याचा साठा, खांबांत व तुळवंटांतहि द्रव्याचा साठा ! अशाप्रकारें सभोंवार द्रव्य असून आपण मध्यें कोरडा तो कोरडाच रहातो ! अशा परिस्थितींत जो करंटा असतो त्यास अधिक दारिद्य येतें. ईश्वराची काय ही अगाध करणी ! कित्येक द्रव्य पाहतात तर कित्येक त्याचा उपयोग करतात. हीच प्रवृत्ति व निवृत्ति होय ! म्हणून या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन अंतरींच्या **नारायणाची** ओळख करून घ्यावी ! !

या मंत्रजपास माळेचें कारण नाहीं व मोजदादीचेंहि कारण नाहीं. ईश्वरानेंच प्रत्येक दिवशीं २१६०० इतका हा जप होतो असें अगोदरच ठरवून टाकलें आहे. आपण जर काय करावयाचें असेल तर तें एवढेंच कीं, या जपाकडे अनुसंधान वृत्ति ठेवावयाची. सात्विक कर्म चित्तशुद्धीस कारण असतें. चित्तशुद्धिकरितां म्हणून कां होईना या सहजासहजी होणाऱ्या मंत्रजपाचें फल, प्रत्येक स्त्री—पुरुषानें दररोज प्रातःकालीं सूर्योदयाबरोबर उदक सोडून पदरांत कां पाडून घेऊं नये ?

## साक्षित्व

नित्य श्वासोच्छ्वासरूपानें होणारा हा जप आहे. हा जपणें आपल्या हातीं नाहीं. कारण श्वासोच्छ्वासाचें नियमन आपणास करतां येत नाहीं. हा जप आपोआप नित्य होत आहे व तो सो ऽ हं असा होतो. खरोखर ह्या मंत्रांत किती सामर्थ्य आहे, तो किती भारी मंत्र आहे, यांतील रहस्य काय आहे हें जाणल्यास व तदनुरूप त्याचें अनुष्ठान केल्यास ब्रह्मप्राप्ति सहज होईल.

कित्येक सांप्रदायी श्वासावर लक्ष ठेवावें व सो ऽ हं ऽ सो हं म्हणावें असें म्हणतात, तर कित्येक श्वास घेतांना सो व सोडतांना हं असें म्हणावें असें सांगतात. कित्येक याचें उलट सांगतात तर कांहीं-जण नुसते सो हं ह्मणा असा उपदेश करतात ! हा उपदेश ते हवा त्यास करतात व जपणारे अनुयायीहि तो जप हवा तेव्हां व हव्या त्या ठिकाणीं करतात. कित्येक तर सर्वापुढें जाऊन सोहं वर सर्व वेदांतशास्त्र आणून बसवितात ! प्रवृत्ति निवृत्ति, जीव शीव, आत्मा–परमात्मा, सर्व लक्षणा, भावना, महावाक्य वगैरे सर्व त्यावर बसवितात. यामुळें सर्व घोटाळा व भ्रम उत्पन्न होतो ! यांतील रहस्य काय आहे हें यथाशास्त्र कळून घ्यावयास पाहिजे व त्याप्रमाणें अभ्यास करून अनुभव घ्यावयास पाहिजे. नुसती रूपकें करून आत्मवंचना करून घेणें उपयोगी नाहीं. शास्त्रप्रचीति व आत्मप्रचीति पटावयास पाहिजे.

या दृष्टीनें विचार केल्यास असें दृष्टोत्पत्तीस येईल कीं, सोहं याचें बाह्यरूपाकडे न पाहतां लक्षणावृत्तीनें गूढार्थाकडे पहावयास पाहिजे. प्राण व अपान याची भेटी केली, ते एकत्र केले ह्मणजे सुषुम्णापंथ सांपडतो ! त्या मार्गानें गेलें ह्मणजें स्वस्वरूप साक्षात्कार होऊन आत्मस्वरूपीं लीन होतां येतें ! वृत्तिनिरोधाभ्यासानें पाहिल्यास वृत्तीचा उद्भव व लय या दोन्ही अवस्था जागून आपलें साक्षीपण

ओळखणें हें यांतील रहस्य आहे ! वृत्तीचें उद्भवकालीं तिची जाणिव होणें, तिची स्थिति कळणें व शेवटी तिचा लय झालेला पाहणें या तीनही अवस्थांचे आपण साक्षी आहों याचा अनुभव घेणें, हेंच स्वस्वरूप जाणणें होय !

एका जनार्दनें । आपआपणासी जाणणें ॥
साक्षित्व देखणें । तोचि सोऽहं ॥

— एकनाथ

सोहं सोहं असा जप करतां करतां सकार व हकार हे नष्ट होऊन मध्यसंधींतील फक्त ॐ कारच अनुभवास येतो ! या मध्यमार्गानें जावें, याचें साक्षित्व ओळखावें व याचेंच अनुसंधानानें, ध्यानानें परब्रम्हस्वरूपीं लीन व्हावें ! ही वृत्ति अत्यंत श्रेष्ठ दर्जाची आहे. हिच्यायोगें परब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होते. ही एकच वृत्ति शेवटीं सर्वव्यापी असते !

वृत्ति मुळाकडे पाहें । त्यास राम दिसताहे ॥
स्तब्ध होवोनिया राहे । रामची दिसे ॥
मन मुरडे आटे । तव मार्गी राम भेटे ॥
मागें पुढें प्रगटे । रामची आवघा ॥

## वृत्तिलय

असें जरी आहे तरी ही वृत्तिसुद्धां लीन करावयास शिकलें पाहिजे. एवढ्यावरच थांबतां उपयोगी नाहीं. कारण हा सुद्धां बंध आहे.

लोखंडाची बिडी तोडी । आवडी सोनियाची घडी ॥
मी ब्रह्म ह्मणतां अभिमान । तेथें शुद्ध नोहे ब्रह्मज्ञान ॥

— एकनाथ

ब्रह्माहमस्मि हा सुद्धां सोलीव भ्रम आहे. यायोगें पुनर्जन्म प्राप्त होतो असें वेद व श्रुति सांगतात. एकपण हें अनादि असतां अहं आत्मा ही उपाधी आहे. ही नष्ट झाली पाहिजे. हीहि वृत्ति परब्रह्मस्वरूपीं लीन व्हावयास पाहिजे ! खरें ज्ञान सांगण्याचा साधु-संतांचा केवढा कटाक्ष! जरा कोठें शब्दज्ञान झालें अगर हिरवें पिवळें दिसावयास लागलें कीं, ब्रह्मज्ञानाच्या बाता मारण्याकडे अलिकडे प्रवृत्ति दिसते. पण साधुसंत साधकानें भ्रमांत पडूं नये ह्मणून देवयान पंथांतील—या प्रकाशरूप अनुभवाचे मार्गांतील- सर्व टप्प्यांचें यथाक्रम वर्णन करतात व ' अद्यापहि पुढें आहे ' ' कळले असें वाटलें कीं कळलें नाहीं असें समजावें ' अशी योग्य सूचना देतात व त्यास शेवटचें अवस्थेप्रत नेऊन सोडतात ! अस्तु.

सोहं वृत्ति ही अभ्यासानें परब्रह्मस्वरूपीं लीन होते हें अभ्यासी पुरुषास ठाऊक असेलच. अतींद्रिय ज्ञानाचें योगानें कर्णामध्यें अनाहत ध्वनि उत्पन्न होतो व शेवटीं स्पष्टपणें सोहं सोहं असा ध्वनि उमटतो असें मागें दाखविण्यांत आलें आहे. नाद पुरुषाचा---अमानव पुरुषाचा---साक्षात्कार होतांच त्याचेंच ध्यान करावें. त्यावर सतत अनुसंधान ठेवावें म्हणजे पुढें पुढें स्पष्टपणें फक्त ॐ कार ध्वनि घुमत राहील ! हेंच मूळ स्फुरण होय ! ज्याप्रमाणें आर्द्रतेचा शेवट जलांत होतो किंवा माधुर्य हें अमृतसागरांत लीन होतें, त्याप्रमाणें सोहं वृत्तीला अनुसरलें ह्मणजें अप्रांत देशामध्यें गमन होतें असें एक अनुभवाचे मेरु असलेले सत्पुरुष सांगतात.

द्रवें आलिंगिलें जीवन ।
कीं माधूर्यें सेविलें पीयूष पूर्ण ॥
ब्रह्माहमस्मीचें अनुसरण । प्रवेशलें ब्रह्मीं ॥

— मेरुस्वामी

नामदेव महाराज सांगतात कीं, हें निर्विकल्प नामस्मरण केलें ह्मणजे गगनस्वरूपीं शामसुंदर मला शोधत येतो.

नामा ह्मणे नाम । गाईन निर्विकल्प ॥
येसी आपोआप । गिवसीत ॥

— नामदेव

अशा तऱ्हेनें सतत अनुसंधान ठेऊन सोहं हंसः अगर श्रुतिमध्यें सांगितल्याप्रमाणें **स त्वमेव त्वमेव तत्** । याची आत्म-प्रचीति अभ्यासानें घ्यावी. या विषयावर निरनिराळ्या तऱ्हेचीं पुष्कळ मतें व रूपकें केलेलीं आढळतील व करणारेहि आहेत. परंतु अनु-भवाच्या दृष्टीनें साधुसंताच्या वचनानुरूप व शास्त्रप्रचीतीनुरूपच साधकानें अनुभव घ्यावा एवढें सांगणें आहे.

यमधर्म व नचिकेत यांच्या अत्यंत मननीय अशा संवादाचें उद्घाटण दशोपनिषदापैकीं **कठ** या उपनिषदांत केलें आहे. नचिके-तानें यम धर्मास प्रश्न केला कीं, धर्माहून पृथक्, अधर्माहून पृथक्, कार्य व कारण याहून पृथक्, भूत व भविष्य याहून पृथक् असें जें तूं जाणतोस तें मला सांग. त्यावर **यमधर्म** म्हणाला:—सर्व वेद ज्या पदाचें प्रतिपादन करितात, सर्व तपें जें प्राप्तव्य आहे ह्मणून सांगतात, ज्याच्या प्राप्तीच्या इच्छेनें ब्रम्हचर्याचें आचरण करितात, तें पद मी तुला थोडक्यांत सांगतों. **तें पद ह्मणजे ॐ हें होय!** ( ओंकार वाच्य मी ब्रह्म आहे ) असें ज्ञान होणें हेंच अक्षर अपरब्रह्म आहे. हें पर-ब्रह्महि आहे. हेंच अ—क्षर ह्मणजे शाश्वत ब्रम्ह जाणलें ह्मणजे ज्याला ज्याची ह्मणजे अपर—ब्रह्माची अथवा परब्रह्माची इच्छा होतें तें त्याला प्राप्त होतें. हेंच श्रेष्ठ व पर असें आलंबन आहे ! याचें ज्ञान ज्यास होतें तो परब्रह्मस्वरूपीं लीन होतो !!

---

# दीप ७ वा

# महावाक्य

महावाक्यार्थ ते कैसे बापा ।
सत्वर नयनीं पहा आत्मप्रभा ॥

—ज्ञानेश्वर

देवयान पंथावरील शेवटच्या मुक्कामाच्या स्थलाचें कोण वर्णन करूं शकेल ? हें शेवटचें विश्रांती स्थल अखंड आहे. तेजोपथ जो आक्रमण करून जाईल त्यास पुनरावृत्ति नाहीं. नदी समुद्रास मिळाल्यानंतर तिला तेथून पुनरावृत्ति नाही किंवा सागरापासून ती निराळी काढतां येणार नाहीं त्याप्रमाणें ब्रह्माकार होणारी वृत्ति ब्रह्माशीं समरस होते तद्रूप तदाकार होते ! ती स्वतंत्र प्रकाशित नाहीं किंवा स्फुरण रूपानेंहि रहात नाहीं. ही शेवटची अवस्था आहे. ही शेवटची अवस्था वर्णन करितां येणार नाहीं कारण ती अनुभवजन्य आहे. अवाच्य आहे ! समर्थांनीं ह्मटल्याप्रमाणें अनुभव म्हणजे अनन्य आहे. ज्या ठिकाणीं दुसरें नाहीं तें अनन्य ! ब्रह्म हें एकजिनसी अखंड असें आहे तेव्हां त्याचें वर्णन होणार नाहीं.

श्रुतिहि **नेति नेति** । ह्मणून स्तब्ध राहिल्या तेथें इतरांची काय कथा ? अशी जरी वस्तुस्थिति आहे तरी पण कल्पना येण्यास व आत्मप्रचीति कळण्यास साधुसन्तांनीं शक्य तेवढें व शब्दाचें मर्यादेंत येईपर्यंत वर्णन करून ठेविलें आहे. हा अनुभवाचा व साक्षात्काराचा विषय आहे. आपल्या साधुसंतांनीं

याचें स्पष्टपणें विवरण आपल्या ग्रन्थामधून करून ठेविलें आहे. ही आत्मप्रचीति अभ्यासानें सर्वांनीं प्राप्त करून घ्यावी अशी कळकळीची त्यांची इच्छा आहे व सर्वांस हाच त्यांचा उपदेश आहे. प्रारब्ध कर्मानुसार ज्यांची जसजशी धारणा असेल त्याप्रमाणें त्यांनीं ह्या विषयाचें ग्रहण करावें व रहस्य जाणून घ्यावें.

गुरुशिष्य परंपरेनुरूप शिष्य जेव्हां आत्मानात्मवस्तुविवेक, इहामुत्रफलभोगविराग, शमदमादि षट्क व मुमुक्षत्व इत्यादि साधन-चतुष्टयानें संपन्न होतो तेव्हां अशा सत्‌शिष्यास सद्‌गुरु महावाक्याचा उपदेश करतात. हा उपदेश झाल्याबरोबर त्याच्या सर्व हृदयग्रन्थीं तुटतात व तो संपूर्ण ज्ञानी होतो—परब्रह्माचा त्यास साक्षात्कार होतो. इतर शाब्दिक वाक्यापेक्षां महावाक्याचें महत्व फार आहे कारण हें महावाक्य ह्मणजे हा श्रेष्ठ शब्द असा आहे कीं, जो ऐकल्यांबरो-बर शिष्य शब्दांतीत होतो ! ह्या महावाक्याचें विवरण वेदांतशास्त्रा-मध्यें व वेदांत ग्रंथांतून अत्यंत विस्तारानें, अतिशय सयुक्तिक व बुद्धिग्राह्य असें केलेलें आढळेल. पण त्याचा साक्षात्कार होण्यास आत्मप्रचीति येण्यास मनोलयाचा अभ्यासच करावयास पाहिजे. या करितांच सद्‌गुरु करावा, सद्‌गुरुशिवाय याचा अनुभव येणार नाहीं असें सर्व सत्पुरुषांनीं स्पष्ट ह्मटलें आहे. नुसत्या शब्दज्ञानानें असंभावना व विपरीत भावना नष्ट होतील पण त्यानें साक्षात्कार होणार नाहीं. त्यास **शाब्दपरेच निष्णातम्** असा मोक्षदाता सद्‌गुरूच मिळावयास पाहिजे. अशा सद्‌गुरूची कृपा झाली ह्मणजे ते महावाक्याचा साक्षात्कार करून देतात व तेणें-करून अखण्ड सुखप्राप्ति—निरतिशयानन्द सुखप्राप्ति होते ! महावाक्याचा उपदेश होणें ह्मणजे तरी काय ? हें कित्येकास गूढ पडतें. त्याचें ज्ञान उत्तम तऱ्हेनें मिळवून त्याचें सशास्त्र विवरण करतां

येणें अगर वाच्यार्थानें व लक्षार्थानें तें बुद्धीस पटवून घेणें ह्मणजे त्याचें संपूर्ण ज्ञान झालें व आपण ज्ञानी झालों अशी कित्येकांची समजूत असेल. पण ती बरोबर नाहीं. बुद्धीचे अतीत जी वस्तु आहे तिचा साक्षात्कारच व्हावयास पाहिजे. तो कसा होतो ह्याचें उघड वर्णन साधुसन्त करतात.

महावाक्यार्थ ते कैसे बापा ।
सत्वर नयनीं पाहा आत्मप्रभा ॥

—ज्ञानेश्वर

महावाक्याचा साक्षात्कार अभ्यासानें आपणास कसा झाला हें तुकाराम महाराज खालील अभंगात मार्मिकपणें सांगतात. चिन्मय अंजन आपलें डोळयांत सद्गुरूंनीं घातल्यामुळें आपणास दिव्य-दृष्टी प्राप्त झाली. त्यायोगें ब्रम्हाच्या रूपाचें दर्शन झालें. देश परिच्छेद काल परिच्छेद व वस्तुपरिच्छेद हा भेद नाहींसा होऊन **आत्म्यास प्रकाशरूप परमात्म्याचें** स्वरूप प्राप्त झालें! शेवटीं महावाक्याचा साक्षात्कार होऊन ब्रम्हानंद प्राप्त झाला व वृत्ति अभिन्न तद्रूप तदा-कार झाली!

रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न ।
चिन्मय अन्जन सूदले डोळा ॥
तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टी झाली ।
कल्पना निवाली द्वैताद्वैत ॥
देश–काल–वस्तु भेद मावळला ।
आत्मा निवाळिला विश्वाकार ॥
तत्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग ।
तेचि झाला अंगें तुका आतां ॥

—तुकाराम

महावाक्याचें ज्ञान प्राप्त होऊन सांगानें ज्ञानस्वरूप कसें होता येते हें वर दर्शित केलें आहे.

## महावाक्य

साधनचतुष्टय संपन्न होत्साता सत्‌शिष्य सद्गुरूस शरण जाऊन त्यास नमनपूर्वक महावाक्य विचारण करतो त्यावेळीं सद्गुरु कृपाळू होऊन त्यास महावाक्य श्रवण करवितात. त्यायोगें मायाभ्रम निरास होतो. निरनिराळ्या प्रकारें दृष्टांत देऊन ( १ ) ब्रह्म हें अद्वितीय व सत्‌स्वरूप कसें आहे, ( २ ) ज्ञानाचेयोगानें ब्रह्म–स्वरूपीं लीन झाल्यावर अभिन्नपणानें राहतो, ( ३ ) आपलें भिन्नपण रहात नाहीं, ( ४ ) ब्रह्मस्वरूपच जगत्‌रूपानें नटलें आहे व तें तूंच ब्रह्म आहेस, ( ५ ) जीवास ब्रम्हाव्यतिरिक्त निराळें नामरूप रहात नाहीं, ( ६ ) आत्मा देहाहून पृथक्‌, आहे ( ७ ) मायेचें पटल दूर करून सद्गुरुकृपेनेंच स्वस्थानाप्रत जातां येतें, ( ८ ) मनोलयाचें अभ्यासानें स्वस्वरुपीं लीन होतां येते व मग जन्ममरणाचे दुःखाचा निरास होतो, ( ९ ) देह–अहंता सोडल्यावर व अहंकाराचा समूळ नाश झाल्यावर तो निर्लेप होऊन मुक्त होतो इत्यादि शिकवणीनें ‘ तूं ब्रह्म आहेस ’ असें ज्ञान ठसावतें. ब्रह्म हें अद्वितीय असल्यामुळें त्यास कोणतीहि उपमा त्रिभुवनांत देतां येत नाहीं. तें फक्त ह्या वाक्यावरून जाणावयाचें आहे.

पूर्वी ब्रह्म हें एकच एकटें होतें. त्याचें ठिकाणीं ‘ ईक्षणा ’ झाली, मूळ स्फुरण उत्पन्न झालें. तेंच मायेचें स्वरूप ! लगेच तिज पासून सर्व जगदाभास उत्पन्न झाला. या ठिकाणीं अशी शंका येते कीं, ब्रह्माचे ठिकाणीं तरी ईक्षणा कां उत्पन्न झाली ? हा प्रश्न फार

गहन आहे. याचें उत्तर शब्दानें देतां येणें कठीण आहे. ती त्याची इच्छाच. याशिवाय त्यास उत्तर नाहीं. प्रत्यक्ष त्याचा साक्षात्कार झाल्याशिवाय ही शंका फिठणार नाहीं. तसा तो झाला ह्मणजे सर्व संशयाचें निराकरण आपोआप होईल, सर्व कामना पूर्ण होतील व अंति निर्वाण प्राप्त होईल !

आतां या महावाक्याचें **वेदांत–शास्त्र–दृष्टचा** विवरण कसें आहे तें पाहूं. तत् या पदानें **परब्रह्म** वस्तूचेंच ग्रहण करावयास पाहिजे. त्वं या पदानें प्रत्यक् **ब्रह्मग्रहण** करावें. प्रथम त्वं ह्मणजे कोण हें जाणलें पाहिजे. अंतःकरण व त्याच्या वृति ह्याचा जो साक्षी, जो चैतन्यरूप आहे, जो देहातीत आहे, जो सुखरूप आहे, जागृत स्वप्न सुषुप्त्यादि अवस्था जो जाणतो, लोहचुंबकाचें स्वभाव–धर्मामुळें लोहाचें चालकत्व अकर्तेपणा राहून जसें त्याच्यावर आरोपित होतें; त्याप्रमाणें जो अकर्ता असून देहेंद्रियादिकांचें चालकत्व ज्याचेंवर आरोपित केलें जातें, असा जो आत्मा त्यास **त्वंपदार्थ** ह्मणतात ! अखिल ब्रह्मांडास व्यापून असणारा, ज्याचें आनंदास सीमाच नाहीं, सच्चिदानंद स्वरूपीं, ज्यास परमात्मा किंवा भूमा ( अपरिछिन्न, सर्व व्यापक ) म्हणतात, जो जाणला असतां सर्व जाणल्या सारखे होते, ज्याचें अनंतत्व केव्हांहि विघडत नाहीं अशा स्वरूपास **तत्पदार्थ** अशी संज्ञा आहे. जें जें ब्रह्मान्यतिरिक्त तें तें अतत् या सदरांत येतें. तें दूर करणें याचा निरास करणें यास **अतत्व्यावृत्ति** ह्मणतात. अतत् व्यावृत्ति रूपानें व साक्षात् विधिमुखानें तत्पदार्थ जाणावा, त्याचा साक्षात्कार करून घ्यावा व निजांगानें ब्रह्म व्हावें !

तत् पद हें सर्वज्ञ व परोक्ष आणि त्वं हें पद किंचिज्ञ व अपरोक्ष आहे. मग यांचें ऐक्य आहे असें वेदांनीं कसें वर्णिलें आहे ?

अशी शंका येईल. तर त्याचा निरास देश व काल परिच्छेद राहि-त्यानें करावा. उदाहरणार्थ :— एकादा मनुष्य एका देशांत अगर एका स्थलीं भूत कालांत पाहिला तो दुसऱ्या स्थलीं वर्तमान काळांत पाहिला, तेव्हां देश व काल बदलले असले तरी लक्षणावृत्तीनें तोच हा मनुष्य असें ज्याप्रमाणें समजावयाचें, त्याप्रमाणें जीवाचे किंचिज्ञत्व व अपरोक्षत्व तसेंच ईश्वराचें सर्वज्ञत्व व परोक्षत्व हे दोन्ही गुण सोडून लक्ष्यार्थानें दोघांचें ऐक्यच जाणावें.

'त्वं पदाचा **वाच्यार्थ** असा कीं:–मी सुखी, मी दु:खी, मी कर्ता, मी भोक्ता, मी किंचिज्ञ व मी अपरोक्षी आहे वगैरे वृत्ति जीवाच्या आहेत असा आहे. त्याचें उलट मी सर्वज्ञ आहे व परोक्ष आहे ह्या ईश्वरी वृत्ति तत् पदाच्या वाच्यार्थ आहेत. वाच्यार्थाचें दृष्टीनें पाहिले तर ह्या दोन पदाचा विरोध दिसतो. महावाक्यानें तर दोहोंचें ऐक्य सिद्ध केलें आहे यावरून दोन्ही पदांचा वाच्यार्थ सोडून लक्ष्यार्थच घ्यावयास पाहिजे हें उघड आहे. देह हा असत्, जड व दु:खरूप आहे त्याचें ठिकाणीं भासमान् होणारा कूटस्थ ज्यास आत्मा ह्मणतात, तो आत्मा त्याचे उलट गुणांनीं युक्त आहे ह्मणजे तो सत् रूप आहे चित्–चैतन्य रूप आहे व आनंदरूप आहे. त्यास प्रत्य-गात्मा ह्मणतात व तो स्वयंप्रकाशरूप आहे ! त्वं पदाचा हा **लक्ष्यार्थ** आहे. यानें आत्म्याचें ग्रहण करावयास पाहिजे. तत् पदाच्या लक्ष्यार्थानें परमात्म्याचें ग्रहण करावयास पाहिजे. तो सच्चिदानं–दरूप लक्षणांनीं युक्त आहे. त्यास प्रकाशरूप परमात्मा ह्मणतात ! त्वं पद व तत् पद या दोघांचे लक्ष्यार्थाकडे पाहिलें ह्मणजे त्यांत विरोध येत नाहीं. ह्मणून लक्षणावृत्तीनें दोन्ही अखंड, एकरस व एकरूप आहेत असें जाणावें. हीस **जहदजहल्लक्षणा** ह्मणतात. जहत् ह्मणजे त्याग करणें. दोन्हीं पदांच्या वाच्यार्थाचा त्याग करावा. अजहत् ह्मणजे

स्वीकार करणें. दोन्हीं पदांच्या लक्ष्यार्थाचा स्वीकार करावा. दोन्हीं पदांच्या विरुद्धांशाचा त्याग करणें व अविरुद्धांशाचें ग्रहण करणें हीं **जहदजहल्लक्षणा** होय. ह्या अत्यंत महत्वाच्या जहदजहत् लक्षणेच्या योगानें महावाक्याचें तत्व ग्रहण करावें. हें ज्यानें जाणलें तोच जन्म मरणाचे फेऱ्यांतून पार पडतो व संसार सागरांतून तरून जातो. ' तें ब्रह्म मी आहे ' व ' मी तें ब्रह्म आहें. ' असा उपदेश महावाक्यानें होतो !

## महावाक्यें.

**श्रीसमर्थ रामदास** यांनीं श्रुतीमध्यें निरानिराळीं महावाक्यें सांगितलीं आहेत तदनुरूप तीं थोडक्यांत एका अभंगामध्यें ग्रथित केलीं आहेत. तो असा:—

तत्वमसि आणि अहं ब्रह्म ऐसें ।
जाण हें विश्वासें महावाक्य ॥
अयमात्मा ब्रह्म आणि ज्ञानब्रह्म ।
दास ह्मणे वर्म वेदवाक्य ॥

—रामदास.

वर विवेचन केलेलें **' तें तूं आहेस '** हें वाक्य सर्वसाधारणपणें महावाक्य समजलें जातें तरी **' मी ब्रह्म आहे ' ' हा आत्माच ब्रह्म आहे' ' चैतन्य हेंच ब्रह्म आहे '** हींहि महावाक्यें समजलीं जातात. कोणत्याहि शब्दानें संबोधिलें तरी जाणावयाचें तें एकच स्वस्वरूप आहे हें लक्षांत ध्यावें.

महावाक्याचें ज्ञान झालें तरी विज्ञानदशा प्राप्त व्हावयास पाहिजे. देवयानपंथाची शेवटची अवस्था म्हणजे महावाक्याचा अनुभव होय. सो ऽ हं वृत्तिरूप अखंड अनुसंधानानें परब्रम्ह स्वरूपीं

लीन होतां येतें. भ्रमरीकीटकन्यायाप्रमाणें अखंड अनुसंधान ठेविलें म्हणजे तद्रूपता उत्पन्न होते व आपोआप स्वस्वरूपाची सोय सापडते. परब्रम्हस्वरूपाशीं एकवार समरस झाल्यावर आपण कोणत्या मार्गानें येथपर्यंत आलों असें पाहूं लागल्यास तो मार्ग मुळींच दिसत नाहीं:

तेथील अनुभव घेऊनी । स्वानुभव पाहे कलटुनी ॥
आला मार्ग तें क्षणीं । दिसेनासा झाला कीं ॥
सखोल भुमिके ऐसे झाले । सुख सुखासी घोटलें ॥
स्वयें आत्मत्व प्रगटलें । माझे देहीं रोकडें ॥

— रामदास

या तेजोपथावरील शेवटचे खिंडींतील प्रणव घाट ओलांडल्या-वर अप्रांत अशा परब्रह्मप्रदेशांत एकदम प्रवेश होतो ! जें जाणावयाचें तें जाणलें म्हणजे तो त्या वस्तुस्वरूप होतो. ज्ञानवृत्ति स्वरूपाकार झाली म्हणजे ज्ञेय, ज्ञाता व ज्ञान ही त्रिपुटी नाहींशीं होऊन एक आत्मस्वरूपच रहाते.

एवं वस्तुसी जाणो जातां । जाणणेचि नुरे तत्वता ॥
मग जाणणे आणि जाणता । कैचा उरे ॥

— ज्ञानेश्वर

हें स्वरूप परेच्या अतीत आहे. नादास सुद्धां येथें शिरकाव नाहीं. मग याचें वर्णन मुखानें कसें होणार ? मौन धरणें हेंच याचें वर्णन होय !

कां परेसी पडे मिठी । तेथें नादा सळूं नुठी ॥
मा वावरीजेल वोठीं । हें कें आहे ॥

—ज्ञानेश्वर

परब्रह्मस्वरूपाचें ठिकाणीं साक्षित्व आहे असेंहि ह्मणतां येत नाहीं. कारण तेथें साक्षित्व नसून तें आपलेंच अभिन्नस्वरूप आहे.

गगनासी नाहीं गगन ज्ञान । सज्ञाना अंतरी घेते वळखण ॥
साक्षी न होता तूंचि गगन । ही अभिन्न खूण जाणावी ॥
—मेरुस्वामी

## नीलप्रभा दर्शन

अभ्यासाचे दृष्टीनें पाहिलें तर या गगनस्वरूपांत लय कसा होतो हें सांगतां येणें कठीण आहे. लय होतानां पहावयाचा ह्मटलें तरी कांहीं मर्यादेपर्यंतच अगदीं हुषार राहून जाणीव कळवून घेतां येईल. त्यापुढें मात्र कांहीं नाहीं हें खरें. ती अशब्द, अवाच्य व अप्रांत अशी स्थिति आहे. वायु जसा आकाशांत एकदम लीन होतो त्याप्रमाणें सोहंवृत्तीचा लय होतो. ती वृत्ति लय पावतांना चमत्कार झालेला अनुभवास येतो.

निरंजना जाता नाहीं जनवन । अंत्राळी गगन एकापकी ॥
एकापकी देव निर्मळ निश्चळ । आतुडे प्रांजळ दूजेविण ॥
—रामदास

आकाशाचें स्वरूप काय असें विचारलें तर पोकळीं या शिवाय कांहीं सांगता येणार नाहीं सर्वत्र त्याची व्याप्ति आहे. त्या-ठिकाणीं ढग नसले ह्मणजे त्याचा निळा वर्ण दिसतो. दिवसा प्रका-शांत निरभ्र आकाशाची प्रभा तेजस्वी अशा नीलवर्णाची दिसते. जास्त बरोबर वर्णन करावयाचें ह्मणजें त्या नील वर्णांत पांढऱ्या वर्णाची छाक असते त्यामुळें त्याची तेजस्वीता वाढते ! परब्रह्मास गगनस्वरूपाचें सादृश्य मानलें आहे. शब्दसृष्टीचें मर्यादेंत या स्वरू-

पाचें एवढेंच वर्णन करतां येईल. या स्वरूपाशीं तन्मय होतां होतां वर वर्णन केल्याप्रमाणें प्रकाशयुक्त नील वर्णाची छाक, छट्टा अगर झळाळी दृगोचर होते असें ह्मणतां येईल ! सो हं या ज्ञानवृत्तीचा लय होतांना ती विशेष स्वरूपांत प्रगट होते. दिवा शांत होतांना त्याची ज्योत जरा मोठी होते. पाणी हे लाटच्या स्वरूपांत दिसते न दिसते तोंच ती लाट लय पावते किंवा विजेची चमक ह्मणजे तिचा अस्तच, त्याप्रमाणें मूळ मायेचें स्फुरणहि वंद पडल्यावर सोहंवृत्ति लय पावतां पावतां परब्रह्मस्वरूपाची नुसती चमक दाखवून लीन होते !

**अज्ञानाचा टेका । नसताही ज्ञान अधिका ॥**
**फाके जव उफका । आपुला पडे ॥**

— ज्ञानेश्वर

शेवटच्या स्पष्ट ओंकाररूपी नादाचा लय होतांना हा अनुभव येतो. ज्ञप्तिमात्र निरंजन स्वरूप प्रचीतीस येते ! अमानव पुरुष देवयान पंथाचें शेवटचें ठिकाणीं त्यास परब्रह्मरूपीं महाराजाजवळ त्याचे दरबारांत नेतो व त्याठिकाणीं त्यास अधिष्ठित करतो !

**कांहींसे उर्वरित अवसान । केवळ उन्मनीची दशा गहन ॥**
**ज्ञप्तिमात्र निरंजन । प्रतीतिसि ठाके ॥**

— मेरुस्वामी

## खं ब्रह्म

परब्रह्म स्वरूपाचें वर्णन ‘ **खं ब्रह्म** ’ असें श्रुतींत केलें आहे. बृहदारण्यक उपनिषदांतील पांचवे अध्यायाचें पहिले ब्राह्मणांत फक्त हाच विषय आहे. परब्रह्म हें **गगनस्वरूप** आहे. हें अनादि आहे. ज्याप्रमाणें आकाशाचें ठिकाणीं वायू लीन होतो त्याप्रमाणें

निरालंब गगन स्वरूप अशा खं ब्रह्मांत मायेचें मूळ वायुरूपी स्फुरण, जो मूळ शब्द-नाद तो लीन होतो. हें ज्यानें जाणलें त्यानें जाणण्यास योग्य असें सर्व जाणलें, असें समजावें ! हा ब्राह्मण लहान असल्यामुळें त्याचा संपूर्ण भावार्थ दिला आहे.

आमचे साधुसंतांनीं ह्याप्रमाणें देवयान पंथांतील शेवटचे मुक्काम स्थलाचें-अप्रांत प्रदेशाचें वर्णन केलेलें आहे. छांदोग्य श्रुतिमध्यें, नादपुरुषाचा-अमानव पुरुषाचा साक्षात्कार झाला म्हणजे हाच ब्रह्मस्वरूपाकडे नेतो असें वर्णन आहे व देवयान पंथाचें वर्णन येथें संपल्याचें सांगितलें आहे.

**समर्थ** ह्मणतात परब्रह्म हें निर्मल-मायामल रहित, निश्चळ, व्यापक व गगनस्वरूप आहे ! याचें अनुसंधान धरलें कीं, वृत्ति तदाकार होते. ही तदाकार वृत्ति श्रवणानें-नादानुसंधानानें प्राप्त होईल. मग सर्व संशयाचा निरास होईल. जो निर्मळाचें ध्यान करील, त्याचें अनुसंधान ठेवील तो निर्मलच होईल. ह्याच निरंजन स्वरूपास मुख्य ब्रह्म अथवा परब्रह्म ह्मटलें आहे. हेंच गगनस्वरूप होय !

**ब्रह्म निर्मळ निश्चळ । शाश्वत सार अमळ विमळ ॥**
**अवकाश घन पोकळ । गगना ऐसे ॥**

—रामदास

हीच शेवटची अवस्था. ह्या अवस्थेप्रत गेल्यावर तेथून पुनः उत्थान दशा नाहीं.

**नाथहि** या स्वरूपाचें असेंच वर्णन करतात व याचा साक्षात्कार करून घ्यावा व आपण वस्तुरूप व्हावें असें सांगतात.

अचळ निर्मळ शांत । निज असे दिसत ।
ऐसे तें निरंजन । विराजलें असें ॥
ऐसी वस्तु चर्मचक्षु जो लाहे । ज्ञानदृष्टि करुनि जो पाहे
चिद्ज्ञानु होऊनी राहे । निजवस्तु पूर्ण ।

—एकनाथ

**ज्ञानेश्वर** महाराज दृष्टांत देतांना याचें यथार्थ वर्णन करतात.

जो निरंजनीं निदेला । तो आणिकी नाहीं देखिला ।
आपुलाहि निमाला । आठवूं तया॥

—ज्ञानेश्वर

मर्यादेचा अतिरेक करून बोलावयाचे तर परब्रह्माचें स्वरूप गगनासारखें आहे असें सांगितलें आहे. परब्रह्म हें संपूर्ण व्यापक आहे. दृश्यरहित निर्गुण आहे. निर्मळ, निश्चळ व गगनासारिखे आहे. या स्वानंदघनस्वरूपाचा साक्षात्कार होणें हें आत्मउपासनेचें लक्षण आहे. हिलाच **अपरोक्ष उपासना** म्हणतात ! हीच विज्ञानदशा होय ! साधुसंत आपला अनुभव असाच सांगतात.

निळा रंग देखे सर्वांचे देखणी ।
चैतन्य भुवनी समरस ॥
ज्ञानदेवा ध्यान सच्चिदानंदाचे ।
सर्व ब्रह्म साचे येणें येथें ॥

— ज्ञानदेव

सावळी हे प्रभा अंगकांति ।
रूप नाहीं रेखा नामहि जयासी ॥

— तुकाराम

चक्षुचे देखणें सरे । ज्ञानदृष्टी पाहोनि विरे ॥
देखणेपणेंवीण उरे । सर्वांग देखणा ॥

— रामदास

प्राण ब्रम्हरंध्रांत स्थिर झाला ह्मणजे अर्धमात्रारूपीं नाद अगर सोहं वृत्ति गगन स्वरूपांत लय पावते. सोहं भात्राच्या बाह्या पसरून परमात्मलिंगास-परब्रम्ह स्वरूपास आलिंगन दिलें कीं आपण स्वयें परब्रह्मच होतो ! ऐक्य झाल्यावर गगनस्वरूप होतों असेंहि ह्मणतां येत नाहीं. गगनांत गगन लय पावतें असें जे म्हणतात तीं ही अवस्था होय ! प्रत्यक्ष अनुभवाशिवाय—साक्षात्काराशिवाय याचें रहस्य कळणार नाहीं. श्रुतिनें म्हटल्याप्रमाणें हीच शेवटची अवस्था होय ! याच्यापुढें जाणावायाचें असें कांहीं नाहीं. ज्ञानेश्वरीचें सहाव्या अध्यायांत याचें फार बहारीचें व काव्यमय वर्णन आहे तें खालीं दिल्याशिवाय रहावत नाहीं.

पुढें तन्मात्रा अर्धवरी । आकाशाच्या अंतरीं ॥
भरतीं गमे सागरीं । सरिता जेवी ॥
मग ब्रह्मरंध्री स्थिरावोनी । सोहं भावाच्या बाह्या पसरुनी ॥
परमात्मलिंगा धावोनी । आंगा घडे ॥
गगनीं गगन लया जाये । ऐसे जे कांहीं आहे ॥
तें अनुभवे जो होये । तो होऊनि ठाके ॥
पुढती जाणणे ते नाहींचि । ह्मणोनि असो किती हेचि ॥
बोलावे आतां वायाचि । धनुर्धरा ॥
जे उन्मनीयेचें लावण्य । जे तुर्येचें तारुण्य ॥
अनादि जे अगण्य । परम तत्व ॥

जे विश्वाचें मूळ । योगद्रुमाचें फळ ॥
जें आनंदचाचे केवळ । चैतन्य गा ॥
जे आकाराचा प्रांत । जो मोक्षाचा एकांत ॥
जेथ आदी आणि अंत । विरोनि गेले ॥
जे महाभूतांचें बीज । जे महा तेजाचें तेज ॥
एवं पार्था जे निज । स्वरूप माझे ॥

—ज्ञानेश्वर

## सगुण देव—मेघश्याम.

ह्याच स्वरूपाचें सगुण रूपाच्या दृष्टीनें 'मेघश्याम' श्यामसुंदर, कृष्णसखा वगैरे शब्दांनीं वर्णन केलेलें आहे. या शब्दांनीं पांडुरंगाचें नामस्मरण, ध्यान, चिंतन, भजन कांहींहि केलें तरी सत्पुरुष कोणत्या दृष्टीनें तो शब्दोच्चार करतात व त्यांचें अनुसन्धान कोणीकडे असतें हें लक्षांत घ्यावयास पाहिजे. श्रीकृष्णाच्या प्रतीकाचें छायाचित्र नीलवर्णांत नेहमीं काढतात. कृष्ण ह्मणजे काळा असा अर्थ नव्हे तर नीलवर्णाचा असा अर्थ आहे. त्यास घनःश्याम, श्यामसुंदर कां म्हणतात हें आतां ध्यानांत घ्यावें. वाळवें तालुक्यांत वाटेगांव म्हणून एक लहान गांव आहे. कऱ्हाड ते इसलामपूर या रस्त्यावर कासेगांव म्हणून गांव आहे तेथून २ मैल **वाटेगांव** आहे. तेथें **श्रीवासुदेवाची** १॥–२ हात उंचीची अत्यंत सुंदर मूर्ति आहे. ह्या मूर्तिंत विशेष हा आहे कीं, हिचें सुहास्य वदन आहे व ही नीलवर्णाची-गगनस्वरूप वर्णाची-आहे ! ही अत्यंत तेजःपुंज असून अवयव अगदीं रेखीव व नयन मनोहर आहेत. श्रीमत् भागवतांत वर्णन केल्याप्रमाणें ही मूर्ति आहे. लांब लांबचे प्रांतांतूनहि लोक वासुदेवाचें दर्शनास येतात. मूर्ति पंचरसी धातूची आहे. अशा तऱ्हेच्या

ल्हान मोठ्या मूर्ति ठिकाठिकाणीं असतील. अष्टें हें गांव वाळवे तालुक्यांत आहे. **श्रीदत्तमहाराज** यांची समाधी तेथें आहे. या समाधी मंदिरांत **श्रीदत्तप्रभूंची** १४ अंगुले उंचीची अत्यंत सुरेख एक पंचरसी धातूची नीलवर्णाची मूर्ति आहे. सांगण्याचे तात्पर्य असें कीं, सगुण ध्यानास सुद्धां परब्रह्मस्वरूपाच्या वर्णाचें प्रतीक घ्यावें असें सांगितलेलें आहे व तसा प्रघातहि आहे. याचें रहस्य आतां वरील विवेचनावरून सहज लक्षांत आलें असेल. साधुसन्तांनींहि ह्याच दृष्टीनें विठ्ठलाचें वर्णन केलें आहे. पंढरपुर ही निळाची खाण आहे असें **भानुदास** ह्मणतात. समर्थ मनाचें श्लोकांत रामरायाच्या रूपाचें वर्णन गगनासारखें असल्याचें सांगतात व याचेंच चिंतनानें मूळमायेचें बंध तुटतात व परब्रह्म स्वरूपाची प्राप्ति होते असें सांगतात.

पंढरपूर हे निळियाची खाणी ।
नवलाव साजणी देखियेला ॥
भानुदास ह्मणे नील हा चोखडा ।
सुजडु हा जडा जीवन ॥

— भानुदास

नभासारिखें रूप या राघवाचें ।
मनीं चिंतिता मूळ तूटे भवाचें ॥

— समर्थ

मन व प्राण यांचा लय झाला व शद्वाची निःशद्ब अवस्था झाली कीं, तेथें मेघश्याम गोविंद प्रगट होतो !

मना पवना नाहीं भेद । तया ठायीं हा गोविंद ॥
तेथें खुंटला अनुवाद । वेद–श्रुति आटल्या ॥
कृपा केली मेघश्यामा । संतसंगे तारिले ॥

— नामदेव

साक्षात्कारी पुरुष सगुण देवाची उपासना कोणत्या लक्ष्यार्थानें करितात हें ध्यानीं येण्याकरितां त्यांचें शब्दांत थोडें विवेचन करूं. प्रभु रामचंद्र व जानकी माता यांचेंच उदाहरण पाहूं. **राम** परेच्या पलीकडील पुरुष व **सीता** ही चिद्विलास ! सीता ही चिदानंदरूपीं आहे व राम हा निरंजनरूपीं आहे. दोहोंच्या ऐक्यांत अखंडैक रस प्राप्ति आहे. ही सीताराम उपासना ज्ञानदायी आहे. विदेहनंदिनी ही केवलदशा व राम हे आस्तिक्य स्वरूप होय !

राम परात्पर परेश । सीता चिद्विलासी निर्विकार ।
चिदानंदघन वैदेही । निरंजन रामहृदयीं ।
हेचि भक्तांचे अभ्यंतर । रामसीता मनोहर ॥
बोधे निजात्म साक्षात्कार । प्रगट राम उपासना ॥

—मेरुस्वामी

अशा प्रकारें लक्ष्यार्थानें निर्गुण उपासना केली म्हणजे वस्तु-रूप तत्काल होता येतें. यायोगें निर्गुण, निश्चळ व निरंजन अशा देवास ओळखावे असें समर्थ म्हणतात.

ओळखावे देवा निर्मळा निश्चळा ।
निर्गुण केवळा निरंजना ॥

—रामदास

## पुरुषोत्तम व त्याची भक्ति

श्रीमद्भगवद्गीतेमध्यें या परब्रम्ह स्वरूपास **पुरुषोत्तम** असें म्हटलें आहे. गीतेच्या पंधराव्या अध्यायास पुरुषोत्तमयोग असें

नामाभिधान देण्यांत आलें आहे. कारण या स्वरूपासंबंधींच विवेचन या अध्यायांत आहे. अग्नि हा कापरास लागल्यावर तो कापराचा नाश करून शेवटीं स्वतःहि नाहींसा होतो, तद्वत् ज्ञान हें अज्ञानाचा निरास करून स्वतःहि हरपून जातें. त्याप्रमाणें सोहं वृत्ति ज्ञानबोध करून नष्ट होते! जाणीव व नेणीव याव्यतिरिक्त जो स्वतःरूप असतो त्यास उत्तम पुरुष असें ह्मणतात. तो आपणच आपणास प्रकाशित करतो. क्षर व अक्षर या उपाधीरहित तो स्वस्वरूपानें श्रेष्ठ आहे म्हणून त्यास **पुरुषोत्तम** असें म्हणतात.

ऐसे जाणणेनिवीण उरले । जाणते जे ॥
तैं तो गा उत्तम पुरुष । दोहोह्नि आणिक ॥
तो मी गा निरुपाधिक । क्षराक्षरोत्तम एक ।
ह्मणोनि ह्मणे वेद लोक । पुरुषोत्तम ॥

—ज्ञानेश्वर

या पुरुषोत्तमाचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं फार बहारीचें केलें आहे. या सर्वोत्तम पुरुषाचें ठिकाणीं विश्रांतिहि विश्राम पावते. त्याचें ठिकाणीं प्रकाश व नाद यांचा लय होतो ! तो गगनस्वरूपानें एक आहे. तो पूर्णतेचा परिणाम आहे. हा सर्व श्रेष्ठ आहे ह्मणून यांस ईश्वर ह्मणतात!

जो प्रकाशेवीण प्रकाश । जो ईशिस्तव्येवीण ईश ॥
आपणेनिची अवकाश । वसवीत असे जो ॥
जो पूर्णतेचा परिणाम । पुरुष गा सर्वोत्तम
विश्रांतिचाहि विश्राम ॥ विराला जेथें ॥

—ज्ञानेश्वर

यास परमात्मा असें म्हणतात. येथें ही गोष्ट ध्यानांत ठेवावी कीं याठिकाणीं परमात्मा ह्मणजे प्रकाशरूप परमात्मा असा अर्थ अभिप्रेत

नाहीं. कारण प्रकाशरूप परमात्म्याचेहि अतीत परब्रह्म वस्तु आहे. याचें स्पष्टिकरण निसंदिग्धपणें ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरींत केलें आहे आत्मा व प्रकाशरूप परमात्मा ही दोन्हीं अलिकडच्चीं रूपें आहेत. परब्रह्म हें त्या दोहींचे पर म्हणजे पलिकडचे आत्मरूप आहे म्हणून यास या अर्थानें परमात्मा अशी संज्ञा आहे.

म्हणोनि पुरुष क्षराक्षर । दोन्ही देखोनी अवर ॥
याते म्हणती पर । आत्मरूप ॥
अर्जुना ऐसिया परी । परमात्मा शब्दावरी ।
सूचि जे गा अवधारी । पुरुषोत्तम ॥
सोहं तेहि अस्तवले । जेथ सांगतेचि सांगणे जाले ॥
दृष्ट्र्त्वेसीं गेले । देखणे जेथ ॥

--ज्ञानेश्वर

या पुरुषोत्तमस्वरूपास, ज्ञानरूप सूर्याचा उदय झाल्यावर-प्रकाशरूप परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यावर जो जाणतो तोच खरा भक्त या संज्ञेस पात्र आहे. तोच भक्ति करण्यास योग्य आहे. कारण गगनास गगनानेंच आलिंगन देणें शक्य आहे दुसऱ्या कोणासहि नाहीं. तव्दत् जो परब्रह्मरूपीं झाला तोंच पुरुषोत्तमाचें भजन करण्यास उचित आहे व त्यालाच भक्ति करणें शक्य आहे. त्यासच **भक्त** ही संज्ञा आहे ! अमृतरूप झाल्याशिवाय अमृत सागरांत मिळतां येणार नाहीं किंवा उत्तम सुवर्णरूप झाल्याशिवाय उत्तम सुवर्णांत मिळतां येणार नाहीं तद्वत पुरुषोत्तमरूप झाल्याशिवाय पुरुषोत्तमाची भक्ति करतां येणार नाहीं ! देव होऊन देवाची भक्ति करील तो अनन्य भक्त होय ! !

## परम स्थिति–आनंद लहरी

साधुसंतांनीं आपलें सर्व हद्दत सांगून टाकिलें आहे; कांहीं सांगावयाचें ठेविलें नाहीं. परब्रह्माचें ज्ञान ज्यास करून घ्यावयाचें आहे अशा अभ्यासी व तळमळणाऱ्या जीवांनीं या **साक्षात्कारयोगाच्या** प्रकाशमय मार्गानेंच जावयास पाहिजे. साधुसंत परब्रह्माशीं तदाकार झाल्यामुळें जे जे उद्गार काढतात ते ते लक्षणावृत्तिनें घ्यावयास पाहिजेत ह्मणजे त्यांना कोणती वस्तु अभिप्रेत असते हें ध्यानीं येईल. ते आनंदसागरांत पोहूं लागले म्हणजे आनंदरूप होत्साते आनंद लहरीशीं खेळूं लागतात व नकळत वा मुद्दाम कळून आनंदाचे तुषार जगाच्या कल्याणाकरितां सोडीत असतात !

स्वयें परब्रम्हस्वरूप झाल्यावर **'मी ब्रह्म आहे'** ह्या महावाक्याचा अनुभव घेत असतां साधु तल्लीन होऊन म्हणतात.

**मी तो स्वयें परब्रह्म । मीचि स्वयें आत्माराम ॥**
**मजविण नाहीं कोणी । एका शरण जनार्दनीं ॥**

—एकनाथ

**कांहींच मी नव्हे कोणीये गांवांचा ।**
**एकटा ठायींचा ठायीं एक ॥**
**नाहीं आह्मां ज्यावें मरावें लागत ।**
**आहों अखण्डित जैसे तैसे ॥**

—तुकाराम

परब्रह्माशीं सामरस्य पावल्यावर तेथें दुजेपण कसें राहणार ? मनाची उन्मनावस्था झाल्यावर–परमानन्दरूप समाधी साध्य झाल्यावर

आपल्यामध्यें व देवामध्यें भिन्नपण राहिलें कोठें? जिकडे पहावें तिकडे देवच व्यापून भरलेला दिसेल. त्याशिवाय अणुरेणुहि रिता नाहीं अशी प्रचीत येईल. सर्वत्र आपलीच व्याप्ति असल्याचें आढळून येईल. '**खरोखर हें सर्व ब्रह्म आहे**' या महावाक्याचा अनुभव येईल! आपलाच हा चिद्विलास आहे अशी जाणीव होईल! चैतन्य लहरी उमटतांच विश्व उद्भवतें व ती मावळतांच त्याचा लय होतो! हेंहि आपलें स्वरूपच होय! साधुसन्त ह्या अवस्थेचें फार हृदयंगम तऱ्हेनें वर्णन करतात.

अन्तरीं बाहेरी एकमय जाहलें ।
अवघें कोंदाटलें परब्रह्म ॥
एका जनार्दनीं ऐसी जाहली वृत्ति ।
वृत्तिची निवृत्ति चिदानन्दीं ॥

—एकनाथ

जिकडे पहावे तिकडे तुझें रूपच दिसतें. हे **मेघश्यामा!** तूंच अवघ्या विश्वांत भरून राहिला आहेस. जेथें जेथें माझी दृष्टी जाईल तेथें तेथें तुझीं पाउलेंच दिसतात!

जेथें देखे तेथें तुझीच पाउलें ।
विश्व अवघें कोंदाटलें ॥
रूप गुण नाम अवघा मेघश्याम ।
वेगळें तें काय उरलें ॥

—तुकाराम.

नामदेव महाराज म्हणतात कीं उन्मनी अवस्थेमध्यें दाही दिशा भरुन राहिला आहे, अशा हरीचें दर्शन होतें!

मन झालें उन्मन वासना तल्लीन ।
दोखिलें हरिचरण सर्वाठायीं ॥
नामा पाहे देहीं तव उभा चहूं बाहीं ।
दिशा द्रुमित दाहीं हरी दिसे ॥

--नामदेव

श्रीसमर्थहि त्याचाच अनुवाद करतात.

वृत्ति गुंतली स्वानुभवें । जनीं तोचि भासे आघवे ॥
सर्वांह्य व्यापिलें देवें । ब्रह्मांड अवघे ॥
रामेविण सर्वथा कांहीं । अणुमात्र रिते नाहीं ॥
दृश्य द्रष्टा दर्शन तेही । रामचि असे ॥

-- रामदास

दशेंद्रियाकडून जे जे व्यापार होतात त्या त्या ठायीं परब्रह्माची जाणीव होते. हें गुरुकृपेंचे वर्म आहे. पुढें, मागें, बाजूस वर खालीं सर्वत्र ब्रह्माची व्याप्ति आहे ! हें सर्व विश्व ब्रह्मच आहे व तें सर्व-श्रेष्ठ आहे अशी श्रुति सांगते. [ मांडूक्य उपनिषद् २: २: ११ ]
या श्रुतिबरहुकूम अनुभव येत असल्याचें फार बहारीचें व तल्लीनता उत्पन्न करणारें वर्णन सत्पुरुष करितात.

वामसव्य दोहींकडे । देखु कृष्णाचें रूपडे ॥
आतां खालीं पाहूं जरी । चहुंकडे दिसे हरी ॥
सर्वाठायीं पूर्ण कळा । दासी जनी पाहे डोळा ॥

-- जनाबाई

दृष्टी देखे परब्रह्म । श्रवणीं ऐके परब्रह्म ॥
रसना सेवी ब्रह्मरस । सदा आनन्द उल्हास ॥

गुरुकृपेचें हें वर्म । जग देखे परब्रह्म ॥
एका जनार्दनीं चराचर । अवघे ज्यासी परात्पर ॥

— एकनाथ

अशा या सर्वत्र व्यापि परब्रह्माचें वर्णन रामदासस्वामीहि यथातथ्य करितात.

दुजेविण देव एकटा एकट । उभा घनदाट मागेंपुढें ॥
मागें पुढे ब्रह्म सर्वत्र व्यापक । दास तो निःशंक तेणे गुणे ॥

-- रामदास

ही प्रचीतीची प्रचीति सद्गुरूशिवाय लाभणार नाहीं असें सर्व ज्ञानीं लोक सांगतात ! ह्या शेवटचे अवस्थेप्रत एक सद्गुरूच नेऊं शकतात. त्यांची पूर्ण कृपा झाली म्हणजे ते अत्यंत प्रेमानें आपल्या कृपाछत्राखालीं आपल्या पवित्र वातावरणांत अभ्यास करावयास लावून विज्ञानदशा प्राप्त करून देतात ! एवढेंच नव्हें तर तें आपलें स्वरूपच शिष्यास बनवितात. केवढीं ही त्यांची थोरवी ! सर्व साधुसंतांनीं आपल्या गुरूचें अत्यंत आदरानें वर्णन केलें आहे. एकनाथ महाराजांनीं सद्गुरूचें वर्णन अप्रतिहत लेखणीनें जितकें केलें आहे तितकें दुसऱ्यांनीं क्वचित्च केलें असेल. सद्गुरु सांगतात कीं, अखंड योगानिद्रा कालीं मी जवळ असतां जिची सुंदर प्रभा इंद्रनील प्रभेप्रमाणें आहे अशा स्वयंभू गाळींव सुखाच्या मूर्तीचें तुह्मास दर्शन करवितों ! ज्याच्यायोगें तुह्मी निरंजन स्वरूपाप्रत आलांत ती तूर्येची तूर्या होय व हींच माझी आत्माचर्चा ! मी तुमच्यांत अभिन्नपणें आहे, बोध प्रगट करतों व अभिन्न वस्तूचा साक्षात्कार करून देऊन आत्मप्रचीतिसुख देतों ! सद्गुरूचें वर्णन करतां करतां अभिन्नपणें असणारें परब्रह्म हाच सद्गुरु असें दर्शविण्यांत

आले आहे ! सद्गुरु साक्षात्काराचे मार्गांतील अनुभव अचुक प्राप्त करून देतात व भ्रमाची स्थळें सांगून तेयून विज्ञानप्रभादीपानें मुक्कामावर नेतात.

तूर्यारूपें जाण प्रभा हे निःसीम ।
तया परता राम असे बापा ॥
ज्ञानदेवा गुज दाविलें गुरुनें ।
मनें अनन्यें कल्पिताची ॥

—ज्ञानेश्वर

परेहुनि परते घर । तेथें राहूं निरंतर ॥
सर्व सत्ता आली हातां । नामयाचा खेचर दाता ॥

—नामदेव

## सप्त ज्ञान-भूमिका

सूर्योदयापासून निद्रासुख घेईपर्यंत या कष्टमय संसारांत सुखाची प्राप्ति होण्याच्या इच्छेनें मनुष्य एकसारखे प्रयत्न करीत असतो, पण रात्रीं जमीनीस पाठ लागल्यावर क्षणभर चित्तांत विचार करूं लागला तर त्यास असें आढळून येतें कीं, सुखाकरितां आपण रात्रं-दिवस इतके श्रम करतों पण सुखाचा—आनंदाचा लेशहि आपणास मिळत नाहीं. बाह्य वस्तूपासून सुखाची अपेक्षा आपण करतों यांत कांहीं चूक खास आहे. खरें सुख हें आपल्या ठिकाणींच असलें पाहिजे. तें कसें मिळेल, खरा आनंद कसा प्राप्त होईल याचीच तळमळ त्यास मग लागून राहते. अशा तऱ्हेची सद्भावना, सदिच्छा व आत्मसुखाचे प्राप्तीची तळमळ उत्पन्न झाली म्हणजे सत्कर्में होऊं लागतात व त्या पुण्याईनें, कालांतरानें भगवद्भक्तीच्या प्रकर्षामुळें सद्-

गुरूची भेट होते. त्यानें ज्ञानोपदेश केल्यावर स्वस्वरूपाचा साक्षात्कार होतो. तसा तो झाला म्हणजे पुढें महावाक्याचा साक्षात्कार होऊन आपलें सर्व व्यापित्व उमजून परब्रह्माशीं सामरस्य होते! ज्ञानमार्गांतील या ज्या प्रथमपासूनच्या निरनिराळ्या अवस्था त्यास ज्ञानभूमिका म्हणतात. या सात मानल्या आहेत ह्मणून त्यास **सप्त ज्ञानभूमिका** असें म्हणतात. साधकाची अभ्यासांत दिशाभूल होऊं नये व आपल्या ज्ञानाबद्दल भलताच अहंकार उत्पन्न होऊं नये म्हणून ह्याचें विवेचन करण्यांत येत आहे. सध्यां खरें ज्ञान–खरा साक्षात्कार- बाजूस राहून जरा कोठें शब्दज्ञान झालें कीं, लगेच अहंकार उत्पन्न होतो व ज्ञानाच्या गोष्टी सांगून या दुसऱ्यास उपदेशण्याचा आपणास अधिकार उत्पन्न करून घेण्याकडे प्रवृत्ति असतें हें आपण पाहतों. अज्ञजनानां आपण अमुक अमुक भूमिकेवर आहोंत अगर अमुक पायरीवर आहोंत व मोठें जीवन्मुक्त आहोंत असें सांगण्याकडे कित्येक ज्ञानी म्हणविणारांची प्रवृत्ति असलेली आढळून येते. पुढें जें सप्तभूमिकेचें विवरण करण्यांत येत आहे तें वाचून सर्वांनीं आत्मनिरीक्षण करावें व आपण या ज्ञानसोपानाचें कोणत्या पायरीवर--भूमिकेवर आहोंत हें निरखून पहावें! तसेंच आपण खरोखर ह्या सोपानपंथाचे मूळ पायरीपाशीं तरी आहोंत काय? किंवा उलट खालीं खालीं दुसऱ्याच पंथानें चाललों आहोंत याचें प्रत्यंतर पहावें. आत्मनिरीक्षणानें भलताच अनुभव आल्यास चित्तांतील अहंकाराचा मल श्रवणमनन निदिध्यासानें धुऊन काढावा, ईश्वरास कोमल अंतःकरणानें भजावें, त्याचें चरणकमलाचें ठिकाणीं लीन व्हावें व ह्या दिव्य आत्मज्ञानरूपी मार्ग आक्रमण्यास चांगल्या वाटाड्याची–साक्षात्कारी सद्गुरूची--जोड देण्याबद्दल त्यास आळवावें. म्हणजे तो दयाघन प्रकाशरूप परमात्मा स्वस्वरूपाप्रत खास नेईल!

आतां या सप्तभूमिकेचें थोडक्यांत वर्णन करूं. त्यावरून अभ्यासाचें दृष्टीनें वृत्तिलयाच्या चढत्या पायऱ्या, अंतर्मुख वृत्तिपासून संपूर्ण वृत्तिलय होईपर्यंत, कसकशा आहेत हें दिसून येईल. तसेंच ब्रह्मवेत्त्यापासून ब्रह्मविद्वरिष्ठ या बहुमान संज्ञक पदऱ्या खरोखर कोणास लावतां येतील हेंहि कळून येईल.

( १ ) **शुभेच्छाः**— प्रथम भूमिकेस शुभेच्छा असें म्हणतात. अंतःकरणांत शुभ इच्छा—सद्भावना उत्पन्न होणें हें ह्या भूमिकेचें लक्षण आहे. संसार हा असार आहे, हा प्रपंच अशाश्वत आहे, अशा तऱ्हेचा अनुताप होतो व कांहीं स्वहित करावें अशी बुद्धि उत्पन्न होते. दुःखमय संसारांत सुखाची इच्छा करून आपण आयुष्य व्यर्थ दवडलें, आतां तरी राहिलेले आयुष्याची व्यर्थ हानी न करितां सत्समागम करावा, शास्त्रश्रवण करावें, परमात्म्यास शरण जाऊन त्याचें भक्तियुक्त अंतःकरणानें भजन पूजन करावें अशी बुद्धि उत्पन्न होते. प्रपंचास मन विटून जाते व चित्तास विक्षेप उत्पन्न होतो. म्हणून ह्या भूमिकेस कित्येक **विक्षेपता** असें म्हणतात. चित्ताची व्यग्रता झाल्यामुळें व सुखाचे शोधार्थ मनाची धाव असल्यामुळें मौढ्य अवस्था येते. अखण्डसुखप्राप्ति जेणेंकरून प्राप्त होईल तदनुरोधानें नित्य भाक्तियुक्त अंतःकरणानें शास्त्रश्रवण विशेषतः अद्वैत श्रवणाकडें लक्ष वेधते. थोडक्यांत बोलावयाचें ह्मणजे मुमुक्षुत्व वृत्ति उत्पन्न होते

( २ ) **विचारणाः**—दुसऱ्या भूमिकेस विचारणा असें ह्मणतात. अन्तःकरणांत सद्भावना उत्पन्न झाल्यावर विचारशक्ति उत्पन्न होते. आपण जें जें वाचतों, पहातों व ऐकतों याचा काय अर्थ आहे ? यांतील रहस्य काय असावें ? इकडे लक्ष लागतें. अर्थांतर पाहून त्याच विषयाचें रहस्य कळलें म्हणजे तो कृतींत

उतरावयास लागतो. कर्माचरण शुद्ध व सात्विक करण्याकडे प्रवृत्ति होते. सात्विक आहार विहार घडतात, ईश्वराराधना वैराग्यपूर्ण व प्रेमळ अन्तःकरणानें होते. वृत्तीमध्यें जें चांचल्य असतें तें हळूं हळूं नाहींसें होऊन वृत्ति स्थित होऊं लागते. ह्या भूमिकेस **गतायाता** असेंहि म्हणतात. मनन व निदिध्यासानें वृत्ति स्थिर होत आहे अशी प्रचीति येऊं लागते, मूककुमारीप्रमाणें ही मूक अवस्था आहे. ध्यानास अगर जपास बसले म्हणजे क्षणभर वृत्ति शांत होते असा अनुभव येतो. अस्थिर मन थोडें स्थिर होतें. विचारानें–मननानें निदिध्यासानें व अभ्यासानें बाह्यवृत्ति हळूं हळूं नाहींशी होऊन वृत्ति अन्तर्मुख होऊं लागते ! वृत्ति बाहेर जाणें व आंत येणें सुरूं असते ह्मणूनच यास गतायाता असें म्हणतात.

( ३ ) **तनुमानसाः**—तिसऱ्या भूमिकेस तनुमानसा ह्मणतात. मनोलयाचे निरनिराळ्या प्रकारचे अभ्यासामुळें अगर योगाभ्यासामुळें इंद्रियें माघारी मुरडावी ह्मणजे वृत्ति संपूर्ण अंतर्मुख बनवून हृदयाकाशांत ती न्यावयाची. हृत्कमलाचें ठिकाणीं ब्रह्मधारणा धरावी ह्मणजे चित्त तन्मय तदाकार होतें. तें अखंड आनंदांत मग्न झाल्याचा अनुभव येतो. हृदयाकाशांत आत्मसूर्याचें–स्वस्वरूपाचें दर्शन झालें म्हणजे त्या चमत्कृतीजन्य आनन्दाचें काय वर्णन करावें ! यास विस्मयानंद म्हणतात ! त्या आनन्दांत वृत्ति तटस्थ होऊन स्तब्ध होते. ही ताटस्थावता आहे. ही भूमिका साक्षात्कार देणारी आहे. हीस **संश्लीनता** असेंहि ह्मणतात. आत्मप्रचीतीनें वृत्ति विश्राम पावते व नेहमीं सुखांत मग्न असते. समुद्र खवळल्यावर तळांतून जशा लाटा वर येतात तद्वतच स्वानन्दसिंधूच्या लहरींतून वृत्ति उत्थान दशेसप्राप्त होते. ही परिपक्वदशा साक्षात्कार घडून देणारी व विश्रांति प्राप्त

करून देणारी आहे. वृत्ति या भूमिकेमध्यें उन्मनीची प्रचीति देऊन पुढचे भूमिकेवर जाते ! योगाचेदृष्टीनें बोलावयाचें ह्मणजे हीस संप्रज्ञात किंवा सविकल्प समाधि म्हणतात.

( ४ ) **सत्वापत्तिः**—चवथी भूमिका सत्वापत्ति ही होय ! यांत सत्वगुण उपरमोन म्हणजे मुरून प्रचीति येते व स्वस्वरूपसुखाची प्राप्ती होते. सद्गुरूचे कृपाप्रसादानेंच या भूमिकेवर आरूढ होता येते. यापुढें भूमिका अशी नाहींच. कारण स्वस्वरूपाची ओळख झाल्यावर त्यापुढची पायरी कोणती असणार ? या भूमिकेस **सुलीनता** असेंहि म्हणतात. कारण ह्यांत वृत्ति पूर्णपणें लीन होते, स्वस्वरूपाशीं समरस होते व स्वानन्दसागराचे डोहांत मुरून जाते ! स्वरूपार्णवांत विरोन गेलेली वृत्ति पुनः उत्त्थानदशेस येत नाहीं. समुद्राच्या एकाद्या लाटेचा आकार कित्येकवेळीं मत्स्याकृती दिसला तरी तो मत्स्य म्हणून धरतां येणार नाहीं त्याप्रमाणें वृत्ति ही वृत्तिरूप न राहता परब्रह्मीं समरस झाल्यावर निराळी काढतां येणार नाहीं. ! ही खरोखर भूमिका नाहीं पण भूमिका ह्मणणें तर ही निर्दोष भूमिका आहे असें म्हणतां येईल. ह्या निर्वाण भूमिकेवर दुसरी पायरी नाहीं. यापुढें आणखी तीन भूमिका ह्मणून दिल्या आहेत. पण त्या देहप्रारब्धरूढीनें सत्वबळानें रूढ झाल्या आहेत. त्या निराळ्या नाहींत. देहप्रारब्ध भोगावयाचे आहे तोपर्यंत लोकदृष्टीनें व्यवहार करण्याकरितां त्याचें वर्णन आहे. योगाचे दृष्टीनें असंप्रज्ञात अगर निर्विकल्प समाधी अवस्था ही होय ! या भूमिकेवर स्थित असणारास **ब्रह्मवेत्ता** असें म्हणतात. ही नित्य बोधयुक्त भूमिका आहे. यामध्यें सद्गुरुकृपेनें अनुभवामृताचें पान सतत होतें. चारी देहाचा संस्कार ज्ञानाग्नीनें सारला म्हणजे ह्या चौथ्या भूमिकेवर—साक्षात्काराचें मंदीरांत स्थित होता येतें !

(५) **असंसक्तः**—पांचवी असंसक्त नांवाची भूमिका आहे. ज्ञानी स्वसुखाच्या निद्रेचा उपभोग घेऊन देहप्रारब्ध भोगण्यास पुनः जागृतीवर येतो. हटयोगी **समाधींतून** उत्थानदशेस येतो. पहिल्यां ३ भूमिका ह्यास जागृतावस्था मानली तर चौथ्या सत्वापत्ती या भूमिकेस स्वप्नावस्था मानावी व या अवस्थेस स्वप्नयुक्तनिद्रा किंवा जागृतियुक्तनिद्रा असेंहि मानणेस हरकत नाहीं. या भूमिकेवर पोंचलेल्या ज्ञान्यास **ब्रह्मविद्वर** अशी संज्ञा आहे.

(६) **पदार्थभाविनीः**-सहाव्या अवस्थेस पदार्थभाविनी असें म्हणतात. झोपाळू मनुष्य जसा नेहमीं झोपेंत असतो तद्वत् या अवस्थेंत असणारा अवस्थाविहीन असतो. परब्रह्मपदाची प्राप्ती झाल्यामुळें त्या आनंदांत तो सदैव राहतो. स्वतः जागृतावस्थेस प्राप्त होत नाहीं. केव्हां तरी सापेक्षानें त्या अवस्थेप्रत येतो. स्वानंदरूप उन्मनींत स्वतः आनंदांत बुडलेला असतो. महान् भगवत्भक्त **जडभरत** याच भूमिकेवर होते ! या अवस्थेप्रत पोंचलेले सिद्ध, निर्विकल्प निष्कलंक अशी निर्वाण बैठक घेतात ! हीस गाढानिद्रा किंवा सुखनिद्रा ह्मणणेस हरकत नाहीं. ही स्वतः योगमुद्रा सोडीत नाहीं. ह्या भूमिकेवर आरूढ होणारे सिद्धांस **ब्रह्मविद्वरीयान्** अशी बहुमानाची पदवी मिळते !

(७) **तूर्यगाः**— निर्वाण सोपानाची शेवटची पायरी-भूमिका ह्मणजे तूर्यगा ही होय ! परब्रम्हाशीं संपूर्ण विरालेली सोऽहं वृत्ति पुनः केव्हांही व्युत्थान दशेस येत नाहीं. हींत स्वव्युत्थानहि नाहीं व परव्युत्थानही नाहीं. ह्या अवस्थेंत असलेला योगीराज सचेतन असून अचेतन असतो. देह कोणत्याहि अवस्थेंत असो त्यास त्याची दादहि नसते ! वृक्ष सचेतन असतो पण त्यास जसें अंतःकरण नसतें, स्मरण वगैरे कांहीहि विकार असत नाहींत त्याप्रमाणें याचें

ठिकाणीं कोणचीहि वृत्ति असत नाहीं तर तो निर्गुण निर्विकल्प स्थितींत असतो ! ही शुद्धसत्वगुणातींत व महदाश्चर्यकारी भूमिका आहे ! भगवान् **ऋषभदेव** या भूमिकेवर होते. वाह्य काष्टवत् स्वभाव पण अंतरीं महास्थिती दृढावल्यामुळें ते महानिर्वाण अवस्थेंत होते ! या भूमिकाधिष्ठितांचे व्यवहार लौकीकदृष्टया चमत्कृतिजन्य भासतात. मनांत कांहीं हेतू नसतां एकादा मनुष्य अरण्यांत जसा इकडे तिकडे भटकतो त्याप्रमाणें यांचा संचार झाल्यास तो निर्हेतुक होतो. फिरतांना झुडुपाचे जाळीस जटा अडकून गतीस अटकाव झाल्यास तेथेंच तो थांबतो, वाटेंत पेटलेल्या अग्नीचे ओंडक्यानें पाय दग्ध झाला तरी त्याची जाणीव त्याचें ठिकाणीं असत नाहीं, कोठल्याहि हत्यारानें देह कापला गेला तरी सुद्धां त्याचें ज्ञान होत नाहीं अशी ही महाउन्मादकारी अवस्था आहे ! ह्या अवस्थेंतील ज्ञानी विधिनिषे—धांनींत असतो ! त्यांस **ब्रह्मविद्वरिष्ठ** ह्या सर्व श्रेष्ठ नांवानें संबोधिलें जातें !

—०—

# उपसंहार

इच्छितस्थळीं गेल्यावर मार्ग खुंटतो. राज्याचा उपभोग घ्यावयाचा ह्मणजे राजवाड्यांतील प्राकारांचे आंत जातां जातां शेवटीं एकछत्री सिंहासनावर अधिष्ठित झालें म्हणजे पुढें कांहीं रहात नाहीं. मिळवावयाचें तें मिळविल्यावर व जाणावयाचें तें जाणल्यावर पुढें जाणावयाचें असें कांहीं रहात नाहीं तर केवळ आनंदाचा उपभोगच रहातो. हिमालयाचें शुभ्र व प्रकाशित अशा उत्तुंग शिखरावर महत् प्रयासानें आरोहण करून तेजोमय महेशाचें दर्शन घेतल्यावर आनंदसागरांत क्रीडा करीत असतां ज्या पथावरून आपण आलों व वाटेंत जे जे अनुभव आपण घेतले त्याचें स्मरण करण्यांत एक प्रकारच्या

आनंदाचा उपभोग घेत असतों ! त्याप्रमाणें या प्रकाशमय पंथाच्या दीपांचे प्रकाशांत काय काय रम्य स्थलांचें दर्शन लाभलें तें पाहण्यांतहि एक प्रकारची मौज आहे. ह्मणून विहंगमदृष्टीनें उपसंहारात्मक चार शद्ब लिहिण्याचें योजिलें आहे.

युगधर्माप्रमाणें कलियुगांत मनुष्याच्या मनाचें अत्यंत चांचल्य असल्यामुळें ब्रह्मज्ञान होणें कठीण पडतें. ईश्वरानें मनुष्याचीं इंद्रियें स्वभावतः बाह्योन्मुख केलीं आहेत. तीं अंतर्मुख केल्याशिवाय स्वस्वरूपज्ञान होणार नाहीं व खरें सुख मिळणार नाहीं. इंद्रियांचें आधीन झाल्यावर स्वधर्माचें पालन तरी कसें होणार ! निःश्रेयस व अभ्युदय प्राप्ति स्वस्वरूप जाणल्याशिवाय होणार नाहीं. ह्मणून **स्व-धर्माचें** पालन जीवांचे हातून व्हावें याकरितां ईश्वर कृपाळू अंतःकरणानें साधुसंतांचें रूपानें अंशांशरूपानें पृथ्वीवर अवतार घेत असतो ! साधुसंत अगर सत्पुरुष म्हणा यच्चयावत् जीवांनां अखंड सुखप्राप्ति कशी करून घेतां येईल याचा मार्ग सतत दाखवीत असतात. लोकांनां अनुकरणीय उदाहरण व्हावें म्हणून ईश्वर साधुसंतांकडूनहि प्रथम आश्रमधर्माप्रमाणें कर्मे करवून घेतो, ईशप्राप्तीचें साधन म्हणून कडक तपश्चर्या करवून घेतो व मग त्यांना साक्षात्कारी बनवितो. अशाप्रकारें ज्ञान विज्ञान संपन्न झाल्यावर ते जगास आपण गेलेल्या साक्षात्काराचे मार्गाचा उपदेश करितात. जसजसें देहप्रारब्ध असेल तदनुरूप त्यांचेकडून थोडी अगर प्रचंड ग्रंथ रचना होते. सर्वांस ज्ञान प्राप्त झाल्याकारणानें सर्वांचें अनुभव सारखेच असणार त्यामुळें शेवटची अवस्था व ती प्राप्त करून घेण्याचे मार्गहि सारखेच असणार. आतां कोणी आपआपल्या ग्रंथांत या मार्गाचें क्रमवार वर्णन करतात तर कोणी मधील टप्पे गाळून थोडक्यांत शेवट गाठतात.

सध्याच्या एकंदर परिस्थितीमुळें, नाना मतांच्या गलबल्यामुळें व

विषयोन्मुखवृत्ति झाल्यामुळें साधुसंतांच्या वचनांतील रहस्य जाणण्याकडे अगदीं दुर्लक्ष्य होतें. त्याचा परिणाम असा दिसतो कीं दंभाचें व अज्ञानाचें प्राबल्य वाढतें, खरें ज्ञान बाजूस रहातें आणि समाधान नांदावयाचें ऐवजीं जीव सुखदु:खाचें चक्रांत सतत फिरतांनां दृष्टोत्पत्तीस येतात ! त्यांची ही स्थिति ओळखून साधुसंत त्यांनां योग्य मार्ग दाखविण्याकरितां झटतात.

सत्पुरुष जे जे ग्रंथ लोककल्याणार्थ लिहित असतात त्यांमध्यें अगदीं खालच्या पायरीपासून वरच्या पायरीपर्यंत जे जे लोक असतील त्या सर्वांनां त्यांतून कांहीं घेतां येते. त्यांत लिहिण्याची खुबी ही असते कीं कित्येक गोष्टी उघड स्पष्ट लिहिल्या जातात आणि कित्येकांचा वाच्यार्थ निराळा व लक्षार्थ निराळा असतो. सर्व सामान्य लोकांकरितां वाच्यार्थ असतो व ग्रंथामध्यें खोल शिरून त्यांशीं तन्मय होणाऱ्याकरितां लक्षार्थ असतो. तो घेण्याची ताकद बहुतेकांत नसल्यामुळें वाच्यार्थाकडेच सर्वांची दृष्टि असणें साहजिक आहे. त्यांतहि अंत:करणप्रवृत्ति ज्या वृत्तीची—सत्व, रज अगर तम—असेल त्या मानानें विषयांचें ग्रहण होतें. सत्पुरुषांचें लक्ष ऐहिक सुखापेक्षां शाश्वत सुखाकडेच जास्त असते. तेव्हां त्यांच्या ग्रंथांमधून तो विषय मुख्यत्वेंकरून असतो.

मायाभ्रमांत गुरफटल्यामुळें जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडून जीवास अखंड दु:ख भोगावें लागतें; तरी त्यास आध्यात्मिक उन्नतीचा मार्ग दाखवावा, विज्ञानदशा प्राप्त करून देऊन स्वात्मराज्यावर त्याची स्थापना करावी व निरतिशयानंद सुखाचा उपभोग त्यास घेता यावा याच मुख्य उद्देशानें ग्रंथरचना होत असते. आर्यांचें मूळ वेदांतशास्त्र जीं उपनिषदें—तदनुरूप आत्मप्रचीति अनुभविलेल्यांच्या ग्रंथामध्यें आत्मनिवेदनाशिवाय दुसरें काय असणार ! जिकडे तिकडे स्वात्मा-

नुभवच असणार ! साक्षात्कार व तो प्राप्त करून घेण्याच्या अभ्यासाचा उपदेश हाच जेथें तेथें पहावयास सापडेल यांत नवल काय ?

साधुसत्पुरुषांनीं शास्त्रप्रचीति प्रमाणें स्वस्वरूपाचे अनुभव घेतले ते अर्थात् प्रकाशरूपाचें आहेत. श्रुतिमध्यें देवयानपंथ असें ज्यास ह्मटलें आहे तो प्रकाशमय मार्ग आहे. देव या शब्दाचा अर्थ प्रकाश व यान ह्मणजे मार्ग. आत्मसाक्षात्काराचा मार्ग हा प्रकाशमय आहे !

या मार्गाला लागण्यास व शेवटीं इच्छित स्थळ गाठण्यास सद्गुरूंची अत्यंत जरूरी आहे. आत्मसाक्षात्कारी पुरुषांपैकीं सर्वच विभूति साधकास उपयोगीं पडतात असें नाहीं. श्रीमद्भागवतांत सांगितल्याप्रमाणें शाब्दे परेच निष्णातम् । असा सद्गुरु पाहिजे. साधकास अशा सद्गुरु पासूनच उपयोग होतो. सद्गुरू शब्दज्ञानानें वस्तुज्ञान बुद्धीस पटवितात. आपल्या अध्यात्मतेजामुळें दृष्टिक्षेपानें, शब्दानें, अगर स्पर्शानें सच्छिष्याचें अंतःकरणांत शिरून त्याचें बुद्धितत्त्वास चालना देतात व तात्काल स्वस्वरूप साक्षात्कार प्राप्त करून देतात ! अशा सद्गुरूंची थोरवी वर्णन करणें अशक्य आहे. याच्याहि पुढें जाऊन विचार केला तर असें दिसून येईल कीं गगनस्वरूप असें परब्रम्हच खरा सद्गुरू होय ! ज्ञानेश्वर महाराजांनीं आपल्या **अमृतानुभ** या नांवाच्या ग्रंथांत या तत्वाचा स्पष्टपणें उल्लेख केला आहे.

**आकाश हें सावेव । न वंधे आकाशाची हाव ॥**
**ऐसे कोणीएक भरीव । आकाश जो ॥**

— ज्ञानेश्वर



हें ज्ञान ज्ञानचक्षूनें प्राप्त होणार आहे. इंद्रियांच्या स्वाभाविक

धर्मानुसार जें ज्ञान प्राप्त होतें त्याच्यापेक्षां अगोचर असें विशिष्ट ज्ञान ज्यावेळीं त्या त्या इंद्रियांचे ठिकाणीं प्रत्ययास येतें त्यावेळीं अतींद्रिय-ज्ञान प्राप्त झालें आहे असें समजावें. याच ज्ञानाच्यायोगें परब्रह्माचीं स्वरूपें, जीं प्रकाश व ज्यास अनुहतध्वनी असें ह्मणतात असें दश-विध नाद, यांचा साक्षात्कार होतो! हें ज्ञान प्राप्त करून घेण्यास मनोलयाचे विशिष्ट प्रकारचे अभ्यास करावयास पाहिजेत. या अभ्यासांपैकीं नामस्मरण व परमेश्वराच्या सगुणमूर्तीचें ध्यान, हे अभ्यास सर्वांस करतां येण्याजोगे, सोपे व सुसाध्य असें आहेत. नामस्मरण हें परा, पश्यंती, मध्यमा वैखरी या वाणीपैकीं निदान पश्यंति वाणींत म्हणजे मनांतल्या मनांत करण्याचा अभ्यास करावा. त्यायोगें चित्ताची एकाग्रता होत जाते व पुढें परावाचेंमध्यें होणाऱ्या स्फुरणाचें ज्ञान होतें. परावाचेंत नामस्मरण कसें होतें हा अनुभवाचा विषय आहे. यायोगें मनाचा संपूर्ण लय होऊन परेच्या पलीकडील अशा अंगुष्ठमात्र आत्म्याचें दर्शन होतें! परमेश्वराच्या सगुण मूर्तीचें ध्यान करावयाचें तें प्रथम त्याच्या चरणकमलांचेंच ध्यान करावें. हृदयामध्यें चरणकमलाचें ध्यान जसजसें स्थिर होत जाईल तसतसा मनोलय होऊं लागेल. चित्त एकाग्र झालें म्हणजे चरणकमल चैतन्य युक्त व तेजस्वी दिसूं लागतील! ही अवस्था प्राप्त होतांच पायापासून वर एकेक अवयवाचें ध्यान करीत जावें व शेवटीं हास्यमुखावर दृष्टि स्थिर करावी म्हणजे वृत्ति तन्मय तदाकार होईल. ध्येय, ध्याता व ध्यान ही त्रिपुटी नाहींशीं होईल. अशाप्रकारें मनाचा संपूर्ण लय झाल्यावर अंगुष्ठमात्र आत्म्याचा साक्षात्कार होईल! जागृत, स्वप्न व सुषुप्ति यांचे क्रमवार लय कसें होतात ही प्रत्येकाच्या नित्य परि-चयाची गोष्ट आहे. चवथी अवस्था जी तुर्या ही ज्ञानस्वरूपी आहे. तिच्यामध्यें ब्रह्मकार्य व मायाकार्य असा दोन्हीं कार्यांचें ज्ञान होतें. स्थूल

सूक्ष्म, कारण व महाकारण असें पिंडाचे चार देह आहेत. मनोलय होऊं लागला ह्मणजे एकेका देहाच्या लयाचें ज्ञान कसें होतें तें अनुभवण्यास मिळेल. सरळ ताठ बसून नासिकाग्राकडे दृष्टी ठेऊन जप करणें, श्वासोश्वासावर लक्ष ठेवून नामस्मरण करणें, किंवा कानांत बोटें घालून व डोळ्यावर बोटें ठेवून ऐकूं येईल तें ऐकणें व दिसेल तें पाहाणें वगैरे अभ्यासाचे प्रकार आहेत. गुरुकृपेनें हे साधले तर ते शीघ्र फलदायी आहेत. नाहींतर ते रुक्ष वाटण्याचा संभव असल्यामुळें प्रथम त्यांचा अभ्यास करूं नये. मन हें संकल्पविकल्पात्मक असल्यामुळें जलतरंगाप्रमाणें त्याचें ठिकाणीं असंख्य वृत्ति उद्भतात व लय पावतात. या वृत्ति कशा उठतात व लय कशा पावतात हें पाहाण्याचा अभ्यास करणें कठीण असलें तरी मनोलयाकरितां या अभ्यासाचीहि जरूरी आहे वृत्तीचा उद्भव पाहूं लागलों ह्मणजे एकांतून दुसरी वृत्ति कशी उठते हे पाहतां पाहतां वृत्तीच्या मूळ उगमापर्यंत जातां येते. वृत्तीचा उद्भव कळला ह्मणजे तिचा लयहि कळतो. पुढें आपलें साक्षीपण जाणून घेतां येते. हेंच आपलें स्वरूप होय. ह्या अवस्थेंत अंगुष्ठमात्र आत्म्याचें दर्शन होतें !

मनोलयाचे पुष्कळ अभ्यास दिले आहेत त्यापैकीं कोणत्याहि अभ्यासाचें वेळीं प्रथम मन अत्यंत चंचल असतें. त्यावेळीं अष्टधा प्रकृतीचा अंधार असतो. चित्ताची एकाग्रता जसजशी होत जाईल त्याप्रमाणें ध्यानावस्थेंत डोळ्यापुढें श्वेत, पीत, आरक्तादि रंग दिसूं लागतात. चित्त कांहीं काल स्थिर झाल्यावर नील बिंदू दिसूं लागतो. डोळे उघडे असतांना सुद्धां त्याचें दर्शन होतें. हें झाल्यावर अतींद्रिय ज्ञान उत्पन्न होत आहे असें समजावें. यांस अणुब्रह्म असें म्हणतात. देवयान पंथावरील ही पहिली पायरी होय.

अभ्यासाचे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत त्यामध्यें चार

स्थिती, अवस्था अगर पायऱ्या आहेत असें दिसून येईल. प्रणवाच्या अकार, उकार, मकार व अर्धमात्रा या चार मात्रा सांगितल्या आहेत त्या याच होत. या मात्राचा क्रमवार लय होतो असें मागें सांगितलें आहे. बिंदू दर्शनानंतर ब्रह्माची प्रकाशमय रूपें प्रथम, लहान मोठ्या मोत्यांच्या आकाराची सुट्या रूपांत दिसतात. दुसऱ्या पायरीवर गेल्यावर अगर दुसऱ्या मात्रेमध्यें अनेक तारका, नक्षत्रपुंज, तिळाच्या झाडांचीं फुलें वाऱ्यानें डोलतांनां दिसतात तसें दृश्य, इंद्रनील ज्योति, राघूचे डोळ्याप्रमाणें तेज वगैरे तेजोरूपें दिसतात. किंवा दंडाकार अगर गुंडाळलेलीं तेजें निरनिराळ्या आकारांचीं दिसतात ! तिसऱ्या अवस्थेंत विजांची चमक, प्रकाशाच्या ज्वाळा, चक्रें किंवा अर्धचंद्राकार तेजें दिसतात ! चवथ्या अवस्थेंत सूक्ष्म रूपांत असंख्य चंद्र सूर्यांचीं रूपें दिसतात, मोरांच्या पंखाप्रमाणें नीलवर्णाचीं तेजेंहि दृष्टिगोचर होतात !

शेवटीं पिंडाच्या चारी देहांचा स्वामी अगर साक्षी जो आत्मा त्याचा साक्षात्कार होतो ! हा ज्या अवस्थेंत होतो तीस उन्मनी अवस्था ह्मणतात. आत्म्याचें स्वरूप अंगुष्ठप्रमाण आहे. श्रुतिमध्येंहि असेंच सांगितलें आहे. ह्या सूर्यबिंबरूप तेजोमय आत्म्याचा साक्षात्कार झाला ह्मणजे, त्याची जाणीव सर्वत्र व दशेंद्रियांचे प्रत्येक व्यापारांत होतें अगर नाहीं हें पाहावें. तसेंच डोळे उघडे ठेवून अगर मिटल्यावर कोणच्याहि स्थितींत हा दृग्गोचर होतो अगर नाहीं हें पहावें. अशा प्रकारें या अविनाशी तत्त्वाची ओळख पटल्यावर हेंच आपलें स्वस्वरूप आहे असें समजावें !

' पिंडीं ते ब्रह्मांडीं ' या तत्वानुरूप पिंड देहाप्रमाणें ब्रम्हांडाचेहि विराट, हिरण्यगर्भ, अव्याकृत व मूळप्रकृती असें चार देह आहेत. ह्या ब्रह्मांडाच्या चवार मात्रा होत. यास अवस्था ह्मणण्यासही

हरकत नाहीं. साक्षात्काराचे दृष्टीनें अंगुष्ठमात्र आत्मा हीच ब्रह्मांडाची अकार मात्रा धरली आहे. हा चित्सूर्य होय ! याचें दर्शनानंतर चितूचंद्रमंडळांचें दर्शन होतें. चंद्रमंडळ कला व तारकासह स्पष्ट दृग्गोचर होते. अभ्यासानें जसजसा प्राणाचा व मनाचा लय होत जाईल तसतसे हे अनुभव उपभोगण्यास मिळतील. हा पितृलोक होय. यांच्या पुढें ज्ञान्याशिवाय गती नाहीं. ह्यास डोळीयाचा डोळा असें ह्मणतात. तो उघडल्यावर वस्तुज्ञान होतें. चंद्रमंडळानंतर अग्निमंडळाचें ज्ञान होतें व पुढें मूलप्रकृतीचें **अणोरणियान्** अशा स्वरूपांत दर्शन होतें. पिंडाचे चारीदेहाचे निरासानंतर जसा आत्म्याचा साक्षात्कार होतो तद्वत् ब्रह्मांडाचे चारीदेहाचे निरासानंतर त्या देहाचा साक्षी जो सर्वत्र व्यापी असा प्रकाशरूप परमात्मा त्याचा साक्षात्कार होतो ! हाच सर्व जगाचा तात व श्रुतिसंमत ईश्वर होय ! या परमात्म स्वरूपाचें वर्णन एका शब्दांत करावयाचें ह्मणचे हा प्रकाशाचा सागर होय !

**तैसा आत्मराज तव । ज्ञानमात्रचि भरीव ॥**

—ज्ञानेश्वर

ज्ञानेश्वरांनीं एका दृष्टांतांत याचें बरोबर वर्णन केलें आहे.

**कीं विश्वचि वेगळ । वाढे जें सूर्यमंडळ ॥**
**तें तेजमय निखिळ । तेचि होये ॥**
**कां तेजांतरें नाटोपे । कोणे तये न शिंपे ॥**
**ने उपमेचे जाउपे ॥ सूर्येचि होय ॥**

— ज्ञानेश्वर

निरंजन गगनस्वरूप परब्रह्माचें हें सगुणरूप आहे हें

थोड्या विचारांति ध्यानीं येईल या सगुणरूपाचें ध्यान सहस्रदल कमलांत करावें. या स्वयंसिद्ध, सच्चिदानंद स्वरूपीं ईश्वराच्या दर्शनाचे सुख हवे तेव्हां उपभोगावें.

तैसा आत्मा सच्चिदानंदु । आपणया आपण सिध्दु ॥
येऱ्हवी अडोळिया डोळा । शिवदर्शनाचा सोहळा ॥
भोगिजे भलते वेळा । भलतेणें ॥

— ज्ञानेश्वर

या सगुणरूपाचें अखंड धारणेनें वृत्ति तन्मय तदाकार होते व शेवटीं गगनस्वरूपांत लीन होते. साधुसंतांनीं या सगुणरूपास आपल्या उपास्य दैवतांचीं नामें दिलीं आहेत. प्रथम आत्म्याचा साक्षात्कार होईपर्यंत आत्म्यासच उपास्य दैवतांचें नावांनें संबोधिलें जातें. पुढें परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यावरसुद्धां जगाच्या कल्याणा करितां व उपासना मार्ग सुटूं नये म्हणून परमात्म्यासच सगुण देव समजून त्याचें भजनपूजन करण्यांत येतें. उच्च अवस्था प्राप्त झाल्यावर लक्ष्यार्थानें सर्व व्यापार सुरूं असतात. साधक जसा साक्षात्कार मार्गाचा अधिकारी होईल तसतसा त्यानें उच्च वातावरणांत विहार करून मूळ स्वरूपाकडे अनुसंधान ठेवून ही श्रेष्ठ उपासना चालविली पाहिजे. परब्रम्ह स्वरूपीं लीन होणें हा शेवट आहे. हीं शेवटची गती आहे हें नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे.

पिंड ब्रम्हांडाचें देहांचें निरसन झाल्यावर मग निरंजन स्वरूपाचा साक्षात्कार होतो ह्मणून

देवास धुंडीत जावें । ब्रह्मांडापरतें ॥

असें म्हटले आहे. पिंडाच्या चार मात्रा व ब्रम्हांडाच्या चार

मात्रा, अगर व्यक्त व अव्यक्त ब्रह्माच्या मात्रांचे लयानंतर निर्गुण निरंजन स्वरूप आहे. ही गोष्ट संशय राहूं नये म्हणून पुष्कळ वेळ स्पष्टपणें सांगितली आहे.

देही आत्मा देह अनात्मा । याहून पर तो परमात्मा ॥
निरंजनास उपमा । असेचिना ॥
आधीं देखिला देहधारी । मग पहावें जगदांतरी ॥
तयाचेनिया उपरी । परब्रह्म पावे ॥

--रामदास

शिवाचें दर्शन झाल्यावर शक्तीचे दर्शन आपोआप होतें. शिव शक्ति अभिन्नपणें असतात. दोघांस परब्रह्माचे अधिष्ठान आहे प्रकाशरूप परमात्म्याचें दर्शनाबरोबर परब्रह्मस्वरूपाच्या नाद रूपाचा साक्षात्कार होतो.

जया एके सत्तेचे बैसणें । दोघा एका प्रकाशाचें लेणें ॥
अनादि एकपणें । नांदती दोघे ॥

— ज्ञानेश्वर

मनोलयामुळें अतींद्रिय ज्ञान प्राप्त होते व कर्णामध्यें अनुहत ध्वनि उत्पन्न होऊं लागतो हे मागें सांगितलें आहे. हे ध्वनि अगर नाद दहा प्रकारचे आहेत. तीं ब्रम्हाचीं रूपें आहेत. प्रथम किंकिणी चिंचणी वगैरे नाद उत्पन्न होता होता नदीप्रवाह व पावसाच्या धारा प्रमाणें नाद मंडूकरव, वीणानाद, भ्रमराचा गुंजारव वगैरे चढते नाद ऐकूं येतात. शेवटीं स्पष्टपणें सोऽहं असा नाद उत्पन्न होतो. ब्रह्मांडाचें ऐक्य होऊन ज्या वेळीं फक्त सोऽहं ह्या एकच वृत्तीचें अनुसंधान

असतें त्यावेळीं प्रकाशरूपाबरोबर ओंकाराचा स्पष्ट ध्वनि सहस्रदल–कमलांत घुमत असतो. नाद व प्रकाश ही परब्रह्माचीं सगुणरूपें असल्यामुळें गुरुपरंपरेनुसार कोणत्याहि स्वरूपाचा प्रथम साक्षात्कार झाला तरी लगेच दुसऱ्याचा साक्षात्कार होतो! नादपुरुषाचा साक्षात्कार होणें हेंच खरें नामस्मरण होय. ओंकार हा मूळ शब्द आहे. हें मूळ स्फुरण आहे! हें अखंड स्फुरण राहूं लागलें ह्मणजेच अखंड नामस्मरण झालें म्हणावयाचें. हेंच नाम एकवार जरी जपलें गेलें तरी चारीमुक्ति खास मिळतील. नामस्मरणाची उच्च व शेवटची अवस्था कोणती हें ध्यानीं आलें असेलच. हें अखंड नामस्मरण आपल्या देहांत श्वासो–च्छ्वासाचें रूपानें चालूं आहे. त्यास अजपाजप ह्मणतात. या सहज जपावर अनुसंधान ठेविल्यानेंहि संपूर्ण मनोलय प्राप्त होतो व शेवटीं अनुहतध्वनि रूपानें हाच जप नादरूपांत प्रगट होतो! ह्या नाद-पुरुषास अमानव पुरुष असें म्हटलें आहे व देवयान पंथाचें शेवटीं हाच पुरुष ब्रह्माप्रत नेतो. कर्णांत उत्पन्न होणाऱ्या नादावर अनुसंधान ठेविलें ह्मणजे मनोलय व प्राणलय जसजसा होत जाईल तसतसे पुढचे नाद ऐकूं येऊं लागतात. शेवटीं या नादानुसंधानानें सोहं वृत्तीचाहि लय परब्रह्म स्वरूपांत होतो. मन व प्राण ह्या एकाच मूळ वायूच्या द्विधा वृत्ति असल्यामुळें एकाचा लय होतांच दुसऱ्याचा लय होतो. मूळवायु शरीरांतील माकडहाडाचे पुढचे बाजूस असणाऱ्या मूलाधार चक्रापासून वर स्वाधिष्ठान चक्रावरून मणिपूर उर्फ नाभि-कमल चक्रावर येतो. तेथें मध्यमार्ग जो सुषुम्णापंथ त्यांत शिरून तो हृदयाचें ठिकाणचें अनाहत, कंठांतील विशुद्ध व भ्रूमध्यांतील आज्ञा या चक्रावरून मस्तकांतील सहस्रदलकमलांत येतो. यास चक्रभेदन म्हणतात. प्राण ह्मणजे प्राणशक्ति असा अर्थ घ्यावा. प्राण व मनाचा लय होतां होतां उपरिनिर्दिष्ट देवयानपंथावरील अनुभव

येत जातात व शेवटीं सोहं वृत्तिरूपानें परब्रह्मस्वरूपीं लीन होता येते ! साक्षात्काराचें मार्गांतील लयाचा क्रम श्रुति व भगवद्गीतादिशास्त्रें यास संमत आहे. साधुसंतांनांहि तसेच अनुभव आले. ते जगास तसेच अनुभव प्राप्त करून घेण्याचा उपदेश करितात. साधकासहि तशीच आत्मप्रचीति यावयास पाहिजे.

सद्गुरु सत्शिष्यास महावाक्याचा उपदेश करतात. कूटस्थ आत्मा व सर्वव्यापी परमात्मा हे एकच आहेत. याचें अतीत असणारें पुरुषोत्तमस्वरूप म्हणजे परब्रह्मस्वरूप होय व तेंच आपलें निखिल स्वस्वरूप होय ! परब्रह्म हें गगनासारखे आहे. गगनाप्रमाणें नीलप्रभेचे शेवटीं दर्शन होऊन सोऽहं वृत्तीचा संपूर्ण लय खं ब्रह्मांत होतो. ही अगोचर व शेवटची अवस्था आहे. हिचें वर्णन करतां येणार नाहीं. हिचा अनुभव यावयास पाहिजे. साक्षात्कार ज्यास होतो तोच भक्त या संज्ञेस प्राप्त होतो व अशासच परब्रह्माची भक्ति करतां येते. देव होऊन देवाची भक्ति करावी असें ह्मणण्यांतील हेंच रहस्य होय. तोच अनन्य भक्त होय ! त्यासच अपरोक्ष उपासना साध्य झाली ह्मणावयाची. जगांत उपासनामार्ग चालावा व भक्तिमार्गानें जडजीवांनीं आपला उद्धार करून घ्यावा ह्मणून त्यांच्याच चालीनें चालण्याकरितां साधुसंतांनीं ह्या गगनस्वरूपास मेघःश्याम, कृष्णसखा, नीलकंठ इत्यादि सार्थ नांवांनीं संबोधिलें आहे. त्यांच्या ह्मणण्यांतील हें रहस्य ओळखून साधकांनीं भ्रम व अहंकार उत्पन्न न होऊं देतां शेवटची अवस्था प्राप्त करून घेतली पाहिजे.

साक्षात्कारयागोचें आचरण करणाऱ्यांच्या त्यांचे अनुभवानुरूप सात भूमिका मानल्या आहेत. साधकास आपल्या ज्ञानाची कसोटी बरोबर लावतां यावी व आपण कोठपर्यंत आलों हें कळावें एतदर्थ या भूमिका सांगितल्या आहेत. अखंडसुख प्राप्त व्हावें अशी

शुभ इच्छा अंत:करणांत उत्पन्न होणें व श्रवणाकडे लक्ष लागणें ही पहिली भूमिका. श्रवणाचें मनन, निदिध्यास, सत्वगुणप्रधान आहार-विहार ठेवून सात्विक वृत्ति वनविणें व ईश्वराचें भक्तियुक्त अंत:-करणानें ध्यान व नामस्मरण करून चित्त स्थिर करण्याचा प्रयत्न करणें ही दुसरी भूमिका. वृत्ति अंतर्मुख करून मनोलयाचें अभ्यासानें आत्म-साक्षात्कार करून घेणें हें तिसऱ्या भूमिकेवर असल्याचें लक्षण होय. यापुढील चवथ्या भूमिकेवर आरूढ होणारास ब्रह्मवेत्ता असें ह्मणतात. पिंडब्रम्हांडाचें ऐक्य जाणून परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यावर तो निर्विकल्प समाधींत राहतो. ह्या चवथ्या भूमिकेपुढील ३ भूमिका ज्ञानी देहप्रारब्ध असेपर्यंत ज्या अवस्थेंत राहतो तदनुरूप त्यांचें वर्णन आहे. पांचव्या भूमिकेवर गेल्यावर ज्ञानी देहप्रारब्ध आनंदानें भोगतो. त्यास ब्रह्मविद्वर ह्मणतात. परब्रम्ह स्वरूपाशीं अखंड तादा-त्म्यानें असून जो उत्थान दशेवर येत नाहीं व अखंड स्वात्मानंदांत निमग्न असतो. त्यास ब्रह्मविद्वरीयान् अशी बहुमानाची पदवी या सहाव्या भूमिकेवर आल्यावर मिळते. शेवटची तूर्यगा नांवाची सातवी भूमिका असून तिचेवर आरूढ झालेल्या साक्षात्कारी पुरुषास ब्रह्मविद्व-रिष्ठ अशा श्रेष्ठ नांवांनीं संबोधिलें जाते. ह्या अवस्थेंतील ज्ञानी पर-ब्रम्हाचा पुतळाच असतो ! तो विधिनिषेधांतीत असतो !

समग्र ग्रंथाचें पर्यालोचन वर दिल्याप्रमाणें थोडक्यांत यथामति केलें आहे. हा ग्रंथ जसजशी ईश्वराची प्रेरणा झाली तसतसा लिहिला गेला आहे व आतां त्याच्याच इच्छेनें तो शेवटास गेला आहे. ग्रंथ-कर्त्याकडे यत्किंचितूहि त्याचें कर्तृत्व नाहीं. परमात्माच बुद्धीचा प्रेरक, कर्ता, करविता व लेखक आहे ही जाणीव ग्रंथकर्त्याचें ठिकाणीं पूर्ण-पणें आहे त्यामुळें ग्रंथकर्तृत्वाचा लेशमात्रहि अभिमान घेण्यास तो तयार नाहीं. ईश्वरानें ग्रंथकर्त्यास निमित्तमात्र केलें याबद्दल त्याचे

धन्यवाद गावें तेवढे थोडे आहेत ! शब्दशः विचार केला तरी समग्र ग्रंथामध्यें ग्रंथकर्त्याचें असें काय आहे ? साधुसंतांच्या वचनरूपी अफाट अमृत सागरांतून बिंदुरूप अमृत कण घेऊन ते एकत्र करून त्याचे प्रकाशमय सुंदर दीप उभारलें आहेत एवढेंच केलें आहे. सर्वत्र त्यांचीच वचनें व त्यांचींच श्रुतिप्रणीत तत्वें ! अभ्यासी व ग्राहक अशा श्रोतेरूपी हंसापुढें प्रकाशरूप मोत्यांचा चारा ठेविला आहे तो ज्यांनीं त्यांनीं यथाशक्ति ग्रहण करावा. ग्रंथाचें एक वेळ वाचन केलें तरी वाचकांस स्वस्वरूप जाणण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाल्या–शिवाय राहणार नाहीं. बुद्धिप्रामाण्यवाद्यांसहि त्याचे बुद्धीस पटेल अशाप्रकारें बुद्धिवाद केलेला आढळेल व खोल बुद्धीचे सूक्ष्म धाग्या दोऱ्यांनां आंदोलन दिलेलें आढळेल. पौर्वात्य व पाश्चिमात्य वेदांत्यास व शास्त्रीपंडीतांना आपण वाचलेल्या पुष्कळ सूक्ष्म सिद्धांताचे प्रतिबिंब यांत पहावयास सांपडेल व त्यांत त्यांना आनंद वाटेल. जे नुस्ते बहुश्रुत शब्दज्ञानी असतील त्यांना कोणत्याहि ग्रंथाचे लक्ष्यार्थानें कसें ग्रहण करावें हें कळेल. यांतील सत्पुरुषांचीं पुष्कळ वचनें नेहमीं लक्षांत ठेवण्याजोगीं आहेत. निरनिराळ्या सांप्रदायांचे कित्येक प्रणेत्यांना आपल्या शिष्यास खऱ्या सुखाची प्राप्ति कशी करून घ्यावी याचा बोध होईल. अभ्यासी पुरुषास तर या दीपांचेप्रकाशांत आपला पथ बरोबर आहे अगर नाहीं हें कळेल व निशंकपणें तो आचरण्यास उमेद येईल. या साक्षात्काराचें मार्गांत जे असतील त्यांना ग्रंथवाचनानें आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं एवढेंच नव्हे तर कित्येक प्रसंगीं ते तन्मयहि झाल्याशिवाय राहणार नाहींत. जे सिद्धावस्थेंत असतील अशा थोर विभू-तींनां ग्रंथ वाचून अगर ऐकून आनंद व प्रेम उत्पन्न झाल्याशिवाय कसें राहील ? प्रत्येक वाचकांस या ग्रंथांत कांहीं विशिष्ट बोध आहे अशी जाणीव होईल. ग्रंथांत वर्णन केल्याप्रमाणें आपले इच्छेनुरूप व

पारिस्थितीनुरूप कोणताहि अभ्यास दृढविश्वासानें करून पाहिल्यास त्या त्या प्रमाणें अनुभव आल्याशिवाय राहणार नाहींत. प्रचीतीचें शास्त्र हें अनुमानशास्त्र नव्हें. प्रत्यक्ष तसे अनुभव यावयास पाहिजेत. दृढ अभ्यास केल्याशिवाय ते कसें येणार ? तो वादाचा विजय नव्हें किंवा तर्कानेंहि जाणण्याजोगी ती वस्तु नाहीं. खरें अखंडसुख मिळावें अशी ज्यांस इच्छा असेल व सत्यस्वरूप जाणण्याची ज्यांची मनशिा असेल त्यांनीं देवयानपंथावरच यावयास पाहिजे व सद्गुरु कृपेनें त्याचा शेवट गाठावयास पाहिजे. परब्रह्मस्वरूप हेंच गुरु, परम-गुरू व परात्पर गुरुरूप होय ! त्यासच शरण जाऊन त्याचें ज्ञान या साक्षात्कार योगानें करून घ्यावें व अंतीं त्याठिकाणींच लीन व्हावें !!

शुद्धसत्व प्रकृतींत जो प्रतिबिंबींत आहे, म्हणून श्रुतींनें ज्यांस ईश्वर ही संज्ञा दिली आहे कारण तो अखील जगाचा—चराचर सृष्टीचा तात आहे अशा निर्गुण, निराकार गगनस्वरूपास–निरंजन स्वरूपास एक भावानें वंदन करून व त्यानेंच सर्वांस स्वस्वरूपज्ञानाचें मार्गावर येण्यास प्रेरणा करावी व सर्वांस सुखी करावें अशी त्या गगनस्वरूपास मौनरूपानें प्रार्थना करून लेखणी खालीं ठेवतों.

ॐ ! ॐ !! ॐ !!!

स मा प्त.

# परिशिष्ट अ

॥ श्रीदत्त प्रसन्न ॥

## ॥ अथ प्रकाश दीपिका ॥

॥ श्री गणेशायनमः ॥

उद्धव ह्मणे श्रीकृष्णासी । प्रणवाभ्यास सांगा आम्हासी ।
जेणें पाविजे आत्मरूपासी । सुलभेसी करूनि ॥१॥
अष्टांगयोग अति कठिण । आचरिता असें दारुण ।
ह्मणूनि प्रणवानुसंधान । सहज स्थितीचें सांगावें ॥२॥
एथें तव माझें चित्त । अखंडित भोगू पहात ।
तुह्मी बोलिले निश्चित । अवकाश पडे ॥३॥
तृषा लागलिया वेळ । कूप खणोनि प्राशिजे जळ ।
क्षुधा लागली प्रबळ । धाविजे पेरु ॥४॥
देवा ऐसे न कीजे आतां । धीर न धरवे माझिया चित्ता ।
मीन जळेवीण ठेविता । राहे कैसा ॥ ५ ॥
पाहूनि उद्धवाची परमस्थिती । विशेष संतोष जाहला चित्तीं ।
आलिंगुनि परमप्रीति । बोलतसे ॥ ६ ॥
उद्धवा आमुच्या हृदयींचें गुज । केवीं राखू चोरूनि तुज ।
सर्व बीजांचे निजगुज । सांगत असो ॥ ७ ॥
एथें सर्वांगाचे करोनि कान । आत्मस्वरूप चैतन्यपण ।
स्थिर करूनि मन । सावध पाहे ॥ ८ ॥
आमुचा ऐश्वर्ययोग । जें मत्स्वरूपाचे निजांग ।
तयाहूनि नव्हे चांग । सर्वस्व हें ॥ ९ ॥

जेथूनि सर्व घडले असे । परी वचनासीहि न प्रकाशे ।
विरिंचि आदिकरूनि आयासे । वांछिताती ॥ १० ॥
हे गतीची निजगती । येणें परम पुरुषाची प्राप्ति ।
याहूनि नसे त्रिजगती । आणीक कांहीं ॥ ११ ॥
उद्धवा याचें कारण । सहज स्थितीचें आसन ।
ध्वनि अंतरगत करून । ध्यान लक्षी ॥ १२ ॥
ध्वनीं ठेविजें वृत्ति । नाद लावूनि श्रोत्रीं ।
नयनगर्भाप्रती । भ्रूमध्यें लक्षी ॥ १३ ॥
ऐसें लक्ष लक्षिता । निज प्रगटेल तत्वता ।
अणुरेणु पूर्ण भरितां । दिसतील सहजी ॥ १४ ॥
मुक्त मोती कृश मोठी । तुज पाहतां दिसती दृष्टी ।
रौप्य ताराशी सृष्टी । भरली दिसे ॥ १५ ॥
अनेक घुंगुरु तळपती । कीं नक्षत्रें डळमळती ।
असती पुष्पें डोलती । मधुर वातें ॥ १६ ॥
इंद्रनीळाची निजज्योती । राघवा नेत्राची दिसे पंक्ति ।
तेज गुंडाळले झळकती । अनेकत्वें ॥ १७ ॥
क्षणक्षणा रूप पालटे । झळकता विजू हारपे ।
ज्वाळा भासती आपेआपे । प्रकाश तेजे ॥ १८ ॥
चंद्र सूर्य दिसती उगवले । अनेक तेज पाहता फाकलें ।
ऐसे तेज पाहिले । दृष्टीस भासे ॥ १९ ॥
तयाचें ऐकिजे कारण । प्रथम अंधःकार निबिडपण ।
ते अष्टधा प्रकृति जाण निश्चयेसी ॥ २० ॥
जे प्राणिया होय गती । ते इये अंधःकारें पडती ।
तया मत्स्वरूपाची प्राप्ति । नव्हे येणें ॥ २१ ॥
सूक्ष्मपणें सुवर्णराज । तया प्रकाशें दिसती तुज ।

ते मूळ माया हे गुज । ओळखिजे तुवा ॥ २२ ॥
येणोंचि जीव शिव होय । सूक्ष्मपणें कळोन आहे ।
सर्वेंद्रिया व्यापक होय । गतीं तेही ॥ २३ ॥
जे का दिसे मुक्ताकार । तोचि ब्रम्हा हा निर्धार ।
अनेकरूपासि परपार । भरूनि असे ॥ २४ ॥
तारा दंडाकार दिसती । तोचि विष्णू सुनिश्चिती ।
सर्व पालनाची स्थिती । निजगतिकर ॥ २५ ॥
नाना तेजाचे गुंडाळे । लक्षिता तरंगिसी फळें ।
तोचि शेषषाई विमळे । भ्रांति नाहीं ॥ २६ ॥
तेज दिसे वर्तुळाकारेसी । चक्रचक्रांत प्रवेशी ।
तोचि सदाशिव निश्चयेसी । ओळखी तूं ॥ २७ ॥
आणिक एक अर्ध चंद्राकार । तोचि जाणिजे ईश्वर ।
जया स्वरूपाचा परपार । न कळे कोणा ॥ २८ ॥
जो इंदु भास्करापरी भासे । दृष्टीं लावूनि समरसे ।
स्थिर करूनि मानसे । निश्चळ पाहीं ॥ २९ ॥
तयाहीं देखूनी । मयूरीपच्छे नीलपाणी ।
ऐसें दिसें निजनयनीं । स्वरूप एक ॥ ३० ॥
तया खोविजें दृष्टी । तया भ्रूमध्यें होय भेटी ।
तें येउनि नेत्रसंपुटीं । होतसे स्थिर ॥ ३१ ॥
त्याते निजदृष्टीचा प्रवेश । सहज उन्मनी सौरस ।
मग निज तेजाचा प्रकाश । ब्रह्मरूप ॥ ३२ ॥
ऐसी ब्रह्मस्वरूपाची पेटी । पाहता उघडेल दृष्टी ।
तटस्थाची वृत्ति । कोण सांगे ॥ ३३ ॥
तेथें ब्रह्मतेज प्रगटलें । साध्य साधन खुंटले ।
आपआपण झाले । स्वस्वरूप ॥ ३४ ॥

ऐसा मदैश्वर्य योग । सांगितला तुज सांग ।
हें माझें निजांग । निश्चयेंमी ॥ ३५ ॥
पाषाण देव देउळा । अंतर्बाह्य एकाचि शिळा ।
तैसा प्रकाशिला अवलिळा । हृदयस्थ जो ॥ ३६ ॥
ऐसा विष्णू आत्मलिंग । बोधा आलिया सांग ।
तेथें कैचे सांगोपांग । स्वयंज्योति ॥ ३७ ॥
घरीं कामधेनु असतां । तक्र मागों जाय दीनतां ।
ठेवणें वडिलांचे घरीं असता । मागे भिक्षा ॥ ३८ ॥
मृत्तिका जळ विचित्र प्रतिमा । तेथें दैवत ऐसी सीमा ।
सकळ आत्मयारामा । व्यापक विश्वी ॥३९॥
ऐसा हृदयस्थ मनोरम । सर्व सुखाचे निजधाम ।
भ्रांति येणे समविषम । मानी तूं असे ॥ ४० ॥
भ्रमरी-कीटक-न्याय । झाला जरी उपाय ।
तरी स्वरूपाची सोय । अपसयाची ॥ ४१ ॥
मग प्रत्यक्ष तत्व दिसे । चक्षुराग्निमणिमयप्रकाशे ।
जो पूर्णत्वाचि असे । सर्वसाक्षी ॥ ४२ ॥
तया आड अंधार आहे । ते मायास्वरूप सिद्ध आहे ।
तटस्थ खुंटली प्रवाहे । स्वरूप दिसेना ॥ ४३ ॥
ऐसे चक्षु माजी गुह्य जे । अंगुष्ठपर्व मणी हे ।
तयावरी पर्वार्धे पाहे । कारण जे का ॥ ४४ ॥
तयावरी वर्तुळबिंदु ज्योति । श्रोति अन्यथा न मानावे चित्तीं ।
मसूर प्रमाण तेजस्थिती । तया अंतरदृष्टी पीत भासे ॥ ४५ ॥
नील सुनील अमल । देव साळोशुक्र केवळ ।
तयाहूनि अति निर्मळ । सूक्ष्म ज्योती ॥ ४६ ॥
चक्षुचिया दशांश भागी । तेथे पहाती जे योगी ।

स्वयंतेज निजांगी । स्वतेजे असे ॥ ४७ ॥
अचळ निर्मळ शांत । निज असें दिसत ।
विमल विमल दिसत । स्वरूपशून्य ॥ ४८ ॥
ऐसें तें निरंजन । शुद्ध स्फटिक प्रमाण ।
प्रकाशमान मणी शुभ्रपण । विराजले असे ॥ ४९ ॥
तेजोराशी परब्रह्म असें । धारणेसी समरसे ।
प्राणलिंग प्रत्यक्ष दिसें । सच्चिदानंद ॥ ५० ॥
ऐसेनि सर्वांगें पाहता । परमात्मा दिसेल तत्वता ।
हे निरामय कर्ता । विरुळा जाणे ॥ ५१ ॥
ऐसी वस्तु चर्मचक्षु जो लाहे । ज्ञान दृष्टी करूनि जो पाहे ।
चिदज्ञातु होऊनि राहे । निजवस्तु पूर्ण ॥ ५२ ॥
एका जनार्दना शरण । झाले उद्धव श्रीकृष्णाचे संभाषण ।
तें निरूपिलें देशभाषे करून । श्रोतीं अन्यथा न मानावें ॥५३॥

॥ इति श्री प्रकाशदीपिका संपूर्णम्. ॥

———

# परिशिष्ट उ

## दासबोधाचा सोलीव अर्थ

## श्रीसमर्थकृत सोलीव सुख

---

श्रीराम समर्थ

जयजयाजी सद्‌गुरुवर्या । पूर्णब्रम्ह प्रताप सूर्या ॥
तुज नमोनी आचार्या । करुणा सिंधू ॥ १ ॥
जे भव समुद्रीं पोळले । विषयमदें अंध जाहले ।
चोऱ्यांशींत वाहूं लागले । मार्ग सुचेना तयांसी ॥ २ ॥
ऐसे विश्व बहूत बुडालें । मी जीव ह्मणोनि धावूं लागलें ।
मुळीचें स्मरण विसरलें । मी कोण ऐसें ॥ ३ ॥
तयासी मुक्त कराया पूर्ण । तूं बा उतरलासी ज्ञानघन ॥
रोगीयां औषधीं देऊन । भवमोचन करशील ॥ ४ ॥
ऐसें औदार्य तुझें सघन । ह्मणोनि आलों मी शरण ॥
दयार्णवा कृपा करून । मज दातारें तारावें ॥ ५ ॥
आपण आपणांतें पावें । ऐसें माझें मनीं बोलावें ।
तें दातारें गोचर करावें । रोकडें ब्रह्म ॥ ६ ॥
ऐसा शिष्याचा प्रश्न ऐकोनी ।
ज्ञानाचें भरतें आलें स्वामी लागोनी ॥
आसन सोडूनियां तयें क्षणीं । कडकडोनी भेटले ॥ ७ ॥
रे बाळका ऐक निर्धार । तुझा प्रश्न तो वाग्दोर ।
माझें कंठीं वसला साचार । धरें घेई निजवस्तु ॥ ८ ॥

मग स्नेहाळें नवल केलें । बोसंगासी शिष्या घेतलें ।
अर्थ माला रस काढिले । पूर्ण फुंकिले कर्ण रंध्रीं ॥ ९ ॥
खडतर औषधी दिव्य रसायन । नयनीं झोंवलें जाऊन ।
डोळियाचा डोळा फोडून । **चित्सूर्य** भेदलें ॥ १० ॥
पूर्ण अंश गगनीं भेदिला । अर्क तो पिंडामाजीं उतरला ।
त्रिकूट श्रियाट चुराडा केला । सेखी भरला गगन गर्भीं ॥ ११ ॥
उग्रतेज लखेलखाट । तेणें झाला चौ देहाचा आट ।
भ्रांती पडली बळकट । तेव्हां बाळ निश्चेष्टित पडे ॥ १२ ॥
ऐसें पाहोनि सद्गुरुनाथ । पद्म हस्त मस्तकीं ठेवित ।
वत्सा सावध त्वरित । निजरूप पहा आपुलें ॥ १३ ॥
जागृत करोनि ते वेळीं । अजपाची दोरी देऊनि जवळी ।
विहंगम डोल्हारीं तये वेळीं । आलक्षे लक्षीं बैसविले ॥ १४ ॥
धैर्याचे आसन बळकट । आणि इंद्रियें वोढूनि सघट ।
धरे उर्ध्व पंथें वाट नीट । अढळ पदीं लक्ष लावी ॥ १५ ॥
पुढें करूनिया जाणीव । मागें सारोनी नेणीव ।
जे जे जाणीव अभिनव । तें तूं नव्हेसी तत्त्वतां ॥ १६ ॥
तैं मार्गाची करूनि नव्हाळी । प्रथम घण्टानादाची नवाळी ।
दुसरी किंकीणीची मोवाळी । तिसरी अनुहत कोल्हाळ ॥ १७ ॥
आतां अग्रीं लक्ष लावी । काय दिसेल तें न्याहाळीं ।
**चंद्रज्योती** प्रकाशली । विभु बांधिला बळकट ॥ १८ ॥
तें सुख अन्तरीं घेऊनी । पुढें चाल करी संगमीं ।
तेथें विजु ऐशा कामिनी । चमकताती सुवर्ण रंग ॥ १९ ॥
तेंहि जाणोनि मागें सारी । पुढें सूर्यबिंब अवधारीं ।
ज्वाळा निघती परोपरी । दंडळूं नको कल्पांतीं ॥ २० ॥
वायोमुख करोनि तेथें । गिळी वेगें सूर्य किरणांतें ।

मग देखसी आनन्द मार्तंडातें । तेजोमय पुत्रा ॥ २१ ॥
अनन्त भानु तेज अद्भुत । खदिरांगार ज्वाळा उसळत ।
धारिष्ठ तेथें न निभत । दुर्घट विभू तेथींचा ॥ २२ ॥
तेथें हुशारीचें काम । अग्रीं लक्ष घालूनि नेम ॥
तीर लावून सुगम । मागें सारी सूर्यातें ॥ २३ ॥
पुढें दिसेल जें नवल । तें पाहीं हंस मेळ ।
**चंद्र किरण** शीतळ । पाहसी तूं मम वत्सा ॥ २४ ॥
तेव्हां मागील दाह शमेल । शीतळाई सर्वांग होईल ।
चंद्राची प्रभा सुढाळ । फडफडीत चांदणें ॥ २५ ॥
तोचि **डोळियाचा डोळा** पाहीं । देहातींत वर्म विदेही ।
चिन्मय सुखाची नवाई । भोगी आपुलें कीं गा ॥ २६ ॥
अनुभवाची शीग भरली । आम्रापरी उसळली ।
भूमंडळीं प्रभा पडली । कपूर वर्ण नभ जाहलें ॥ २७ ॥
तया मध्यभागीं सघन । अढळ पद दैदीप्यमान ।
उर्वरित ब्रम्ह जाण । **ध्रुव** बैसला अढळते ॥ २८ ॥
तें तुझें स्वरूप नेटे बोटें । जेथें समस्त जाणणें आटे ।
ऐके जालासी धिटे । वळकटपणें बलाढ्य ॥ २९ ॥
ऐसे सुख योगियां लाधलें । तेव्हां देहाचें मरण गेलें ॥
सांगणें ऐकणें मुरालें । एकत्वपणें एकाचि ॥ ३० ॥
शांती येऊनि माळ घाली । अलक्ष सेजे निजली ।
हंस पदें ऐक्य जाली सुख सुखातें निमग्न ॥ ३१ ॥
तेथील अनुभव घेऊनी । स्वानुभव पाहे कलटुनि ।
आला मार्ग तें क्षणीं । दिसेनासा झाला कीं ॥ ३२ ॥
त्रिकूट श्रियाट गोलाट । बुडालें तें औटपीट ।
इडा पिंगला सुषुम्ना तट । बिरालें तें स्वात्मसुखें ॥ ३३ ॥

स्थूळ सूक्ष्म कारण । नेणों काय झालें महाकारण ।
इंद्रियें चुबकलीं जाण । धाव मोडली तयाची ॥ ३४ ॥
पंचभूतांचे खवलें । तयांचे ठावचि पुसिले ।
अपरिमित आनंदले । निमग्न झालें सुखांत ॥ ३५ ॥
सखोल भूमिके ऐसें झाले । सुख सुखासि घोटलें ।
स्वयें आत्मत्व प्रगटलें । माझें देही रोकडे ॥ ३६ ॥
मग सहज समाधी जिरवून । शिष्य उठला घावरा होऊन ।
हें सद्गुरुचें देणें । काय उत्तीर्ण मी व्हावें ॥ ३७ ॥
जरी स्तुती त्याची करावी । माझी मती नाहीं बरवी ।
अनिर्वाच्य गति बोलावी । परा वाचा खुंटत ॥ ३८ ॥
आतां मी जी लडिवाळपणें । तुमचे कृपेनें करितों स्तवन ।
सूर्यापुढें खद्योत जाण । तैशापरी बोल हे ॥ ३९ ॥
जयजयाजी करुणा सिंधू । जयजयाजी भवरोग वैदू ।
जयजयाजी बाळबोधू । कृपाघना समर्था ॥ ४० ॥
जयजयाजी अविनाशा । जयजयाजी परेशा ।
जयजया अध्येक्षां दयार्णवा ॥ ४१ ॥
जयजयाजी पूर्ण चंद्रा । जयजयाजी अलक्षविहारा ।
जयजयाजी भवसमुद्र भास्करा । आनंद प्रभू ॥ ४२ ॥
तुझी स्तुति करितां सांग । वेद स्तुतीं जाले अव्यंग ।
तेथें प्राकृत मी काय । वर्णावया योग्य नव्हे ॥ ४३ ॥
कल्याण ह्मणे जी रामदासा । माझा मुकेपणाचा ठसा ।
तें मोडोनि वसोसा । मज आपणा ऐसें केलें ॥ ४४ ॥
ऐकूनि मृदुवचन । कुरवाळिलें तया लागोन ।
गुरुशिष्य हें बोलणें । उरलें नाहीं तें वेळीं ॥ ४५ ॥
एकपणें एकचि झाले । ऐक्य रूपीं सम मिळाले ।

करूनिया सुख उसळलें । नाहीं पण जाऊनि ॥ ४६ ॥
सुरगणीचा पाक झाला ; नभा भाजनी वाढिला ।
अक्षयपदीं सुगरावला । संत जेविती स्वानंदे ॥ ४७ ॥
अनिर्वाच्य बोल बोलिले । साधकांचे उपेगा आले ।
सिद्धांतरीं डोलों लागले । बद्ध मुमुक्षु होताती ॥ ४८ ॥
यापरतें आन नाहीं बोलण । श्रीरामदाशरथीची आण ।
एक पत्नि तो सुजाण । आपुलें पद दे दासा ॥ ४९ ॥
इति श्री दासबोध ग्रन्थ । त्यांतील हा सोलींव अर्थ ॥
श्रोते ऐकतां यथार्थ । समाधिस्थ होतील ॥ ५० ॥



# विषयाची सूचि

---